# देवगिरीचे यादव

ब्रह्मानंद श्रीकृष्ण देशपांडे



## - प्रकाशकाचे निवेदन -

'देवगिरीचे यादव' या पुस्तकाच्या दुसऱ्या आवृत्तीचे काम सुरू असताना डॉ. ब्रह्मानंद देशपांडे यांनी मूळ पुस्तकाच्या मजकुरामध्ये सुधारणा केली होती, मात्र पुस्तकाचे काम सुरू असताना दि. ६ ऑगस्ट २०१३ रोजी दुर्दैवाने त्यांचे निधन झाले. त्यामुळे या दुसऱ्या आवृत्तीचे अखेरचे मुद्रित त्यांनी पाहिलेले नाही. या अखेरच्या मुद्रिताचे शोधन सुरू असताना असे दिसून आले की या पुस्तकाच्या पहिल्या आवृत्तीत ताम्रपट आणि शिलालेख तसेच प्राचीन साहित्यकृतींमधील उतारे अनेक ठिकाणी उद्धृत केलेले आहेत व त्यात काही त्रुटी आहेत. अशा त्रुटींची दुरूस्ती या आवृत्तीत करण्यात आली आहे. ही दुरूस्ती करताना प्रस्तुत मजकुराचा संपादित पाठ अथवा अपेक्षित पाठ विचारात घेतला आहे. अनुनासिक आणि अनुस्वाराच्या उपयोगाची शैली मात्र मुळाबरहुकूम ठेवली आहे. संस्कृत मजकुराच्या दुरूस्तीचे हे काम डॉ. श्रीनन्द बापट यांनी केले आहे.

## डॉ. ब्रह्मानंद देशपांडे यांचे प्रकाशित साहित्य

१. The Gupta Administration-1968
२. देवगिरीचे यादव-१९७६
३. शोधमुद्रा-१९७७, दुसरी आवृत्ती-१९९६
४. शब्दवेध-१९७९
५. चक्रपाणि-चिंतन-१९७९
६. भुत्तो-एक वादळ-१९८१
७. तीन शोधनिबंध-१९८३
८. रत्नमाळा पूवार्ध-१९८६
९. सप्तपर्णी-१९८८
१०. लीळाचरीत्र एकांक-१९९०
११. महासाधु श्रीएकनाथ महाराजांची भारूडे-१९९१
१२. मयूरपंख-१९९६, दुसरी आवृत्ती-२००१
१३. श्रीगोविंदप्रभूचरित्र-१९९८
१४. शोधमुद्रा-खंड २रा-१९९९
१५. इथे नाथांचिये नगरी-२०००
१६. शोधमुद्रा-खंड ३रा-१९९९
१७. Studies in Epigraphy Volume-1-2000
१८. वेरूळ-२००४
१९. अजिंठा-२००४
२०. दौलताबाद-२००४
२१. अजिंठा वेरूळ औरंगाबाद-२००४
२२. शोधमुद्रा-खंड ४था-२००४
२३. महानुभावीय शोधनिबंध, खंड ३रा-२००५
२४. Studies in Ajintha and Ellora Epigraphs-2005
२५. दक्षिणच्या मध्ययुगीन इतिहासाची साधने खंड १ ते ४-२०११

# प्रस्तावना

देवगिरीच्या यादव राजवंशाचे महत्त्व महाराष्ट्राच्या इतिहासाचा अभ्यास करण्यान्यास नव्याने समजाऊन सांगण्यास नकोच. परंतु यादवांचा राजकीय इतिहास समग्र बारकाव्यांसह सांगणारा एकही ग्रंथ मराठीत नव्हता ही उणीव सतत जाणवल्यामुळेच ह्या लेखनकार्यास आम्ही प्रवृत्त झालो.

यादवांचा संस्कृत, मराठी, कानडी शिलालेखांचा व ताम्रपटांचा या ग्रंथात उपयोग करून घेतला आहे. महानुभाव साहित्यात येणारी यादवांविषयीची माहिती नीट तपासून उपयोगात आणली आहे.

यादव हे मूळ कर्नाटकीय होते, भिल्लम पाचवा ह्याच्या आधीचा इतिहास फारसा ज्ञात नाही, रामचंद्रदेव अगदी पराक्रमशून्य राजा होता. इत्यादी चुकीच्या समजुती दूर होतील, असा आता विश्वास वाटतो. यादवांचे मराठवाडा प्रदेशाशी दृढ नाते व मराठवाड्यातील त्याचे अनेक अप्रकाशित शिलालेख यावर नव्यानेच प्रकाश पडतो आहे.

तीन वर्षे अव्याहत या विषयाचा अभ्यास आम्ही केला ज्यांनी आम्हास इतिहास अभ्यासाच्या क्षेत्रात प्रवेश मिळवून दिला त्या गुरुवर्य डॉ. कृष्णदत्त वाजपेयी व गुरुवर्य श्रीधर मिश्र यांची आठवण आज प्रकर्षाने येते आहे. डॉ. मिराशी व डॉ. अजयमित्र शास्त्री ह्यांनी माझ्या अल्पस्वल्प संशोधनाचे सतत कौतुक केले. डॉ. देवीसिंह चव्हाण, श्री. ग. ह. खरे ह्यांच्याकडूनही आम्हाला उत्तेजन मिळाले. या सर्वांचे आभार मानणे हा औपचारिकपणा होईल.

प्रा. नरहर कुरुंदकर यांनी या ग्रंथाविषयी अतिशय आस्था दाखविली व वारंवार पत्र लिहून लेखनकार्यास चालना दिली हे त्यांचे ऋण आम्ही कधीही विसरू शकणार नाही.

प्रारंभी या ग्रंथाचे स्वरूप मर्यादित होते व त्यात केवळ भिल्लम पाचवा ह्याच्यापर्यंतच इतिहास देण्याचा आमचा मानस होता पण डॉ. र. शं. गुप्ते, इतिहास-प्रमुख मराठवाडा विद्यापीठ ह्यांनी यादवांचा समग्र इतिहास लिहिण्यास प्रवृत्त केले व हे कार्य पूर्ण करून घेतले. म्हणून हा ग्रंथ कृतज्ञता भावनेने त्यांनाच अर्पण केला आहे.

प्रकाशक श्री. बोर्डे व मुद्रक श्री शेळके ह्यांनी ह्या ग्रंथासाठी अतोनात श्रम घेतले. माझ्या माहितीप्रमाणे इतक्या क्लिष्ट विषयावर छापला गेलेला हा मराठवाड्यातील हा पहिलाच ग्रंथ असावा. त्यांचे हे सहकार्य अतिशय मोलाचे आहे. देवगिरीच्या यादवांचा इतिहास लिहून मी मराठवाड्याच्या व महाराष्ट्राच्या इतिहासात अल्पस्वल्प भर घालू शकलो, याविषयी कृतार्थता वाटते.

**चैत्र शुद्ध प्रतिपदा शके १८९७**

**१२ एप्रिल, १९७५** **ब्रह्मानंद श्रीकृष्ण देशपांडे**

# दुसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना

देवगिरीचे यादव या ग्रंथाची प्रथम आवृत्ती केव्हाच संपली. गेली २० वर्षे हा ग्रंथ अप्राप्य होता. मागणी सतत वाढतच होती.

म्हणून दुसऱ्या आवृत्तीचा योग. काही दुरुस्त्या काही नवीन माहिती यांच्यासकट.

अपरांत प्रकाशनाचे माननीय परागराव पुरंदरे यांनी हा योग आणला. त्यांच्या ऋणातच रहावे हे योग्य. शिल्पा वाडेकर, साइली दातार, पराग पुरंदरे, सुधीर जोशी (काका), अमोल बनकर, अभिजीत मोहिरे ही नवी ऋणानुबंधाची नाती जुळली. त्याच ऋणानुबंधाला ही दुसरी आवृत्ती अर्पण.

ब्रह्मानंद श्रीकृष्ण देशपांडे

# अनुक्रम



*

# संदर्भ साहित्य

आधीच प्राचीन भारताचा इतिहास जुळवताना साधनांची अडचण प्रकर्षाने जाणवते. शिलालेख, ताम्रपट, स्तंभलेख, नाणी इत्यादी प्रथम दर्जाची साधने मुळातच दुर्मिळ. त्यात शिलालेख बहुधा खंडित असतात. झिजलेले असतात. त्यामुळे वाचनात अनेक विकल्प निर्माण होऊन क्वचित् प्रसंगी संशोधकशौंडाच्या रणधुमाळीस ते कारणीभूत ठरतात. ताम्रपट पुष्कळदा बनावट असतात आणि त्यांच्या पुराव्यावर अवलंबून असणे धोक्याचे असते. या सर्व अडचणींमधून मार्ग काढीत आपणाला इतिहास रचनेची जुळवाजुळव करावी लागते.

प्राचीन महाराष्ट्राचे बाबतीत तर ही अडचण प्रकर्षाने जाणवते. काही एतद्देशीयांचे उपेक्षेमुळे आणि काही परकीय आक्रमणांचे व मूर्तिभंजकांचे विध्वंसक प्रवृत्तीमुळे या साधनांची मोठ्या प्रमाणावर हानी झाली आहे. प्रस्तुत ग्रंथाचा विषय असलेल्या यादव राजघराण्यातील पहिल्या सिंघणदेवाचे दोन शिलालेख ह्याची उदाहरणे म्हणून सांगता येतील. त्याचा एक लेख अंबाजोगाईजवळ चनई ह्या गावी दुर्लक्षित व भग्न अवस्थेत एका मंदिराचे भिंतीत आडवा तिडवा लावलेला आढळला. त्यावर अनेक ओरखडे उठल्यामुळे त्यातील शक संवत्सराचा अंक "शक १००२ व शक १०६२" असा दोन्ही प्रकारे वाचता येतो व घोटाळे होतात. याच सिंघणदेव प्रथमचा दुसरा शिलालेख अंबाजोगाई ह्या गावीच भोगादित्यदेवाचे मंदिरात होता. पण त्या मंदिराची मशीद झाल्यामुळे भग्न होऊन त्याचा अर्धा भाग नष्ट झाला आहे. ह्यामुळे डॉ. शं. गो. तुळपुळे या शिलालेखात उल्लेखित सिंघणदेव हा यादव घराण्यातील सिंघणदेव प्रथम आहे, हे ओळखू शकले नाहीत व त्याला त्यांनी कलचुरी घराण्यात नेऊन बसविले आहे. अशा अवस्थेत साधनांची जुळवाजुळव किती कठीण असेल, ह्याचा प्रत्यय सामान्य वाचकाला आल्यावाचून राहाणार नाही.

देवगिरीचे यादवकुल सेऊणदेश अथवा खानदेश या प्रदेशात उदय पावले. अर्थात यादवांची शिलाताम्रशासने खानदेशात सापडावीत, हे ओघानेच आले. यादवनृपती सेऊणचंद्र तृतीय याचा एक शिलालेख नाशिकजवळ अंजनेरी ह्या गावी जैनतीर्थंकर श्रीचंद्रप्रभ ह्यांचे मंदिरावर कोरला आहे. जैन धर्मात तीर्थे व पवित्र स्थळे ह्यांची माहिती सांगणाऱ्या ग्रंथात जिनप्रभसूरि ह्यांच्या विविध तीर्थकल्प ह्या ग्रंथाचे स्थान महत्त्वाचे आहे. ह्या ग्रंथाचा 'नासिक्यकल्प' हा भाग नासिकबद्दल माहिती सांगणारा आहे. यात नासिकजवळील अंजनेरीचे श्रीचंद्रप्रभ तीर्थंकराचे स्थान माहात्म्याबद्दल सांगताना जिनप्रभसूरि लिहितात-

**इओ इ दिवाणरिसिणा बारवई दढ्ठाए उवख्खणि पाए जायववंसे वज्रकुमारो णाम जायवखत्तिओ असि। तस्स गब्भवई भज्जा सा बारवईए डझमाणीए बहुभत्तिपूर्व दीवाणरिसी मुक्कलावित्ता चंदप्पहसामिणचेव सरणमागया पुत्रे समए पुत्रवंतं पुत्तं तत्थेव पसुआ वृढप्रहरेति**

**से नामं कपं सो अ अइक्कतं बालभावो संपत्तजुव्वणो जाओ । महारहो इक्कं गेणानिं मुहडलक्खेण समं जुद्धं काऊं समथ्थो अन्नाया तत्थ चोरेहि गाविओ हरिआओ ताओ सव्वाओवि इक्केण दढपहारीणा चोरे निज्जिणिऊण वालिआओ। तओत अइपयंड परक्कमं पासिऊणं बंभणाइ नयरलोएण तस्स तलारपयं दिण्णं निग्गहिआ तणे चोरचरडाईणो जाओ सो कमेण महाराया तत्थेव नयरे जायववंस्स बीयं तत्थ उध्दृरियंति सबहुमाणं चंदप्पहसामिणो तेण भवणमुद्धरिअं॥**

या प्राकृत उतान्याचा सारांश असा की, दुर्वास ऋषीने द्वारावती (द्वारकानगरी) जाळल्यानंतर वज्रकुमार नावाच्या यादव क्षत्रियाची गर्भवती स्त्री जैन तीर्थंकर श्रीचंद्रप्रभ स्वामी यांना शरण आली. त्यांनी तिला आश्रय देऊन तिचे संरक्षण केले. पुण्यसमयी तिला पुण्यवंत पुत्र झाला व त्याचे नामकरण दृढप्रहार असे करण्यात आले. तो पुढे मोठ्या सामर्थ्याचा योद्धा झाला व अनेक वीरांशी एकटाच लढू शकेल, अशी कीर्ती मिळवता झाला. एकदा नगरातील गाई चोरांनी नेल्या, तेव्हा एकटया दृढप्रहाराने चोरांशी झुंजून गाई परत आणल्या, तेव्हा नगरवासी आणि ब्राह्मणांनी त्यांच्या पराक्रमावर खूश होऊन त्याला तलारपय[1] (तलवार पद=नगर रक्षक, कोतवाल पद) दिले. त्या नगरात यादव वंशाचे बीज रोवले गेले. दृढप्रहार पुढे राजा झाला व त्याने चंद्रप्रभ स्वामीचे मंदिर बांधले.

ही दंतकथा जरी पंथीय दृष्टिकोनातून लिहिली असली, तरी त्यातून बरीचशी उपयुक्त ऐतिहासिक माहिती आपले हाती लागते, ती अशी-

१) सेऊणदेशकर यादव स्वतःला द्वारकेच्या यादवांचे वंशज समजत असत. पुढे त्यांच्या शिलाताम्रशासनातून ह्याच कल्पनेचा पुनरुच्चार झालेला आपणास दिसतो.

२) दृढप्रहार हा ह्या घराण्याचा पहिला ज्ञात राजा दिसतो. यादवांचा ज्या वंशावली त्यांच्या अभिलेखातून व शिलाताम्रशासनांमधून प्राप्त होतात, त्यातील पौराणिक राजांची नांवे वगळली, तर हाच या घराण्याचा पहिला राजा ठरतो.

३) ह्यातून दृढप्रहाराने अतिशय कष्टमय परिस्थितीतून सुरुवात करून आपला जम कसा

---

***१. हा शब्द डॉ. ओंकारप्रसाद वर्मा यांनी, तलारघयं असा घेऊन ते घोटाळ्यात पडले. त्यांनी प्रख्यात जैन संशोधक डॉ. आदिनाथ नेमिचंद उपाध्ये यांना पत्र पाठवून खुलासा विचारला व त्यांनी (उपाध्यांनी) तलारपय असा पाठ सुचवून त्याचा अर्थ City-guard असा सुचवला. पण एव्हढ्या द्राविडी प्राणायामाची गरजच नव्हती. मूळ विविधतीर्थकल्प ग्रंथात (प्रकाशक : सिंधी जैन ग्रंथमाला) तलारपयं असाच पाठ आहे. तलार, तलवार, तरवाळ व तराळ या शब्दांचे मूळ 'तलवाटक' हा शब्द असून, तो गुप्त काळापासून शिलाताम्रशासनात सर्रास आढळतो. (पहा-Saletore R. A., Life in the Gupta Age, page 30)***

बसविला व नाभिषेको न संस्कारो सिंहस्य क्रियते मृगैः। स्वविक्रमार्जित राज्यस्य स्वयमेय मृगेंद्रता। या सुभाषिताप्रमाणे स्वतःचे स्वतंत्र राज्य कसे निर्माण केले, ह्याची कल्पना येते. प्राचीन भारतात राजवंश कसे मूळ धरीत, ह्याचे एक सुंदर उदाहरणच वरील उताऱ्यात पाहावयास मिळते.

आणि म्हणूनच ह्यातील दंतकथेच्या व पंथीय अभिमानाच्या दृष्टिकोनाचा भाग बाजूला ठेवला, तरी वरील ग्रंथातील माहिती निःसंशय महत्त्वाची आहे, ह्यात शंका नाही. यादव राजघराण्यांच्या उदयाचे लोकमानसात उमटलेले प्रतिबिंब ह्या लोककथेने जपून ठेवून आपणापर्यंत पोचविले आहे.[२]

यादव राजघराण्याची माहिती सांगणारा दुसरा ग्रंथ म्हणजे यादव नृपती महादेवराय व रामचंद्रदेव यांचे दरबारातील श्रीकरणाधिप हेमाद्रीपंडित किंवा हेमाडपंत याचे व्रतखंडातील राजप्रशस्ती. हेमाद्री राजसभेतील अतिशय महत्त्वाचा पुरुष होता. त्याने स्वतः लष्करी मोहिमा काढून यादव राज्यात 'झाडीमंडळ' (सध्याचा चांदा व भंडारा जिल्हा) जिंकून भर घातली. तो यादवांचे हस्तिसेनेचाही प्रमुख होता. हा धर्मशास्त्राचा गाढा व्यासंगी असून त्याने 'चतुर्वर्गचिंतामणि' नावाचा बृहत् धर्मकोश लिहिला. या कोशाचे दानखंड, तीर्थखंड, व्रतखंड, मोक्षखंड, व परिशेष खंड हे पाच खंड आहेत. शिवाय त्याने महाकवी कालिदासाचे रघुवंश महाकाव्यावर मराठीत 'दर्पण' नावाची टीकाही लिहिली, असा उल्लेख सांपडतो. पण दानखंड व व्रतखंड वगळता त्याचे इतर ग्रंथ दुर्मिळ आहेत. हा मूळ विदर्भ प्रदेशातील असून, त्याचे वडिलांचे नाव कामराज असे होते. त्याचे वेदपद नावाचे गाव वर्धा नदीचे तीरावर होते. हेमाद्रिचा मित्र बोपदेव हा संस्कृत भाषेचा मोठा विद्वान् पंडित व भागवत धर्माचा मोठा पुरस्कर्ता होता. मुक्ताफळ हा त्याचा भागवतावरील प्रसिद्ध टीकाग्रंथ अतिशय रसाळ आहे. मुग्धबोध हा व्याकरणग्रंथ त्यानेच रचला व तो अजून बंगालात प्रचलित आहे. हेमाद्रीही पंढरपूरचे विठ्ठलाचा परमभक्त असून, पंढरपूरच्या चौऱ्यांशीचे लेखात त्याचे नावाचा उल्लेख आलेला आहे. अशा ह्या विद्वान राजकारणी व राजदरबारी वावरलेल्या अद्वितीय पुरुषाला यादव दरबारातील राजकीय लेखसंग्रहाची चांगलीच माहिती असली पाहिजे.[३] व्रतखंडाचे शेवटी त्याने यादव राजघराण्याची प्रशस्ती गायली आहे. या राजप्रशस्तीच्या दोन संहिता आपणांस उपलब्ध होतात. व्रतखंडाच्या काही पोथ्यांतून एक २४

---

२. या विवेचनाचे पार्श्वभूमीवर डॉ. अळतेकरांचे "The Jaina tradition looks more like mythological legend than actual history." हे मत चिंत्य वाटते. ३. 'समस्त हस्तिपकाध्यक्षयो निजगुणसुभगभावुके भावुके समस्तकरणाधिपत्यमंगी कुर्वाणेच निर्ज्जित झाडीमंगले मंत्रीचुडामणी गुणरत्नरोहणाद्रौ हेमाद्रौ।' रामचंद्रदेव यादवाचा, ठाणे-ओवळे ताम्रपट. Epigraphia India, Volume XIII, page-198-206.

श्लोकांची छोटी व काही पोथ्यांतून ५२ श्लोकांची मोठी राजप्रशस्ती सापडते. प्रारंभीच-

**उन्मीलत्कमनीयकांतिसरसीममध्ये विबुद्धप्रभं**

**सारासारविचारचारुमनसा हंसेन संसेवितं**

**नित्यानंदपरागसंगसुभगं वन्दारुवृंदारक**

**श्रेणीभंगमनंगवैरिचरणाम्भोजद्वयं पातु वः ॥**

अशी श्रीकृष्णाच्या अपार वैभवाची स्तुती केल्यानंतर हेमाद्रीने यादव घराण्याचा इतिहास थेट पौराणिक काळापासून सुरू केला आहे. इन्दु (सोम, चंद्र) बुध, पुरुरवा, आयु, नघुष, ययाति, यदु ह्यांचेपासून तर दृढप्रहारापर्यंत ५५ राजांची नावे त्याने दिली आहेत. अर्थात् ह्यात ऐतिहासिक तथ्य नसले तरी हेमाद्रीची लेखनसरणी व तपशील पुरविण्याची त्याची दक्षता ह्याचा आपणास चांगलाच परिचय होतो. यादवांचे काही शिलाताम्रशासनातही यादव घराण्याची वंशावळ देताना पौराणिक राजांची नावे दिली असून यादवांचे सोमवंशाची मोठी प्रशस्ती गायली आहे.[४] मध्ययुगीन संस्कृतीला ही गोष्ट काही नवीन नाही. आपली वंशावळ यदु, राम सात्यकि, कर्ण, अग्नि, लव, कुश ह्यांच्यासारख्या पुराणप्रसिध्द व्यक्तींशी नेऊन भिडविणे ही त्यावेळी पद्धतच होती. ह्या वर्णनात मोठ्या राजप्रशस्तीमधील पहिले १९ श्लोक कामास आले आहेत.

१९व्या श्लोकात सुबाहू ह्याला चार पुत्र झाले व पित्याने त्यांना चार दिशांचे राज्य वाटून दिले असे हेमाद्री सांगतो. त्यापैकी -

**दृढप्रहारी दिशि दक्षिणस्यां प्रभुर्बभूव प्रथमात्कनीयान् ॥२०॥**

म्हणजेच दृढप्रहारी ह्याला दक्षिण दिशेचे राज्य मिळाले. इथून हेमाद्री यादवांची ऐतिहासिक माहिती सांगायला सुरुवात करतो. ह्यात कधी एका श्लोकात तर कधी श्लोकार्धात एका एका यादव नृपतीचे वर्णन हेमाद्रीने दिले आहे. ही वंशावळ बरीचशी व्यवस्थित असून जिथे आपणांस शिलाताम्रलेखातून माहिती नीट मिळत नाही किंवा माहिती विस्कळित होते तेथे हेमाद्रीची साक्ष अचूक उपयोगी पडते.[५]

काही राजांचे पराक्रमाविषयी नवीनच माहिती हेमाद्रीकडून मिळते. उदाहरणार्थ- भिल्लम पाचवा याच्या प्रशस्तीपर लिहिलेल्या-

**यः श्रीवर्धनमाससाद नगरं क्षोणिपतेरन्तला**

**यः प्रत्यंडक भूभृतं च समरे दृष्टं द्रुग्जेष्ट क्षणात्**

४. रामचंद्रदेवाचा पैठण ताम्रपट, कृष्णदेव यादवाचा तासगांव ताम्रपट, इ. पहा. ५. उदाहरणार्थ- इरम्मदेवाचे अश्वी ताम्रपटातून त्याचे सिंघणदेव प्रथम ह्याचेशी नाते स्पष्ट होत नाही. पण हेमाद्री- तस्यानुजस्तदनु भुवलयं वलीयान् । अत्रायत त्रिजगतीविजयी स राजा ॥ ३१॥ ह्या श्लोकात सिंघण प्रथम हा इरमदेवाचा धाकटा भाऊ असल्याचे बरोबर सांगतो. अशी बरीच उदाहरणे सांगता येतील.

**यो वा मंगलवेष्टकं क्षितिपतिं श्री बिल्लणं जघ्निवान्**

**कल्याणश्रियमप्यवाप्य विदधे यो होसलेशं व्यसुम्॥३८॥**

या श्लोकात पाचव्या भिल्लमाने श्रीवर्धन (बीड), प्रत्यंडक (परांडा, जि. उस्मानाबाद), मंगळवेढा (जि. पंढरपूर) या ठिकाणी मिळविलेल्या विजयांचे वर्णन आपणास प्रथमच प्राप्त होत आहे, हे वर्णन इतरत्र शिलाताम्रशासनात प्राप्त होत नाही.

या राजप्रशस्तीत हेमाद्रीचे काव्यगुणही दिसून येतात. उदाहाणार्थ– वेसुगीचा पुत्र चौथा भिल्लम व त्याचा पुत्र सेऊणचंद्र दुसरा ह्यांच्या वर्णनासाठी आलेला–

**ततोपि नृपभिल्लमः समरसीमभीमक्रिय :**

**निरर्गलभुजार्गलायुगलकाललीलालयः**

**ततः समरमेदिनीपतिपतंगभंगव्रतः**

**प्रतापशिखिलंघितारिजगदंगण सेऊणः ॥ २८ ॥**

हा श्लोक पहा. दोन्ही राजप्रशस्तीच्या मिळून अंदाजे पाऊणशे श्लोकात बरेच श्लोक काव्यदृष्ट्या सरस उतरले आहेत. एकूण यादवांचा प्रारंभिक इतिहास समजून घेण्याचे दृष्टीने हेमाद्रीची व्रतखंडातील राजप्रशस्ती अतिशय उपयोगी पडते. पाचव्या भिल्लमाने देवगिरिला राजधानी स्थापन केल्यापासून पाचवा भिल्लम, जैत्रपाल प्रथम, सिंघणदेव द्वितीय, कृष्णदेव, महादेव व रामचंद्रदेव ह्यांचे अनेकानेक शिलालेख व ताम्रपट उपलब्ध होतात. पण त्याआधी यादव सेऊणदेशात नांदत असता, त्याच्या उपलब्ध शिलाताम्रशासनाची संख्या बारा-तेराचे घरात आहे, तेव्हा हेमाद्रीची राजप्रशस्ती हा आपणास मोठाच आधार आहे. या राजप्रशस्तीशिवाय सेऊणदेशकर यादवांचा सुसंगत इतिहास आपणांस लिहिता आला नसता. यातून एक असाही तर्क संभवतो की, ज्या अर्थी हेमाद्रीने आपला ग्रंथ महादेवराय यादवाचे काळात (शके ११८२-११९३ किंवा इ. स. १२६०-१२७१) ह्या काळात रचला व त्यात अगदी प्रथम राजा दृढप्रहारी (अंदाजे इ. स. ८५०) पासूनची माहिती आहे; त्या अर्थी यादवांच्या अभिलेखागारात त्यांच्या घराण्याची माहिती सांगणारी बरीच साधनें वा बखरी असाव्यात व त्यांचाच उपयोग करून हेमाद्री आपली माहिती सजवू शकला असावा. इतिहासाचार्य कै. विश्वनाथ काशीनाथ राजवाडे ह्यांनी हाच तर्क पण दुसऱ्या संदर्भात मांडला आहे.

नासिक्यकल्प आणि व्रतखंडातील राजप्रशस्ती याचा अपवाद वगळता यादव घराण्याविषयी माहिती देणारे अन्य संस्कृत-प्राकृत वा मराठी ग्रंथ फारसे उपलब्ध नाहीत. याला अपवाद म्हणजे श्रीचक्रधरांच्या लीळाचरित्रात रामचंद्रदेवाने आपला चुलतभाऊ आमणदेव ह्याला पदच्युत करून राज्य मिळविले, या घटनेचा उल्लेख 'राज्यांतरकथन' ह्या लीळेत येतो, तेव्हढाच, लीळाचरित्रात इतरही यादव घराण्यातील कृष्णमहादेव व रामचंद्रदेव ह्याचे त्रोटक उल्लेख येतात.

महानुभावीय ग्रंथ स्मृतिस्थळात यादव रामचंद्रदेव यांचा पुत्र सिंघण तृतीय, रामचंद्रदेवाची राणी कामाइसा यांचा उल्लेख येतो.

यादव राज्याचा शेवट दिल्लीचा सुलतान अल्लाऊद्दीन खलजी ह्याच्या आक्रमणामुळे झाला. यादव सत्तेने इस्लामी आक्रमणाविरूद्ध जी प्राणपणाने झुंज घेतली, त्याबद्दलचे उल्लेख अर्थात्च फारशी साधन ग्रंथांतून येतात, तो भाग लिहिताना खालील फारशी ग्रंथांचा उपयोग केला आहे.

| | |
|---|---|
| १) अमीर खुसरो | तारीख-इ-अताई |
| | आशिक किंवा दावलखानी व खिज्रखान |
| | नूह-सिपर |
| २) झियाऊद्दीन बारानी | तारीख-इ-फिरोजशाही |
| ३) इसामी | फूतुह सलातीन |
| ४) महंमद कासीम | तारीख -इ-फेरिश्ता |
| हिंदूशाह फेरिश्ता | |

वरील ग्रंथांचे माहितीसाठी शक्यतो इलियट व डॉसन ह्यांनी केलेल्या भाषांतरावर विसंबलो असून, ज्या ठिकाणी मार्गदर्शनाची गरज पडली. त्या ठिकाणी आम्हास पर्शियन भाषेचे प्राथमिक धडे देणारे आमचे आदरणीय शिक्षक श्री सय्यद अमजदअलीसाहेब (शिक्षक, चेलीपुरा हायस्कूल, औरंगाबाद) ह्यांची मोलाची मदत झाली आहे.

याशिवाय जल्हणाची सूक्ती-मुक्तावली व चंदबरदाईचा पृथ्वीराजरासो यांचाही उपयोग करून घेतलेला आहे. असो.

या साधनांचा उपयोग करूनच वेळोवेळी अनेक इतिहासकारांनी या वंशाचे इतिहासाचा परामर्ष घेतला आहे. त्यापैकी यादव इतिहासाची प्रथम सुसंबद्ध मांडणी आपणांस प्रख्यात संशोधक डॉ. रा. गो. भांडारकर यांच्या Early History of Deccan ह्या ग्रंथात आढळते. त्यांनी जरी स्थलाभावास्तव हात आखडता घेतल्याचे दिसत असले, तरी त्यांनी यादव इतिहासाची निर्दोष क्रमसंगती [chronology] लावण्याचा प्रयत्न केला आहे. हेमाद्रीचे राजप्रशस्तीचा त्यांनी पुरेपूर उपयोग करून घेतला असून, शेवटी राजप्रशस्तीचा उताराही दिला आहे.

ॲडव्होकेट केशव आप्पा पाध्ये यांनी आपल्या 'हेमाद्रि उर्फ हेमांडपंथ' या चरित्र ग्रंथात या वंशाचे इतिहासाची माहिती बहुतेक डॉ. रा. गो. भांडारकरांचे ग्रंथावरून मिळवून दिली आहे. त्यांचा प्रयत्न स्तुत्य असला, तरी इतिहास संशोधनाचे शिस्तीशी [Methodology] परिचय नसल्यामुळे व त्यांच्या व्यवसायभिन्नत्वामुळे अनेक ठिकाणी घोटाळे झाले आहेत.[६] तरी यादव

६. 'अक्षरवटीका' [orthography] या शब्दासाठी 'अक्षर व टीका' असे शब्द वापरणे, शिलाताम्रशासनातील मजकूर अशुद्ध स्वरूपात लिहिणे पाल्हाळ इत्यादि अनेक उदाहरणे दाखवतां येतील.

घराण्याचा इतिहास मराठीत सांगणारा पहिलाच ग्रंथ म्हणून पाध्ये यांच्या पुस्तकाचे मोल मोठे आहे, हे निःसंशयच. त्यांनीही परिशिष्टात हेमाद्रीच्या दोन्ही राजप्रशस्ती व अनेक शिलाताम्रशासनांचे वाचन देऊन ग्रंथास पूर्णता आणली आहे.

डॉ. गुलाम याझदानी यांनी संपादित केलेला Early History of Deccan हा ग्रंथही उपयुक्त असून, त्यातील यादव इतिहासाबद्दलचा भाग डॉ. अनंत सदाशिव अळतेकर ह्या अधिकारी विद्वानाने लिहिला आहे. पण ह्यात यादवांचे प्रारंभिक इतिहासाकडे अतिशय दुर्लक्ष झाले असून, सिंघणदेव द्वितीय, कृष्णदेव वगैरे उत्तरकालीन सम्राटांचे कारकिर्दीवरच सर्व भर देण्यात आला आहे.

कै. डॉ. मुरलीधर गजानन पानसे ह्यांचा 'यादवकालीन महाराष्ट्र' हा ग्रंथही उल्लेखनीय आहे. पानसेंचा भर यादवकालीन महाराष्ट्राची आर्थिक, सामाजिक व धार्मिक जडण-घडण सांगण्यावर आहे. त्यात यादव घराण्याचे राजकीय इतिहासाचे वाट्यास उणी-पुरी चौदा पाने आली आहे. तरीही त्रोटक स्वरूपात का होईना, त्यांचा ग्रंथ यादव इतिहासाचा धावता आढावा घेतो हेही निःसंशय कमी नाहीच.

यादव इतिहासावर लिहिणारे आधुनिक लेखक म्हणजे डॉ. ओंकारप्रसाद वर्मा. त्यांनी Ph. D. ह्या पदवीसाठी लिहिलेला प्रबंध The Yadavas & their times हा पुस्तकरूपाने विदर्भ संशोधन मंडळ, नागपूर ह्या संस्थेतर्फे प्रकाशित केला आहे. त्यांच्या शोधप्रबंधाचे काम प्रख्यात इतिहास संशोधक डॉ. वासुदेव विष्णू मिराशी ह्यांचे मार्गदर्शनाखाली झाले असल्याने ह्या ग्रंथाचे महत्त्वाबद्दल वेगळे लिहावयास नको. प्रस्तुत ग्रंथात त्यांच्या ग्रंथातील माहितीचा आवश्यक त्या ठिकाणी उपयोग केला आहे व लेखक त्यांचा त्याबद्दल सदैव ऋणी राहील.

वरील सर्व विवेचनाचा निष्कर्ष असा की, यादव घराण्याचा इतिहास विस्तृतपणे साद्यंत व सांगोपांग असा सांगणारा ग्रंथ मराठीत एकही नाही. महाराष्ट्रात स्वतंत्र मराठी भाषेचा पाया घालणाऱ्या, मराठी माणसांच्या संस्कृतीची घडण करणाऱ्या, मराठी साहित्याला उदार आश्रय देणाऱ्या व महाराष्ट्राला ललामभूत असणाऱ्या या वंशाचा इतिहास मराठी वाचकास ठाऊक व्हावा, म्हणून आम्ही या उपक्रमास प्रवृत्त झालो आहोत.

****

# यादवांचा प्रारंभिक आणि पौराणिक इतिहास

इसवी सनाच्या सातव्या शतकात हर्षवर्धनाचे विशाल साम्राज्याचा अस्त झाला. लागोपाठ भारतावर इस्लामी आक्रमणे सुरू झाली. परिणामतः भारतावर कोणतीही एक अधिसत्ता संपूर्ण साम्राज्य स्थापन करू शकली नाही. या धामधुमीचे काळात अनेक नवीन राजघराणी उदयास आली. परमार, चाहमान, चालुक्य, कलचुरि, चंदेल, पाल इत्यादि अनेक कुलांनी या संधीचा फायदा घेऊन आपल्या राज्यांच्या सीमा वाढविण्याचा सतत प्रयत्न केला. मध्ययुगीन भारताचा इतिहास हा या राजघराण्यांच्या आपसातील सततच्या युद्धांनी भरलेला आहे. स्वपराक्रमाचे जोरावर भाग्य काढू इच्छिणाऱ्या साहसी वीरांना हा काळ सर्वस्वी अनुकूल होता. असे वीर, त्यांचे भीषण पराक्रम, मान-सन्मान आणि नीती-अनीतीबद्दलच्या त्यांच्या धीरोदात्त कल्पना ह्यांनी मध्ययुगातील अनेक कथा-काव्यांना, नाटकांना आणि आख्यायिकांना विषय पुरविले आहेत.[१]

नव्याने उदयाला येणाऱ्या या राजकुलांना समाजात मानमान्यता मिळणे हा मोठाच प्रश्न होता. सामान्यतः या घराण्यांचा प्रारंभिक इतिहास म्हणजे देशातील अस्थिरता व अराजक ह्यांचा फायदा घेऊन एखादा साहसिक तरुण पुढे येणे. त्याने स्वतःचे भुजबलावर एखादे छोटेसे राज्य संपादित करणे, हळू-हळू त्यांचे साम्राज्याचा विस्तार होणे असाच असतो. एकदा आपले राज्य स्थिर झाल्यानंतर ही राजघराणी स्वतःस मानमान्यता मिळविण्यासाठी आपल्या घराण्याचे मूळ थेट सूर्य, चंद्र, अग्नि ह्यांच्यासारख्या देवतांशी किंवा नल, सात्यकि, लव, कुश, पांडव, कार्तवीर्य, हैहय ह्यांच्यासारख्या पुराणप्रसिद्ध वीरांशी जोडण्यात धन्यता मानीत. परमार, प्रतिहार, चाहमान आणि चालुक्य ह्या चार घराण्यांचे मूळ पुरुष वसिष्ठ ऋषींनी अर्बुद (अबूचा पहाड) पर्वतावर केलेल्या यज्ञाचे अग्नीतून उत्पन्न झाले, असे चंदबरदाईचा ग्रंथ 'पृथ्वीराज रासो' सांगतो. त्यातही उपर्युल्लेखित घराण्यांना प्रतिष्ठा प्राप्त करून देण्याचाच हेतू दिसतो. कधी कधी ह्यासाठी रचलेल्या कथा अगदी कृत्रिम आणि केवळ काम भागविण्यासाठी रचलेल्या असत. हे त्या कथांच्या थोड्याशा निरीक्षणावरून तेव्हाच ध्यानात येऊ शकते. वसिष्ठ ऋषींच्या यज्ञाग्नितून पुरुष निर्माण होणे ही कथा अशीच काल्पनिक आहे.[२] देवगिरीच्या यादवांबरोबरच दक्षिणेत उदय पावलेल्या द्वारसमुद्रच्या होयसळ राजघराण्याच्या मूळ पुरुषाबद्दलची कथा वरील प्रकारचे सुंदर उदाहरण

---

१. विल्हणाचे नवसाहसांकचरित देवचरित, सोमेश्वर कवींची कीर्तिकौमुदी, जयसिंहाचे हम्मीरमदमर्दन, चंदबरदाई भाटाचा पृथ्वीराज रासो, मेरूत्तुंगाचा प्रबंध चिंतामणी ही काव्ये ह्याच प्रकारची आहेत. स्वतःचे राज्य सोडून मराठवाड्यात नशीब काढण्यासाठी आलेला परमार भोजाचा पुतण्या जगद्देव व त्याची साहसिक कृत्ये यांबद्दलचा एक विस्तृत लेख आम्ही नुकताच प्रकाशित केला आहे. (केतकर पत्रिका, नांदेड १९७३). २. मिराशी वा. वि., कलचुरिनृपति आणि त्यांचा काळ, पृष्ठ ३.

आहे.[३] क्वचित् प्रसंगी एकाच घराण्याच्या दोन शाखा आपली मूळ कथा वेगवेगळ्या तऱ्हेने मांडत. उदहरणार्थ, त्रिपुरीचे कलचूरि स्वतःस सोमवंशी समजून आपली वंशावळ सोम-चंद्र-बुध-पुरुरवा-भरत-हैहय अशी देतात.[४] तर त्यांचीच शाखा असलेले रत्नपूरचे कलचूरि स्वतःस सोमवंशी समजतात व सुर्य-मनु-कार्तवीर्य असा आपल्या वंशावळीचा क्रम सांगतात

देवगिरीचे यादवही ह्या नियमाला अपवाद नाहीत, तेही स्वतःला सोमवंशी म्हणवून घेतात. त्यांच्या शिलाताम्रशासनातून इंदु किंवा सोम ह्यांची काव्यमय वर्णने वारंवार येतात. उदाहरणार्थ, रामचंद्रदेव ह्याचे एकनाथ संशोधन मंदिर ताम्रपटातील पुढील वर्णन पहा.[५]

**लक्ष्मीनारायणक्रीडासरःक्षीरसमुद्रजं**
**लीलांबुजं विजयते विधुस्त्रिभुवनश्रियः ॥ १ ॥**
**निःसीमः सोमवंशःस जयति जगति प्रोल्लसत्कीर्तिवल्लीः**
**मुक्तारत्नानि तत्राप्युरुरुचिररुचीः वृष्णयः स्वच्छवृत्ताः**
**तेष्वप्येकावलीसद्गुणघटिततनुः कंठकांतिः कवीनां**
**तस्यामप्येष चिंतामणिःरुचिररुचिर्नायकः सिंहभूपः ॥ ३ ॥**

अशाच आशयाची वर्णने यादवांच्या अनेक लेखात आढळतात.[६]
हेमाद्रीनेही आपल्या राजप्रशस्तीत-

**संतानचिंतामणिकामधेनु**
**कल्पद्रुमश्रीजनकैकहेतोः**
**सिंधोरमुष्मादुदभूदमंद**

---

३. ह्या कथेचा सारांश असा-

'एकदा सळ (किंवा साल) नावाचा जैन श्रावक वासंतिका देवीचे मंदिरात (हे मंदिर सोसेवरू किंवा शशपूर, ता. मुंदगेरे, जि. कडूर या ठिकाणी आहे) सुदत्त वर्धमान नामक जैन आचार्यांकडून धर्मश्रवण करीत असता, एक वाघ त्यांचे अंगावर धावून आला. तेव्हा आचार्य मोठ्याने ओरडले, "पोय ! सळ !" (हे सळा ! मार !) आणि सळाने (बहुधा कट्यारीचे) एकाच वारात वाघाला ठार केले. त्यावरून त्या पुरुषाचे वंशाला 'पोयसळ' ह नाव पडले. प्राचीन कानडीत 'प' बद्दल 'ह' हा विकार होतो. जसे पोन्नु > होन्नु, पेरमाडि > हेरमाडि, पिंपळगांव > हिंपळगांव, पुलि > हुलि वगैरे. त्यानुसार प घा ह होऊन पोयसळ किंवा होयसळ हे नांव रूढ झाले. (या कथेचे विस्तृत विवेचनासाठी पहा. ) Saletore R. A., Mediaeval Jainism, Page 63. ४. Journal of Bengal Asiatic Society, Vol. XXXI, Page 111. ५. Corpus Inscriptionum Indicarum, Vol IV, Page-401-409. ६. E. I. Vol. II, Page 217, I. A., Vol. XvII Page 120, JBBRAS, vol. XII, Page 42. इत्यादि लेख पहा.

**निःस्पंदमानामृत बिंदुरिंदु ॥ ३ ॥**

असे चंद्राचे वर्णन करून मगच राजवंशावली देण्यास प्रारंभ केला आहे. भगवद्गीतेवरील आपल्या मराठी टीकेचा समारोप करताना श्रीज्ञानेश्वरांनी रामचंद्रदेव यादवांचे राजवटीचा उल्लेख-

**तेथ इंदुवंशविलासु। जो सकलकळांनिवासु**

**न्यायाते पोखीत क्षितीशु। श्रीरामचंद्र॥**[७]

या ओवीने करून वरील कल्पनेचाच पुनरुच्चार केला आहे. अर्थात् हा आपली वंशावळ थेट चंद्राशी नेऊन भिडविण्याचा प्रयत्न आहे. त्यात ऐतिहासिक सत्याचा भाग शोधणे व्यर्थ होय.

वर आपण त्रिपुरीचे कलचुरि स्वतःची वंशावळ चंद्र-बुध-पुरुरवा अशी देतात, हे पाहिले. पण त्यांना कोठेहि यादववंशी म्हटलेले आढळत नाही.[८] उलट देवगिरीचे यादव स्वतःला कटाक्षाने 'यदुवंशी' किंवा 'यादववंशी' म्हणवून घेतात व 'यादवनारायण', 'यादवचक्रवर्ती', 'यादवकुलकमलकलिकाविकासभास्कर' 'यादवेन्दु' 'यादवनाथ' इत्यादि बिरुदे मोठ्या अभिमानाने धारण करतात.[९] इतकेच नव्हे तर यादवांचे अनेक शिलाताम्रशासनातून त्यांच्या पौराणिक वंशावळीही देण्याचा प्रयत्न केलेला असतो. यादव भिल्लम द्वितीय ह्याचे संगमनेर ताम्रपटात यादवांची वंशावळी ब्रह्मा-मरीचि-अत्रि-इंदु-पुरुरवस्-आयु-नघुष-ययाति अशी दिलेली आहे, तर रामचंद्रदेव यादवांचे पैठण ताम्रपटात राजांचे नावांचे यादीत विष्णू-विरिंची (ब्रह्मा)-अत्रि-चंद्र-पुरुरवस्-ययाति हा क्रम आढळतो.[१०] हेमाद्रीने आपल्या राजप्रशस्तीत यादवांची वंशावळ देताना दृढप्रहार ह्या ऐतिहासिक यादव राजांचे आधी इंदु-बुध-पुरुरवस्-आयु-नघुष-ययाति-यदु-क्रोष्टा-स्वहित-नृशंकु-चित्ररथ-पृथुश्रवा-सुयज्ञ-उशना-स्थितेयु-मरुत-विक्रम-कंबलबर्ही-रुक्मक-पराजित-जामय-विदर्भ-क्रथ-कुंति-वृष्णि-निवृत्ति-व्योमाच्छ-जीमूत-भीमरथ-नवरथ-दशरथ-शकुनि-करंभि-देवरात-देवक्षेत्र-मधु-कुरु-बल-पुरुहोम-आयु-सात्वनत्-अंधक-भजमान-विदुरथ-स्वयंभोज-हृदिक-इद्रूष-वसुदेव-मुरारि-प्रद्युम्न-अनिरुद्ध-यक्ष-वज्र-प्रतिबाहु-चक्रवाल-सुबाहु इतक्या पौराणिक राजांची नावे दिली आहेत. हेमाद्रीने आपल्या यादीचा जाणूनबुजून बराच विस्तार केलेला दिसतो. यात ऐतिहासिक सत्याचा भाग कमी असला, तरी हेमाद्रीची विस्तारपूर्वक लिहिण्याची धाटणी आणि बारीक माहिती पुरवण्याची दक्षता

७. ज्ञानेश्वरी, संपादक राजवाडे वि. का., अध्याय १८, ओवी १७८३ ८. मिराशी वा. वि., कलचुरि नृपति आणि त्यांचा काळ, पृ. २. ९. तुळपुळे शं. गो., प्राचीन मराठी कोरीव लेख, क्र. ३४ पृ. १७६, क्र. २५, क्र. ३९, पृ. १५४. दक्षिणच्या मध्ययुगीन इतिहासाची साधने, खंड १ पृ. ५६-७८, खंड २ पृ. १८, शिवाय V. I. Vol. XV p. 383, I. A. Vol. XVII, page 120 इत्यादि यादव लेख पहा. १०. I. A. Vol. XVII, page 324.

याचा परिचय आपणास होतो.

याच कल्पनेचा आणखी एक पदर म्हणजे यादव स्वतःला 'द्वारावतीपुरवराधीश्वर' किंवा द्वारकेचे स्वामी समजत असत.[११] यादवनृपती सेऊणचंद्र द्वितीय ह्याचे वसई ताम्रपटात व आइरमदेवाचे अश्वी ताम्रपटात दृढप्रहाराचे वर्णनासाठी-

**आदौ ख्यातो दृढप्रहारनृपतिः श्रीविष्णुरूपः स हि**
**प्रायातो निजवंशशेखरतनुर्द्वारावतीपत्तनाद्**
**संग्रामे रिपुहस्तिपत्तिशिरसा संच्छेदभेदे दृढः**
**चंद्रादित्यपदं प्रसिद्धमकरोत् प्राक्संभवं यो भुविः ॥**

हा श्लोक येतो. यात दृढप्रहार हा द्वारावती किंवा द्वारका नगरीहून आला, असे स्पष्टच म्हटले आहे. हेमाद्रीने आपल्या राजप्रशस्तीत याच कल्पनेचा पुनरुच्चार केला असून, द्वारकेचा राजा सुबाहु ह्याला चार पुत्र होते आणि त्याने आपल्या राज्याचे चार भाग करून त्यांना वाटून दिले, त्यात दृढप्रहाराला दक्षिणेचे राज्य मिळाले, असे वर्णन केले आहे.[१२]

'नासिक्यकल्प' हा जैन ग्रंथही सांगतो की, दुर्वास ऋषींची द्वारका जाळल्यानंतर यादव वज्रकुमाराची गर्भवती पत्नी चंदप्रभू स्वामींचे आश्रयाला सेऊणदेशात आली व तिने दृढप्रहाराला जन्म दिला.

यादवांच्या पौराणिक इतिहासाचा विचार आपण थोडक्यात पाहू. शतपथ ब्राह्मणात आपणांस प्रलय आणि त्यापासून मानवजातीला वाचवणारा मनु यांचे वर्णन सापडते. भारतीय श्रद्धेनुसार मनु हा मानवजातीचा मूळ पुरुष मानला जातो. मनूच्या नऊ मुलांमध्ये इल हा थोरला होता.[१३] या इलेला सोम किंवा बुध ह्यांचेपासून पुरुरवस् हा पुत्र झाला. हा पुरुरवाच सोमवंशाचा किंवा ऐलवंशचा संस्थापक मानला जातो. त्याने सप्तद्वीप पृथ्वीवर राज्य करून शंभर अश्वमेध

---

**११. मध्ययुगातील बहुतेक सर्वच राजवंश आपल्या मूळ ठिकाणाचे नांव मोठ्या अभिमानाने शिलाताम्रशासनातून उल्लेखित असत. उदाहरणार्थ, शिलाहारांचे 'तगरपुरवराधीश्वर' राष्ट्रकुटांचे 'लट्टनौरविनिर्गत' ही बिरुदे पहा. आपण द्वारकेहून आलो, हे सांगण्यात एकट्या यादवांचा वाटा नाही. तर द्वारसमुद्रचे होयसळही स्वतःला 'द्वारावतीपुरवराधीश्वर' हे बिरुद लावीत असत, असे त्यांच्या हळेबीडु येथील लेखावरून दिसते.**

**१२. तेन ते सार्वभौमेन तनया विनयान्विता ।**
**विभज्य वसुधाचक्रं चक्रिरे पृथिवीश्वराः ॥ १९ ॥**
**यथा विभागं वसुधामशेषां तेषां तदा पालयतां चतुर्णाम् ।**
**दृढप्रहारी दिशि दक्षिणस्यां प्रभुर्बभुव प्रथमात्कनीयान् ॥ २० ॥**

**१३. Pargiter, Ancient Indian Historical Tradition, Page 84.**

केले, असे म्हटले जाते. परंतु त्याने दुर्मद होऊन ऋषींचा अपमान केला, तेव्हा ऋषींनी त्याचा नाश केला आणि त्याचा मुलगा आयु ह्याला राज्यावर बसविले. या आयूचा विवाह स्वर्भानू दानवाची कन्या प्रभा हिच्याशी झाला. आयुनंतर नहुष किंवा नघुष हा सोमवंशाचा राजा झाला. नहुषाचे स्वर्गावर आक्रमण व तिथून त्याचे पतन इत्यादि कथा महाभारतात आहे.[१४] त्यानंतर ययाति हा सिंहासनावर बसला. त्याला यदु, तुर्वसु, अनु, द्रुहयू व पुरु असे पाच पुत्र होते. त्यापैकी यदुला चर्मण्वती (चंबळ), वेत्रवती (बेटवा) आणि शुक्तिमती (केन) या नद्यांचे तीरांचा प्रदेश ययातीने दिला. यदुचा मुलगा क्रोष्टा हाही पराक्रमी होता. ह्या क्रोष्ट्याचे वंशासच यादव म्हणून संबोधिले जाते.[१५]

यानंतरचा महत्त्वाचा राजा म्हणजे विदर्भ हा होय. त्याच्या क्रथ किंवा भीम, कैशिक व लोमपाद या तीन पुत्रांनी, तीन स्वतंत्र राज्ये स्थापन केली.[१६] याच वंशातील भीमरथाची कन्या दमयंती, निषाद देशाच्या नल राजाला दिली होती.

यानंतरचा पराक्रमी राजा म्हणजे भीम सात्वत हा होय. ह्याला भजमान, देवदृढ, अंधक आणि वृष्णि असे चार पुत्र होते. देवदृढाचे राज्य पर्णाशा किंवा बनास नदीचे तीरी होते. त्याच्या वंशजांना मार्त्तिकावतचे भोज म्हणतात. अंधकाचे राज्य मथुरेत होते. वृष्णिच्याच वंशात वसुदेव आणि त्याचा पुत्र वासुदेव कृष्ण आले. त्याच्याच कालात यादवांमध्ये अंतर्गत कलह होऊन त्यांचा नाश झाला.

आर्यांचे संस्कृतीचा भारतवर्षात प्रसार होण्यासाठी जे वंश आणि टोळ्या यांनी महत्त्वाचे कार्य केले त्यात यादववंशाचे नाव प्रामुख्याने घ्यावे लागेल. त्यांनीच राजपुताना, माळवा, मध्यप्रदेश, महाराष्ट्र इत्यादि प्रदेशात आपली राज्ये स्थापन करून त्या त्या प्रदेशात संस्कृतीचा प्रचार केला.[१७] यादव हे जरी आर्य होते,तरी ते अनार्यात उदारमनस्कतेने मिसळत असत. आणि त्यांच्याशी वैवाहिक संबंधही जोडीत असत आणि म्हणूनच पुराणातून त्यांना राक्षसवंशात घातले आहे आणि कदाचित् नीच्य व अपाच्यही म्हटले आहे . वेदात यदु, तुर्वश, अनु, द्रुह्यू आणि पुरु या यादव टोळ्यांना पंचजन असे नामभिधान आहे. त्यांना नाभिषेक (अभिषेकास पात्र नसलेले) अशी संज्ञा दिलेली आहे. प्रख्यात संशोधक डॉ. प्रिझ्युल्स्की त्यांना अनार्य समजतात, पण ते पूर्णतः सत्य नाही.

ऐतिहासिक काळातही 'यादव' नाव धारण करणाऱ्या अनेक लहान-मोठ्या वंशाचा माग लागतो.

---

१४. महाभारत (संशोधित आवृत्ती). १५. The Vedic Age ( Bhartiya Vidya Bhavan), page 276-78. १६. Ibid, page 288. १७. Ibid, page 280.

१) कठियावाडातील लक्खामंडल प्रशस्तीत एका यादव कुलाचा निर्देश आहे. पण त्यांचा देवगिरीच्या यादव घराण्याशी काही संबंध होता किंवा कसे हे कळण्यास काही मार्ग नाही. [१८]

२) राष्ट्रकूट सम्राट अमोघवर्ष प्रथम ह्याचे हाताखाली पुलिगेरेनाडू या विभागावर शासन करणारा अधिकारी कुप्पेयरस हा स्वतःला यादववंशी म्हणवतो. [१९]

३) राष्ट्रकूट सम्राट कृष्ण द्वितीय ह्याचा महासामंत असलेल्या व कोगाली ५०० व मासेयवाडी १४० वर राज्य करणाऱ्या एका अधिकाऱ्यानेही उपर्युल्लेखित कुप्पेयरसाच्याच पदव्या स्वीकारलेल्या दिसतात. [२०]

४) राष्ट्रकूट सम्राट अकालवर्ष कृष्ण तृतीय ह्याचे हाताखालीही एका यादववंशीय महासामंत पुलिगेरे ३००, कोगाली ५०० व मासेयवाडी १४० वर शासन करताना दिसतो. [२१]

५) यादवनारायण हे बिरुद धारण करणाऱ्या नागवर्मरस नावाच्या महासामंताचा शके ९५४ चा लेख विजापूर जिल्ह्यातही मिळाला आहे. तो चालुक्य राजा पेर्मजगदेकमल्ल ह्याचा महासामंत होता. [२२]

कर्नाटकातील ह्या कुलांचा प्रस्तुत ग्रंथाचा विषय असलेल्या देवगिरीकर यादव घराण्याशी काही संबंध होता किंवा कसे, हे सांगणे कठीण आहे.

यादव शिलालेखात वारंवार आढळणारे आणखी एक बिरुद 'विष्णुवंशोद्भव' हे आहे.[२३] यादवांचे राजचिन्हही विष्णूचे वाहन सुवर्ण गरुडध्वज (बसलेल्या अवस्थेत गरुड व बाजूला दोन शंख किंवा शंख व चक्र) होते आणि ते त्यांच्या ताम्रशासनाच्या कडीवर सापडते.[२४] त्यांच्या ध्वजावरही सुवर्ण गरुडध्वजाचे चिन्ह असे.[२५] क्वचित् राजचिन्हासाठी हनुमानाचाही उपयोग केलेला दिसतो. [२६]

****

१८. E. I., Vol. I, page 2. १९. E. I., Vol. XIII, page 177. २०. South Indian Inscriptions, Part I, No. 22. २१. Bombay Karnataka Inscriptions, Ny. 30. २२. South Indian Inscriptions, Part I, No. 66. २३. इतिहास आणि संस्कृति, पुस्तक सोळावे, जानेवारी १९६८, पृष्ठ ८९. २४. E.I., Vol. XXXVI, page 249-256, JBBRAS (NS), Vol. III, page 189. २५. Ibid, Vol. XI, page 28. २६. I. A., Vol. XIV, page 68.

# यादव राजकुलाचे महाराष्ट्रीयत्व

यादव राजघराण्याने आपल्या कर्तृत्वाचा प्रारंभ प्रथम मान्यखेटच्या राष्ट्रकूटांचे व नंतर कल्याणी चालुक्यांचे मांडलिक म्हणून केला. ह्या दोन्ही राजकुलांच्या शासनाखाली कर्नाटकाचा बराचसा भूभाग तर होताच, पण उत्तरेलाही त्यांच्या राज्याच्या सीमा विदर्भाचे उत्तर भागापर्यंत पोचल्या होत्या.[1] साहजिकच त्यांच्या हाताखाली बरीच सामंत घराणी होती. त्यांपैकी यादव हे नाशिक, नगर व औरंगाबाद ह्या जिल्ह्यांचे परिसरातील भागांचा व्यवहार पाहात असत. राष्ट्रकूट आणि चालुक्य कुलांचा कर्नाटकाशी घनिष्ट संबंध असल्यामुळे, यादवही कर्नाटकीय असा अपसमज सहजच रूढ झाला व काही संशोधकांनी हाच समज उचलून धरून यादवांना कानडी ठरवून टाकले. डॉ. कृष्ण, डॉ. पांडुरंगराव देसाई व 'मऱ्हाटी संस्कृति : काही समस्या' या प्रसिद्ध ग्रंथाचे लेखक शं. बा. जोशी यांनी वरील मत आग्रहाने मांडले आहे. त्यांची तर्कपरंपरा शक्य तो विस्ताराने खाली दिली आहे.

१) वरील विद्वानांचा पहिला तर्क असा की, यादव राजकुलातील कित्येक शासकांची नावे कानडी आहेत. उदाहरणार्थ-

| पुरुष नामे | स्त्री नामे |
|---|---|
| मल्लुगि, धाडियप्पा | लस्थियव्वा, व्होडियव्वा |
| भिल्लम, कन्नर | आवल्लदेवी, योगल्लादेवी |
| जैतुगि | हम्मा |

ही नावे कानडी वळणाची आहेत. त्या अर्थी यादव कर्नाटकीय असले पाहिजेत.

२) यादव राजघराण्यातील शासकांचे विवाह बहुधा कर्नाटकीय स्त्रियांशी झालेले आहेत. उदाहरणार्थ-

यादव घराण्यातील बद्दिगाचा विवाह राष्ट्रकूट सम्राट खोट्टिगाचा धाकटा भाऊ निरूपम दुसरा किंवा ध्रुव (किंवा धोरप्पा) यांची कन्या व्होडियव्वा हिच्याशी झाला. भिल्लम द्वितीय ह्यांची पत्नी लस्थियव्वा ही राष्ट्रकूट वंशातील झंझराजाची कन्या होती. ज्याअर्थी यादवांनी कर्नाटकीय राजकन्यांशी विवाह केले त्या अर्थी तेही कानडी असावेत.

१. राष्ट्रकूट सम्राट कृष्ण तृतीय ह्यांचा एक शिलालेख छिंदवाडा जिल्ह्यात नीलकंठी या गावी सापडला आहे. (Chhindwada District Gazetteer, page 222-3 ; Raj Bahadur Hiralal, List of Inscriptions in c. p. and Berar, page 93) तर चालुक्य विक्रमादित्य सहावा ह्याचा एक शिलालेख चांदा जिल्ह्यात भांदक ह्या गावी सापडला आहे. (E. I. vol. III, page 406 and Ibid. vol. XXXIII, page 254) तो नागपूरच्या सीताबर्डी भागात आणून ठेवला गेल्यामुळे सीताबर्डीचा लेख म्हणून ओळखला जातो.

३) तिसरा तर्क असा की, यादवांची शिलाताम्रशासने बहुधा कानडी भाषेतच लिहिलेली आढळतात. मराठी किंवा संस्कृत भाषेतील दानशासने संख्येने अल्प असून, त्यातील भाषाही अशुद्ध व हलक्या प्रकारची आहे.

४) आणखी एक तर्क असा की, देवगिरीचे यादव व द्वारसमुद्रचे होयसळ हे एकाच यादव कुळातील आहेत. होयसळही आपल्या घराण्याची उत्पत्ती यदुपासून झाली, असे सांगतात व द्वारावतीपुरवराधीश्वर हे बिरुद धारण करतात.[२] शिवाय द्वारावती नावाची गावे कर्नाटकात बरीच सापडतात.

| | | | |
|---|---|---|---|
| उदाहरणार्थ- | मेलकोटे | प्राचीन नाव | यादवपूर, द्वारावती |
| | मंत्रगुंडी | प्राचीन नाव | दक्षिणद्वारावतीपट्टण |
| | तळमलगे | प्राचीन नाव | नवद्वारावती |

शिवाय होयसळांची राजधानीही द्वारसमुद्र किंवा यादवपुरी होतीच. याचा अर्थ असा की, देवगिरीचे यादव हे द्वारसमुद्रच्या होयसळ यादवांपासून फुटून निघाले असून, भाग्य काढण्यासाठी उत्तरेत आले असावेत.

५) यादवकुलाचे एक प्राचीन नाव सेऊण किंवा सेगुण असून, ते दक्षिणेतील अनेक शिलाताम्रशासनात आढळते.[३]

ही तर्कपंरपरा मांडून वरील कानडी लेखक देवगिरीचे यादव राजकुलाला कर्नाटकीय ठरवतात. ते या घराण्याला जाणूबुजून 'सेऊण' हे नाव देतात व 'यादव' हे नाव टाळतात. परंतु हे सर्वच तर्क चुकीचे असून, सहज खंडनीय आहेत.

पहिला आक्षेप अगदीच निराधार आहे. भिल्लम, मल्लुगि, धाडियप्पा, इत्यादि नांव कानडी वळणाची खरी, परंतु तेव्हढ्यावरून संपूर्ण कुलाला कानडी ठरविणे कसे योग्य होईल ? या कुलातील अगदी प्रारंभीच्या दोन्ही शासकांची नावे दृढप्रहारी व सेऊणचंद्र ही तर संस्कृत नावे आहेत. पुढे यादवांनी प्रारंभी मान्यखेटच्या राष्ट्रकूटांचे आणि नंतर कल्याणीच्या चालुक्यांचे मांडलिकत्व स्वीकारल्यामुळे आपल्या सम्राट घराण्याचे कानडी वळणामुळे त्यांनी आपल्या घरातील नावे कानडी ठेवली, तर आश्चर्य वाटावयास नको. लोकमान्य टिळक आणि गोपाल कृष्ण गोखले यांची नावे त्यांच्या चढत्या कर्तृत्वाचे काळात मद्रासेकडील लोकांनी स्वीकारली. किंवा आजही पुष्कळ मराठी नावांवर बंगाली नावांचा प्रभाव दिसतो. बहमनी कालातही मराठा सामंतांची नावे सुलतानराव, पिराजीराव, हसनराव व वेदपंडितांची नावे सुद्धा 'सुलतानभट्ट' अशी

२. होन्नावर येथील केशवदेवांचे मंदिरातील शिलालेख (इ. स. ११२३), Epigraphia Carnatica, Vol. V, Hn. No. 65, page 18-19. किंवा दंडावती नदी शिलालेख, Ibid Vol. VIII, sb. No. 28, page 5. ३. A. S. I. A. R., 1930-34, page 243.

मुसलमानी वळणाची झाली. स्वतः शहाजीराजे व त्यांचे धाकटे बंधू शरीफजीराजे यांची नावे अहमदनगरच्या शहाशरीफच्या मठाला केलेल्या नवसावरून ठेवण्यात आली. अशी माहिती शिवभारतकार कवींद्र परमानंद नेवासकर ह्याने लिहिलीच आहे[४] किंवा वरील कानडी संशोधक ज्यांना शुद्ध कानडी ठरवितील, अशा कल्याणी चालुक्यांच्या घराण्यात विक्रमादित्य, जयसिंह ही नावे आढळतात. होयसळ राजकुलतील विष्णुवर्धन, उदयादित्य ही नावे संस्कृत वळणाची आहेत. म्हणून त्यांना उत्तरभारतीय म्हणता येईल काय ? इंग्रजांचे राज्यकाळातही काही संस्थानिकांनी 'जॉर्ज जयाजीराव' अशी नावे स्वीकारली. सारांश, नावांवरून केलेला हा तर्क अगदीच निरर्थक आहे, वरिष्ठ सम्राट राष्ट्रकूट किंवा चालुक्य हे कानडी वळणाचे असल्यामुळे त्यांच्या मांडलिकांनी कानडी नांवे स्वीकारली, इतकाच त्याचा अर्थ होऊ शकेल.

विवाहाबद्दलचा दुसरा तर्कही असाच अर्थहीन आहे. राजघराण्यातले विवाह पुष्कळदा राजकारणाचे सोयीसाठी केले जातात. उदाहरणार्थ, चंद्रगुप्त मौर्य व सेल्युकस निकेटर याची कन्या हेलन यांचा विवाहनिश्चय (Betrothal) झाला होता. सातवाहन घराण्याचे विवाहसंबंध शक या परकीय राजकुलाशी होते. चंद्रगुप्त द्वितीय विक्रमादित्य ह्याची कन्या प्रभावती ही वाकाटक सम्राट रुद्रसेन द्वितीय ह्याला दिली होती. मान्यखेटचे राष्ट्रकूट आणि त्रिपुरिचे कलचुरि ह्यांच्यातही विवाहसंबंध घडून आले. कलचुरिनृपती कोकल्ल प्रथम ह्याची कन्या राष्ट्रकूट सम्राट कृष्ण द्वितीय ह्याला दिली होती.[५] शेवटी क्वचित् हिंदू राजांनीही इस्लामी स्त्रियांशी वैवाहिक संबंध ठेवले. तेव्हा केवळ विवाहसंबंधाच्या पुराव्यावर अवलंबून देवगिरीकर यादवांना कानडी ठरविणे चुकीचे होईल.

सेऊणांची किंवा यादवांची शिलाताम्रशासने बहुतेक कानडीत सापडतात हेही म्हणणे चूक आहे. यादवांची प्रारंभिक शिलाशासने संस्कृत किंवा मराठीत आहेत, कानडीत नाहीत. भिल्लम द्वितीय, भिल्लम तृतीय, सेऊणचंद्र द्वितीय, सेऊणचंद्र तृतीय, आइरमदेव, सिंघणदेव, मल्लुगिदेव ह्याचे लेख संस्कृत किंवा मराठी भाषांतच आहेत. कल्याणी चालुक्यांच्या अधःपाताचे सुमारास भिल्लम पाचवा ह्याने स्वतंत्र होण्याचा प्रयत्न केला व त्यासाठी त्याला कानडी मुलखातच ठाण मांडून होयसळांशी लढावे लागले. तेव्हा त्याचे शिलालेख विजापूर-धारवाड भागात आढळतात व ते कानडीत आले आहेत, हे ओघानेच आले. भिल्लमाने आपल्या स्वातंत्र्याची घोषणाच कानडी प्रदेशात केली. सिंघणदेव द्वितीय, कृष्ण, महादेव, रामचंद्र ह्यांनी कर्नाटकात बराच सत्ताविस्तार केला, तेव्हा त्या प्रदेशातील त्यांचे लेख कानडीत आहेत, हेही योग्यच आहे. त्यात कानडी ही यादवांची मातृभाषा असण्याचा सुतराम संबंध नाही. यादव सत्तेची आद्यस्थाने चंद्रादित्यपूर, सिन्नर ही पूर्णपणे मराठी प्रदेशात आहेत व महाराष्ट्रातील त्यांचे बहुसंख्य लेख मराठी वा संस्कृत भाषांत

४. शिवभारत, अध्याय १, श्लोक ७१-१० एक्याण्णव कलमी बखर, कलम २. ५. मिराशी वा. वि., कलचुरिनृपति आणि त्यांचा काळ, पृ. १२४.

आहेत. डॉ. शं. गो. तुळपुळे ह्यांनी आपल्या 'प्राचीन मराठी कोरीव लेख' ह्या ग्रंथात एकूण ७६ मराठी लेख दिले आहेत. त्यात यादव राजघराण्याच्या लेखांची संख्या ३२ आहे. मराठी भाषेचा उत्कर्ष यादव काळातच झाला. नरींद्रासारखे रससिद्ध कवीश्वर यादव दरबारी होते व ते मराठीत अप्रतिम व सुंदर अशा रचना करीत होते.

द्वारसमुद्राचे होयसळ आणि देवगिरीचे यादव ह्यांना एकाच कुळाच्या दोन शाखा मानणे तर अतिशय चमत्कारिक आहे. स्वतः होयसळांचे लेखांत यादवांना 'आरेय' किंवा उत्तरेकडून आलेले म्हटले आहे. तर हळेबीडचे स्थळपुराणात होयसळ हेच शके ७४०-७५० च्या कालखंडात देवगिरीहून कर्नाटकात आले, असा स्पष्ट उल्लेख आहे. देवगिरीचे यादव स्वतः कानडी असल्याचे कुठेही म्हणत नाहीत. तर द्वारसमुद्राचे होयसळ स्वतःचे कर्नाटकीयत्व अभिमानाने मिरवितात. शिवाय होयसळ ज्या साल किंवा सळ नामक पुरुषापासून आपल्या कुलाचा प्रारंभ मानतात तोच मुळी इसवी सनाच्या दहाव्या शतकाचे उत्तरार्धातील आहे.[६] तर यादव वंशाचा मूळ पुरुष दृढप्रहारी ह्याचा काळ इ. स. ८५०-६० इतका मागे जातो. तेव्हा देवगिरीकर यादवांना होयसळ कुळाची शाखा मानणे अर्थातच चुकीचे ठरणारे आहे. तेव्हा 'द्वारावतीपुरवराधीश्वर' व यादव नारायणचक्रवर्ती या बिरुदांचे बाबतीतही होयसळ हेच यादवांचे ऋणी ठरतात.

कर्नाटकातील शिलालेखांचा सूक्ष्म अभ्यास केला असताही, यादव हे उत्तरेकडील व मराठी आहेत असे स्पष्ट दिसून येईल. उदाहरणार्थ, हिरीयुस येथील लेख यादवांना 'आरेय' म्हणजेच उत्तरेकडील म्हणतो. आचापूर येथील शके ९६४ च्या लेखांत चालुक्यनृपती सोमेश्वर पहिला याच्या सामंताने गोणराजाने भीषण पराक्रम केल्याचे वर्णन आहे. हा पराक्रम पाहून सेऊणराजाचे सैनिकांना अतिशय कौतुक वाटले व तें आनंदाचे भरात 'बाप्पु ! बाप्पु ! माझा बाप्पु !' असे ओरडले.[७] हे कानडी लिपीत लिहिले गेलेलें आद्य मराठी शब्द आहेत. अर्थात यादव सैन्याची भाषा मराठी होती, स्पष्टच दिसतें. चालुक्य सोमेश्वर प्रथमच्याच सुदी लेखावरून यादव हे उत्तरेतील होते, हे पुन्हा स्पष्ट होते.

कदाचित चालुक्य सम्राटांचे पदरी मांडलिकत्वाची चाकरी करीत असताना काही यादव पुरुषांनी तिकडे लहान-सहान प्रदेश मिळविले असावेत. हळेबीडचे होयसळ, मासीयवाडचे रणमूर्ख यादव, हे आपला संबंध देवगिरीच्या यादवांशीच सांगतात. उलट, देवगिरीकर यादव एकाही लेखात आपण कर्नाटकीय आहोत, असा उल्लेख करीत नाहीत तर प्रत्येक वेळी आपण द्वारकेहून आलो, हे अभिमानाने सांगतात.

श्रीचक्रधरस्वामींच्या लीळचरित्रातही, कित्येक लीळांत यादव राजघराण्यांचे उल्लेख येतात.

६. Saletore B. A., Medieval Jainism, page 65. ७. Epigraphia Carnatica, Volume VIII, page 111.

तेथेही यादवनृपती आपणांस मराठी बोलताना दिसतात. कृष्णदेव यादव हा लोणार येथे श्रीचक्रधरस्वामींना भेटला असता, त्याने स्वामींना 'आसूंची वाखारी' (नाण्यांची थैली) वाहिली. स्वामी घेईनात, हे पाहून जमलेले लोक म्हणाले "घेया हो : सिंगुणाचा कान्हा तुम्हासि प्रसन्न झाला असे." तेव्हा कृष्णदेवच म्हणाला, 'सरा रे : ऐसा काई म्हणत असा रेः कान्हु तो तुम्हासि की : यांसि काई कान्हु :'[८] याचप्रमाणे महादेवराय[९] रामचंद्रदेव[१०] यांचेही तोंडी मराठी उद्गार लीळाचरित्रात सापडतात.

या सर्व विवेचनावरून यादवांचा कर्नाटकांशी मूळ संबंध होता, हे विधान अतिशय विपर्यास्त व चुकीचे आहे, हे सहज कळून येईल. यादव हे संपूर्णपणे देशी मराठा घराणे असून, त्यांनी पराक्रमपूर्वक आपले राज्य कर्नाटकापर्यंत विस्तृत केले. भारताचार्य चिंतामणि विनायक वैद्यही त्यांना देशी मराठा क्षत्रियच मानतात.[११]

****

८. तुळपुळे शं. गो., लीळाचरित्र, एकांक लीळा क्रमांक ३९. ९. तत्रैव, पूर्वार्ध, भाग १ ला लीळा क्र. ८४. १०. तत्रैव, उत्तरार्ध, भाग २ रा परिशिष्ट १ ले, पृ. १७६. ११. Vaidya C. V., History of Medieval Hindu India, page 318-24.

# सेऊणदेश

हेमाद्रीचे व्रतखंडातील राजप्रशस्तीत आणि यादवांच्या प्रारंभिक लेखात त्यांच्या मूळ प्रदेशाचे नाव सेऊणदेश किंवा सेऊणमंडल आणि राजधानीचे नांव सेऊणनगर असे दिलेले आढळते. यादव वंशालाही अनेकदा सेऊण किंवा सेगुणवंशी म्हटलेले आढळते. उदाहरणार्थ, विजापूर वस्तुसंगहालयातील एका शके ९६३ च्या लेखात[१] सेऊण कुलातील सामंत गोम्मरस ह्याचा उल्लेख आहे. यादवनृपती भिल्लम पाचवा ह्याचे गदग शिलालेखातील[२] (शके १११३).

**आक्रम्य विविधान् देशान् अर्जयित्वा धनं बहु**

**येन सेऊणभूपालकुलराज्यं विवर्धितम् ॥**

ह्या श्लोकातही त्याला सेऊणभूपालच म्हटले आहे.

हेमाद्रीच्या राजप्रशस्तीत व यादवांचे लेखात दृढप्रहारीनंतर दुसरा राजा सेऊणचंद्र प्रथम ह्याचे नाव येते. त्याचेच नावावरून त्याचे वंशाला व प्रदेशाला 'सेऊणदेश' हे नाव पडले, असे हेमाद्री-

**ततः स राजा निजराधानीमधिष्ठिता श्रीनगरंगगरीयः।**

**लेभे सुतं सेऊणचंद्र नाम यत्संज्ञया सेऊणदेशमाहुः ॥**

**राजप्रशस्ती श्लोक ॥ २२ ॥**

या श्लोकात सांगतो. याचाच अनुवाद आपणांस भिल्लम द्वितीय याच्या शके ९२२ च्या संगमनेर ताम्रपटांत पाहावयास सापडतो, तो असा-

**ख्यातः सेऊणचंद्र एव सहसा नाम्ना निजेनाह्वद्।**

**यो लोकं निजमण्डलं च समदारातीभकंठीरवः ॥**

अर्थात, दृढप्रहारीचा पराक्रमी पुत्र सेऊणचंद्र प्रथम ह्याचे नावावरून त्याचे घराण्याचे नाव सेऊणकुल व देशाचे नाव सेऊणदेश असे पडले. हा सेऊणदेश कोणता ?

राजप्रशस्तीतील श्लोकात श्रीनगर(आधुनिक सिन्नर, जि. नाशिक) हे सेऊणदेशात होते, असे म्हटले आहे. यादवांचे प्रारंभिक शिलालेख व ताम्रपटही संगमनेर, अश्वी, देवळाली, वाघळी, अंजनेरी, बहाळ या भागांत सापडले आहेत. त्यातील दान दिलेल्या गावांच्या स्थलनिश्चितीवरून यादवांचा प्रारंभिक राज्य विस्तार नाशिक, नगर, औरंगाबाद जिल्ह्यांचा उत्तरभाग खानदेश ह्या भागात दिसतो. तेव्हा ह्याच प्रदेशास प्राचीन काळी 'सेऊणदेश' हे नाव असले पाहिजे. हेमाद्रीने आपल्या राजप्रशस्तीत ह्या सेऊणदेशाचे वर्णन खालीलप्रमाणे केले आहे.

**आस्ते मंडितदंडिकापरिसरः श्रीसेउणाख्यं परं**

**देशः पेशलवेशभूषणवचो माधुर्यधुर्याकृतिः**

---

**१. ASIAR, 1930-34 p. 243. २. E. I., Vol. III, p. 218-219. ३. E. I. Vol. II, p. 218.**

तस्मिन् देवगिरीपुरीर्विजयते त्रैलोक्यसारश्रियः
विश्रांतोसुरशालिशैलशिखरस्पर्धिष्णुसौधावलिः ॥

अर्थात्, सेऊणदेश हा दंडकारण्याचे सीमेवर असून, देवगिरी हे वैभवशाली नगर त्याला भूषणभूत आहे.

परंतु एकंदर दंडकारण्याच्या सीमा निश्चित नाहीत. बस्तरचा गहन वन प्रदेश दंडकारण्यच म्हणवतो व परभणी जिल्ह्यात रांजणा गावी सापडलेला शके ११३९ चा शिलालेख[४] त्या परिसराचा दंडकारण्यातच अंतर्भाव करतो. प्राचीन लेखकांनी ह्या शब्दास हवे तसे राबवून त्याचा मूळ अर्थ हरवून टाकला आहे. हेमाद्री, देवगिरी हा किल्ला सेऊणदेशात होता, हे सांगतो खरा. पण हेमाद्री हा महादेवराय यादवांचे काळातील अधिकारी होता. तोपर्यंत यादवांच्या जुन्या 'सेऊण' ह्या नावामुळे त्यांचे पूर्ण विशाल साम्राज्य 'सेऊणदेश' म्हणून ओळखले जात असेल आणि प्रारंभी लहानशा प्रदेशाचे हे नाव संपूर्ण राज्याला लावले गेले असेल. मुळात देवगिरीनगर आणि तेथील अभेद्य दुर्ग सेऊणदेशात असता, तर यादवांनी चंद्रादित्यपूर किंवा श्रीनगर ह्या नगरांपेक्षा देवगिरीलाच राजधानीचा सन्मान दिला असता.

यादवांच्या सत्ताविस्ताराचा आलेखही पश्चिमेकडून पूर्वेकडे जाताना दिसतो. त्यांचे आधीचे लेख संगमनेर, कळस ह्या भागात आणि नंतरचे लेख वाघळी, पाटण या पूर्वखानदेशातील भागात सापडतात. यादवनृपती मल्लुगि ह्याने विदर्भातील राजा हेमाद्रीदेव ह्याचा पराभव करून पर्णखेटनगर जिंकून विदर्भाकडे आपला राज्यविस्तार वाढविला.[५] नांदेड जिल्ह्यातील अर्धापूरचा मांडलिक राजा रट्टवंशीय बल्लाळ हा या मल्लुगिचाच सहाय्यकर्ता आहे.[६] तेव्हा यादवांच्या मूळप्रदेशात सेऊणदेशात कदाचित् देवगिरीचा समावेश नसावा. जसजसा या लहान कुलाचा विस्तार वाढत गेला, तसतसा त्यांनी नवीन जिंकलेला प्रदेशही सेऊणांचा देश- सेऊणदेश म्हणून ओळखला जाऊ लागला असावा.

आमच्या तर्कास महानुभावीय ग्रंथ 'श्रीगोविंदप्रभू चरित्र' ह्यातही आधार सापडतो. यात वरील प्रदेशाचा उल्लेख 'सीवनदेश' व तेथील लोकांचा उल्लेख 'सीवनीये' म्हणून येतो.

एकदा गोविंदप्रभूंना त्यांचे भक्तांनी सीवनदेशाकडे नेण्याचे ठरविले आणि त्यांना ते दांडीवर बसवून घेऊन निघाले, तेव्हा विदर्भातील भक्तांनी त्यांना विनंती केली 'आमचे वराडिचे दैवत : सीवनदेशा न वचावे जी :' गोविंदप्रभूंनी विनंती स्वीकारली आणि 'आवो आलतु आलतु म्हणौनि दांडी परतविली.'[७] याच ग्रंथात दुसऱ्या एका लीळेत सीवनदेशीचे लोकांनी येऊन

४. विदर्भ संशोधन मंडळ वार्षिक, १९६७, पृष्ठ १२४. ५. आसद्यसद्यः स्वनिवासहेतोः । श्रीपर्णखेटं नगरं रिपुभ्यः ॥ राजप्रशस्ती ३४. ६. Shrinivas Ritti and Shelke, Inscriptions of Nanded Dist., page 40. ७. कोलते वि. भि., गोविंदप्रभूचरित्र, लीळा क्रमांक, २३५.

श्रीगोविंदप्रभूंना बिघडविले, असा उल्लेख आहे.[८]

महानुभाव साहित्यात लीळाचरित्रात यादवकाळातील अनेक देशनामें येतात : अहीरदेश (खानदेश), वऱ्हाड (विदर्भ), कोंकण, उभयगंगातीर (गंगेच्या उत्तर व दक्षिण तीरांवरचा प्रदेश), झाडिमंडळ (चांदा व भंडारा जिल्ह्याचा झाडीयुक्त भाग) इत्यादि. महाराष्ट्राचे मानचित्रातून हे भाग वेगळे काढले, म्हणजे उरणारा नगर, नाशिक व उत्तर औरंगाबाद जिल्हा हे भाग म्हणजे सेऊणदेश हे स्पष्टच आहे.

डॉ. ओंकारप्रसाद वर्मा सेऊणदेशाच्या उत्तरेस नर्मदेपर्यंत नेऊन भिडवितात ते मात्र बरोबर नाही.[९] आईरमदेव यादवाच्या ज्या अश्वी ताम्रपटाचा त्यांनी आधार घेतला आहे. त्यातील संबंधित भाग असा-

**३६ वैशाखमासे सोमदिने अमावस्यां नर्म्मदायां नर्म्मदा**
**३७ तीरे श्रीसिद्धेश्वरक्षेत्रे ब्रह्मतीर्थे च वैशाख व-**
**३८ -दि ५ सोमे। अद्येह श्रीनर्म्मदापुरे। समस्तभुवनाश्र-**
**३९ -य श्रीवल्लभपृथ्वीवल्लभमहाराजाधिराज परमभट्टा**
**४० रकसत्याश्रयकुलतिलकचालुक्याभरणश्रीमत्त्रिभुवन**
**४१ मल्लपेरमाद्रिंदेवविजयराज्ये। सेऊणदेशे। समस्तरा**
**४२ जावलीविराजितमहामंडलेश्वरश्रीआईरमदेवेन**

यातून सेऊणदेशाच्या सीमा नर्मदा नदीपर्यंत विस्तृत होत्या, असा ध्वनी निघू शकत नाही. यात सेऊणदेशे-आईरमदेवेन-कूकलपंडिताय-संगमनेर चतुरासितीमध्ये कोंकणेग्राम-दत्तः अशी वाक्यरचना आहे. तेव्हा सेऊणदेशाचा व नर्मदापुराचा काही संबंध नाही. ही दान देण्याची क्रिया नर्मदापुरात राजा सोमवती अमावस्येच्या स्नानासाठी गेला असता झाली इतकेच.

यादवनृपती रामचंद्रदेवाचे पैठण ताम्रपटातही सेऊण हे देशनाम येते व तेथे 'सेऊणदेशालंकारभूत' गोदावरीचा उल्लेख आहे. प्रतापरुद्रीय ह्या ग्रंथाचा कवी विद्यानाथ हाही यादवांना 'सेऊणदेशाधिपति'च म्हणतो.

सारांश असा की, दृढप्रहारी हा यादव राजकुलातील प्रथम ज्ञात नृपती असून त्याचे कर्तृत्वाचा प्रारंभिक प्रदेश 'सेऊणदेश' हा होता.

****

---

८. कोलते वि. भि., गोविंदप्रभूचरित्र, लीळा क्र. १०२ 'ए सीवनीपे आली : एही आमचे राऊळ नाशिले'. ९. Verma O. P., Yadavas and Their Times, page 3.

# सेऊणदेशकर राजघराण्याचा प्रारंभिक इतिहास

**(सुबाहु, दृढप्रहारी, सेऊणचंद्र प्रथम, धाडियप्पा, भिल्लम प्रथम आणि श्रीराज)**

**सुबाहु :**

हेमाद्रीने व्रतखंडातील राजप्रशस्तीत वज्र-प्रतिबाहु-सुबाहु असा क्रम दिला आहे.

**वज्रस्य सुनुः प्रतिबाहुरासीत् दासीकृतःक्ष्मापति चक्रबालः**

**ततोऽपि सम्राडभवत्सुबाहुः प्रासूत सोयं चतुरस्तनूजान् ॥[१]**

**तेन ते सार्वभौमेन तनया विनयान्विता**

**विभज्य वसुधाचक्रं चक्रिरे पृथिवीश्वराः ॥[२]**

ह्या सुबाहुला एकूण चार मुले झाली आणि त्यांना त्याने आपले सार्वभौम राज्य वाटून दिले, असे हेमाद्री सांगतो, त्यात त्याचा पुत्र दृढप्रहारी ह्याला दक्षिणेचे राज्य मिळाले व बाकी पुत्रांना उत्तरेकडील राज्य मिळाले.

**यथाविभागं वसुधामशेषां तेषां तदा पालयतां चतुर्णां**

**दृढप्रहारी दिशि दक्षिणस्यां प्रभुर्बभूव प्रथमात्कनीयान् ॥**

**सर्वेऽपि पूर्वे मथुराधिनाथाः कृष्णादितो द्वारवतीश्वरास्ते**

**सुबाहुसुनोरनुदक्षिणाशाप्रशासिनो यादववंशवीराः ॥[३]**

याचा अर्थ असा की, सुबाहु पूर्वीचे राजे हे द्वारावती प्रदेशातील होते. कृष्णापासून ते द्वारकेत आले, तर सुबाहु पुत्रापासून अर्थात दृढप्रहारीपासून ते दक्षिणेत शासन करते झाले. हेमाद्रीचा सरल अभिप्राय असा की, सुबाहु हा शेवटचा पौराणिक राजा आणि दृढप्रहारी हा पहिला ऐतिहासिक राजा असून, त्यानेच दक्षिणेत शासन करण्यास प्रारंभ केला. डॉ. रा. गो. भांडारकरांनी ही गोष्ट अचूकपणे ओळखली आहे.[४]

**दृढप्रहारी :**

दृढप्रहार किंवा ज्याला हेमाद्रीने व्रतखंडात दृढप्रहारी म्हटले आहे. तो यादव घराण्याचा पहिला ज्ञात राजा होता. हा अतिशय कष्टाने व स्वकर्तृत्वाने महत्पदवीस चढला असावा, असे नासिक्यकल्प ह्या जिनप्रभसूरींचे ग्रंथावरून दिसते. त्या ग्रंथातील माहितीप्रमाणे दिव्याण ऋषींनी द्वारका जाळल्यानंतर वज्रकुमार नामक यादववीराची पत्नी गर्भवती अवस्थेत चंद्रप्रभस्वामींचे मंदिरात वास्तव्याला आली. तिला जो पुत्र झाला, तो दृढप्रहारी तरुणपणी अतिशय पराक्रमी निघाला व त्याने गावावरील चोरांचे आक्रमण शौर्याने परतवून लावले, तेव्हा ब्राह्मण आणि नगराचे

---

१. व्रतखंड राजप्रशस्ती, श्लोक १८. २. तत्रैव, श्लोक १९. ३. तत्रैव, श्लोक २० आणि २१. ४. R. G. Bhandarkar, Early History of Deccan, page 109.

लोक ह्यांनी त्याला नगररक्षकपद दिले. याप्रमाणे स्वतःचे आसन बसविल्यानंतर दृढप्रहारीने सेऊणदेशातच राज्य स्थापिले.

वसई ताम्रपटात दृढपहारीला 'आयात्तोनिजवंशशेखरतनुर्द्वारावतीपत्तनात्द' असे म्हटले आहे. आणि ते फारसे चुकीचे वाटत नाही. शके ९९१ मधील वाघळी शिलालेखात त्या स्थानी शिवमंदिर बांधणारा गोणराज किंवा राज याच्या अनेक पिढ्यांची वंशावळ असून, त्याचा संबंध वलभी सौराष्ट्राशी जोडलेला आहे. प्रसिद्ध काश्मीरी कवी बिल्हण हा चालुक्य सम्राट विक्रमादित्य सहावा ह्याचे आश्रयाला होताच किंवा औरंगाबाद जिल्ह्यातील सिल्लोड गावी असलेल्या शके ११५२ च्या एका शिलालेखात[५] सिंघणाचा श्रीकरणिक हा गौड देशातील होता, असा उल्लेख आहे. तेव्हा यादव हे द्वारावतीहून आले असे गृहीत धरण्यास हरकत नसावी.

दृढप्रहारी हा खरोखर अतिशय पराक्रमी वीरपुरुष असला पाहिजे वसई ताम्रपटात त्याचे वर्णन-

**आदौः ख्यातः दृढप्रहारनृपतिः श्रीविष्णुरूपःसहि।**
**त्वायात निजवंशशेखरतनुर्द्वारावतीपत्तनात्**
**संग्रामे रिपुहस्तिपत्तिशिरसां संच्छेदभेदे दृढः**
**चंद्रादित्यपुरं प्रसिद्धमकरोत् प्राक्संभवं यो भुवि ॥**

अशा प्रकारे केले आहे. अश्वी ताम्रपटातही हाच श्लोक त्याचे वर्णनासाठी आला आहे. ह्याचा अर्थ असा की, दृढप्रहार हा शूर योद्धा असून, युद्धप्रसंगी शत्रुसैन्यातील हत्तींची व पदातिसैनिकांची डोकी फोडण्यात कुशल होता. त्यानेच चंद्रादित्यपूर प्रथम वसविले. हेमाद्री मात्र असे सांगतो की, त्याने श्रीनगर शहरास स्वतःचे राजधानीचा मान दिला.

**ततःस राजा निजराजधानीमधिष्ठितं श्रीनगरं गरीयंः**
**लेभे सुतं सेऊणचंद्रसंज्ञं यत्संज्ञया सेऊणदेशमाहुः[६] ॥ २२ ॥**

ह्यातील चंद्रादित्यपूर म्हणजेच आधुनिक चांदोर (जिल्हा नाशिक) होय व श्रीनगर म्हणजेच आधुनिक सिन्नर (जिल्हा नाशिक) हे होय, यात शंका राहात नाही. सिन्नरचे प्राचीन नाव श्रीनगर असे होते[७] ही आठवण शके १२०० च्या आसपास लीळाचरित्र लिहिणाऱ्या म्हाइंभटालाही होती, हे स्पष्टच आहे.[८] येथे श्रीचक्रधरस्वामी भीलमठात राहात असत. भीलमठ भिल्लम यादवानेच बांधला व राजाचे नावावरून मंदिराचे नाव भिल्लममठ-भीलमठ पडले, ह्यात संशय नाही. येथील श्रीगोविंदेश्वराचे प्रख्यात हेमाडपंथी मंदिरावरूनही हे गाव यादवकाली प्रख्यात असावे, हेच

५. इतिहास आणि संस्कृति, एप्रिल १९६९. ६. व्रतखंड राजप्रशस्ती, श्लोक २२. ७. Bhandarkar R. G., Early History of Deccan, page 109. ८. तुळपुळे शं. गो., लीळाचरित्र, पूर्वार्ध भाग १, लीळा ९०, ९१, १०७ आणि कोलते वि. भि.,स्थानपोथी, स्थान क्रमांक ९७.

अनुमान निघते. याच श्रीनगरात किंवा सींदीनेरात सेऊणचंद्र ह्याने सेऊणपूर वसविले, असे वसई ताम्रपटातील व अश्वी ताम्रपटातील खाली दिलेल्या श्लोकावरून स्पष्ट होते.

**श्रीमत्सेऊणचंद्रनामनृवरस्तस्मादभूद्भूमिपः**
**नित्यं देशपदानिराजविषये स्वं नाम संपादयन्**
**येनाकारि पुरं च सेउणपुरं श्रीसिंदिनेरे वरे**
**तत्पुत्रः कुलदीपको गुणनिधिः श्रीधाडियप्पस्ततः ॥**

डॉ. ओंकारप्रसाद वर्मांनी मात्र ह्या श्लोकाचा वेगळाच अर्थ लावून चंद्रादित्यपूर म्हणजेच सिन्नर असे समीकरण बसविण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांच्या प्रतिपादनातील आशय त्यांच्याच शब्दात शक्यतो पुढे देतो.

१ सिंदीनेर म्हणजे सिन्नर हे समीकरण योग्य आहे आणि वसई ताम्रपटानुसार सेऊणचंद्र द्वितीयने सर्वदिवाचार्यास जो सिंहीग्रामद्वादशकातील चिंचोली ग्राम दान दिला, तो नाशिकचे नैऋत्येस बारा मैलांवर सध्याही आहे. मग जर सेऊणपूर म्हणजे सिन्नर तर दृढप्रहारीचे श्रीनगर कोठे आहे ?

२ अश्वी ताम्रपटातील वाचनानुसार असे कळते की, शके १०२० महामंडलेश्वर आईरमदेवाने जो कोंकणेग्राम एकतीस ब्राह्मणांना दान दिला, तो सेऊणदेशात श्रीनगर २५०० मध्ये व संगमनेर चौऱ्यांशीमध्ये अवस्थित होता. ज्या अर्थी संगमनेर अहमदनगर जिल्ह्यात आहे, त्या अर्थी श्रीनगरही अहमदनगर जिल्ह्यातच शोधले पाहिजे. याचाच अर्थ यादवांचे प्रारंभिक राज्य अहमदनगर जिल्ह्यात असले पाहिजे. पण अश्वी ताम्रपट तर असे सांगतो की, दृढप्रहारीने आधीच प्रसिद्ध असलेल्या चंद्रादित्यपुरास आपली राजधानी नेली. आणि सर्वच यादव शिलाताम्रशासने चंद्रादित्यपूर हीच त्याची राजधानी सांगतात.

३ परंतु हेमाद्री तर 'दृढप्रहारीने श्रीनगर शहराला शोभा आणली' असे सांगतो. हेमाद्रीसारखा राजनीतिकुशल विद्वान् लेखक यादव राजघराण्याचे प्रथम राजधानीबद्दल अनभिज्ञ असावा, असे म्हणवत नाही. पण त्याने दृढप्रहारीनंतर ३०० वर्षांनी राजप्रशस्ती लिहिली, तेव्हा चंद्रादित्यपूर हे विशेषनाम न देता श्रीनगर (चांगले शोभिवंत नगर) हे विशेषण दिले असे दिसते. म्हणजेच हेमाद्रीच्या व्रतखंडतील श्रीनगर हेच चंद्रादित्यपूर असले पाहिजे, असा डॉ. वर्मांचा तर्क आहे.[१]

परंतु एवढे आडरानात शिरण्याची गरज नाही आणि तसे केल्याने अनेक अडचणींना तोंड द्यावे लागते.

१ पहिली अडचण अशी की, जर चंद्रदित्यपूर हेच श्रीनगर मानावयाचे आणि सिंदीनेर

१. Dr. O. P. Varma, The Yadavas & their times, page 11-13.

म्हणजे हल्लीचे सिन्नर मानावयाचे, तर सिन्नरचे नाव तर महानुभावांच्या स्थानपोथीतच श्रीनगर असे येते. म्हणजे मग सिंदीनेर, सिन्नर, श्रीनगर, सेऊणपूर व चंद्रदित्यपूर ही एकाच गावाची नावे समजावयाची काय ? आणि चंद्रादित्यपुराचे नाव तरी सिंदीनेर असे कसे एकदम पालटले ? ह्याला उत्तर सापडत नाही.

२ जर चंद्रादित्यपूर हेच श्रीनगर मानावयाचे तर दृढप्रहारीचे दुसऱ्याच पिढीत सेऊणचंद्राचे काळात राजधानी सिंदीनेर ह्या स्थानी गेली कशी ? ती राजधानी जर त्यांनी स्थलांतरीत केली म्हणावे (असे पूर्वी होत असे, वाकाटकांच्या राजधान्या, सातवाहनांच्या राजधान्या किंवा प्रसिद्ध वेड्या तघलकाचे उदाहरण पहा) तर मग श्रीनगर हेच चंद्रदित्यपूर हे सांगण्याचा खटाटोप कशाला ? आधी दृढप्रहारीची राजधानी चंद्रदित्यपूर (आधुनिक चांदोर) ह्या स्थानी होती व ती सेऊणचंद्राने सिंनर, सिंदीनेर ह्या स्थानी नेली आणि हीच राजधानी पुढे प्रसिद्ध झाल्यामुळे लोक चंद्रादित्यपुराला अगदीच विसरले. विशेषतः हेमाद्रीसारखा तीनशे वर्षांनंतर लिहिणारा लेखक तर हे सहजच विसरला. पण अश्वी, वसई यासारखी ताम्रशासने राजसभेशी संबंधित असल्यामुळे त्यांनी चंद्रादित्यपुराची आठवण राखली, असे म्हणावे लागते, सारांश, चंद्रादित्यपूर आणि श्रीनगर ही शहरे एक नव्हती, ह्यात संशय राहात नाही.

सिंदीनेर (सिंडीनेर, सिंदीनगर) हे प्राचीन काळापासून प्रसिद्ध शहर असावे. यादवांचे पूर्वी सेऊणदेशात सेंद्रकवंशाचे राज्याचे पुरावे सापडतात. सेंद्रकनृपति वैरदेव व निकुंभल्लाशक्ति यांची ताम्रशासने सेऊणदेशात सापडली आहेत.[१०] ह्या सेंद्रकांपासूनच 'सिंद' हे कुलनाम सिद्ध झाले. खानदेशात आजही सिंदपूर, सिंदखेडे अशी ग्रामनामे सापडतात. याच सिंदाचे प्रसिद्ध नगर ते 'सिंदनगर' असावे. खानदेशातील सामान्य लोक 'सिन्नर' ह्या ग्रामनामाचा उच्चार अजूनही 'सिंदर' असाच करतात.[११] तेव्हा दृढप्रहाराच्या प्रथम साहसिक उपक्रमाची सुरुवात चंद्रादित्यपूर या स्थानी होऊन थोडे स्थैर्य प्राप्त होताच, त्याने आपली राजधानी सिंदीनेर (सिन्नर) या ठिकाणी नेली, हे उघड दिसते. याच नावाचे संस्कृत रूपान्तर पुढे 'श्रीनगर' झाले असावे. देशी शब्दास संस्कृतरूप देण्याची प्रक्रिया सामान्यच आहे. उदाहरणार्थ, सातवाहन> >सादवाहन>सालवाहन >सालाहण असे रूपान्तर होता होता पुनःसंस्कृतीकरण (hyperurbanisation) शालिवाहन असे होते.

जैन ग्रंथ नासिक्यकल्प आणि अश्वी व वसई ताम्रपटातून वर उद्धृत केलेला श्लोक यावरून दृढप्रहाराने बराच पराक्रम गाजवून शत्रूंचे आक्रमण परतवून लावले, तेव्हा नगरजनांनी व ब्राह्मणांनी त्यास नगररक्षकपद दिलें, असे दिसतें. दृढप्रहाराच्या या राजकीय उदयाचे कारण जाणून

१०. सेंद्रक वैरदेवाचा मेहुणबारे ताम्रपट, E. I. Vol. XXXV, page 193. ११. B. G. Vol. XVI Nasik, page 648.

घेण्यासाठी समकालीन इतिहासाचे सूक्ष्म निरीक्षण आवश्यक आहे. त्याचे काळात (अंदाजे ८६० ते ८८० इसवी) अमोघवर्ष प्रथम हा तरुण आणि दुर्बळ सम्राट राष्ट्रकूट सिंहासनावर होता. त्याच्या पित्याचे- राष्ट्रकूट गोविंद तृतीय ह्याचे राज्य नर्मदेपर्यंत विस्तृत होते. पण अमोघवर्ष प्रथम ह्याला मात्र वेंगीचा चालुक्यनृपती विजयादित्य द्वितीय, गंगवाडीचे गंग आणि माळव्याचे परमाराकडून सतत त्रास सहन करावा लागला. अशा काळात माळव्याचे परमारांचा प्रदेश राष्ट्रकूट साम्राज्याच्या सरळच उत्तरेस असल्यामुळे सेऊणदेशास सहजच राजकीय महत्त्व प्राप्त झाले. अर्थात, ह्या भागावर एखादा पराक्रमी सामंत असावा, ही गरज सहजच निर्माण झाली. त्यात या अराजकाचा फायदा घेऊन सातपुडा, विंध्य प्रदेशातील भिल्लांनी सेऊणदेशाचे सुपीक भागावर धाडी घातल्या असाव्यात. अशाच एखाद्या धाडीत दृढप्रहाराने आपल्या पराक्रमाचा परिचय दिला असावा. सम्राटास त्याचे अडचणीचे काळात ह्या प्रदेशात विश्वासू व शूर माणसे ठेवण्याची आवश्यकता असल्यामुळे दृढप्रहारास सामंतपदाचा मान मिळाला असावा. महाराष्ट्र व गुजरात, माळवा ह्यांचेमधील हा प्रदेश, या काळात राजकीयदृष्ट्या अतिशय महत्त्वाचा होता, हे अमोघवर्ष प्रथम ह्यास गुजरातेतील आपला पुतण्या राष्ट्रकूट कर्क्कराज ह्याचेकडून मदत घ्यावी लागली, यावरून सिद्ध होते.

दृढप्रहारीचा काळ आपणांस अनुमानाने ठरविता येतो, तो असा-सेऊणदेशकर राजघराण्यांच्या शिलाताम्रशासनांमध्ये पहिला ताम्रपट हा भिल्लम द्वितीय ह्याचा शके ९२२ चा (इ. स. १०००) संगमनेर ताम्रपट दृढप्रहार ते भिल्लम वंशावळ अशी-



(इ. स. ९७५ ते इ. स. १००५ संगमनेर ताम्रपटावरून)

अर्थात, दृढप्रहार ते भिल्लम द्वितीयपर्यंत सहा पिढ्या होतात. प्रत्येक पिढीला अंदाजे वीस वर्षांचा काळ दिला, तर (९७५-१२०=८५५) सामान्यतः ८६० ते ८८० इ. स. असा दृढ

प्रहाराचा काळ गृहीत धरता येतो. हा काळ राष्ट्रकूट घराण्यातील अमोघवर्ष प्रथम ह्या दुर्बल शासकाचे काळाशी (८१४ ते ८८० इ. स.) जुळणारा असल्यामुळे व अशाच सामर्थ्यहीन सम्राटांचे काळात दृढप्रहारासारख्या साहसी वीरांचे कर्तृत्वाला वाव मिळण्याची शक्यता अधिक असल्यामुळे हा काळ मान्य होणे कठीण नाही.

**सेऊणचंद्र प्रथम :**

हेमाद्रीचे राजप्रशस्तीत दृढप्रहारानंतर सेऊणचंद्र प्रथम ह्याचे नाव येते. ते असे-

**ततःस राजा निजराजधानीमधिष्ठितः श्रीनगरं गरीयंः**

**लेभे सुतं सेउणचंद्रसंज्ञं यत्संज्ञया सेउणदेशमाहुः ॥ २२ ॥**

याचा अर्थ असा की, दृढप्रहाराचा पुत्र सेऊणचंद्र (प्रथम) ह्याचे नावावरून त्याचे प्रदेशाला सेऊणदेश हे नांव पडले. वसई आणि अश्वी ताम्रपटात त्याचे वर्णनासाठी आलेल्या-

**श्रीमत्सेउणचंद्रसंज्ञं नामं नृवरतस्मादभूद्भूमिपः**

**नित्यं देशपदातिराजविषये स्वं नाम संपादयन्**

**येनाकारि पुरं च सेउणपुरं श्रीसिंदिनेरे वरे**

**तत्पुत्रः कुलदिपको गुणानिधी श्रीधाडियप्पस्ततः ॥**

वरील श्लोकावरून, त्याचेच नावावरून त्याचे देशाला सेऊणदेश असे नाव पडले, असे दिसते. मध्यभारतातील चंदेल्ल राजवंशातील जयशक्ती ह्या राजाचे नावावरून त्याचे प्रदेशास 'जेजाकभुक्ति' असे नाव पडले, हे इतिहासाचे अभ्यासकास ज्ञात आहेच. तसाच प्रकार सेऊणचंद्राचे विषयी घडलेला दिसतो. अर्थात्, सेऊणचंद्र प्रथम हा यादववंशातील महत्त्वाचा राजा दिसतो. संगमनेर आणि कळसबुद्रुक या ताम्रपटातील यादव वंशावळीस सेऊणचंद्र प्रथमपासूनच प्रारंभ आहे. ह्याचाच अर्थ असा की, त्याने आपल्या वंशाला मोठी प्रतिष्ठा मिळवून दिली असावी. राष्ट्रकूट आणि गुर्जरप्रतिहार ह्यांचेतील कलहात त्याने राष्ट्रकूटांचे बाजूने मोठा वाटा उचलला असावा. आणि म्हणूनच उपर्युल्लेखित श्लोकात त्याने 'आपल्या देशात व पायदळ सैनिकात मोठा नावलौकिक संपादन केला.' असे वर्णन आले आहे. पण त्याच्या सैनिकी अभियानासंबंधी आपणांस निश्चित काहीच माहिती नाही. त्याचा राज्यविस्तारही सिन्नर नगराचे परिसराबाहेर फारसा झाला नसावा.

त्याने सिंदीनेर नगरात सेऊणपुरा नावाचा नवाच पुरा बसविला. डॉ. ओंकारप्रसाद वर्मा मात्र 'त्याने सेऊणपूर नांवाचे नगर वसविले' असे लिहितात ते चूक आहे.[१२] सिंदीनेर हे नगर सिंद वंशाचे काळापासून प्रसिद्ध होते हे आपण मागे पाहिलेच. सेऊणचंद्राने याच नगरात आपल्या नावाने नवीन विभाग वसविला असावा. इथे पेशव्यांच्या पुणे नगरातील सदाशिव पेठ, नारायण पेठ या

१२. Verma O. P., Yadavas their Times, page 16.

नवीन वस्त्यांची सहजच आठवण येते.

सारांश असा की, जरी यादववंशाची स्थापना दृढप्रहाराने केली असली तरी या वंशाला गरिमा व प्रतिष्ठा सेऊणचंद्र प्रथम ह्यानेच मिळवून दिली.

**धाडियप्पा :**

सेऊणचंद्र प्रथम ह्याचे उत्तराधिकाऱ्याचे नांव धाडियस, द्वाडियप्पा व धाडिपक असे हेमाद्रीचे व्रतखंडातील राजप्रशस्ती, वसई ताम्रपट व कृष्णदेव यादवांचा मेथी शिलालेख यात अनुक्रमे येते. वसई ताम्रपटातील श्लोक आम्ही वर दिलाच आहे. या श्लोकाविषयी डॉ. ओंकारप्रसाद वर्मा लिहितात-

'Nothing more is known about this king except probably that he was born in Sindinera.'[१३]

हा तर्क अर्थातच चुकीचा आहे. वरील श्लोकातील 'श्रीसिंदीनेरे' व 'तत्पुत्रः' हे शब्द एकत्र वाचून ते या निर्णयाला आले असावेत. पण यातील पहिली ओळ सेऊणचंद्र प्रथम याने सिंदीनेरात सेऊणपूर बांधले असे सांगते, तर दुसरी ओळ त्याला धाडियप्पा नावाचा मुलगा होता असे सांगते. त्याचा जन्म सिंदीनेरात झाला, असा अर्थ निघणे सुतराम् शक्य नाही.

वसई आणि अश्वी ताम्रपटातील 'कुलदिपक' आणि 'गुणानिधी' या दोन विशेषणांखेरीज आपणांस धाडियप्पाविषयी जास्त माहिती मिळत नाही.

**भिल्लम प्रथम :**

धाडियप्पानंतर त्याचा पुत्र भिल्लम प्रथम हा राज्यावर आला. वसई आणि अश्वी ताम्रपटात त्याला 'आसीदशेषभूत्यशसो श्रीमान् बृहद्भिल्लमः' म्हणजेच बृहद्भिल्लम किंवा थोरला भिल्लम असे म्हटले आहे. या नावाचे यादव राजवंशात एकूण पाच राजे झाले, त्यातील हा पहिला. साहजिकच त्याचा उल्लेख 'थोरला भिल्लम' म्हणून येतो. थोरले बाजीराव, थोरले माधवराव असे पेशवे घराण्यातील पुरुषांबद्दल म्हटले जाते, त्यातलाच हा प्रकार दिसतो.

त्याचेबद्दलही आपणांस काही विशेष माहिती नाही. राष्ट्रकूट सम्राटांचे सामंतपद सांभाळून तो स्वस्थ असावा.

**श्रीराज :**

भिल्लमानंतर श्रीराज, राजा अथवा राजुगि हा यादवसत्तेचा स्वामी झाला. हेमाद्रीने त्यास राजुगि म्हटले आहे. डॉ. भगवानलाल इंद्रजी त्यास थोरल्या भिल्लमाचा भाऊ मानतात[१४] पण ते चूक आहे. कळसबुद्रुक ताम्रपटात त्याला स्पष्टपणे थोरल्या भिल्लमाचा पुत्र म्हटले आहे.[१५]

****

१३. Ibid, page 17. १४. I. A. Vol. XVII, page 125. १५. Ibid, Vol. XVII, page 118.

# वड्डिग आणि भिल्लम द्वितीय

**वड्डिग :**

ह्याच्याही नावाची विविध रूपे यादव शिलाताम्रशासनातून येतात. हेमाद्री त्याला 'वादुगि' म्हणतो, तर संगमनेर ताम्रपटात त्याचे नाव 'वंडिग' असे येते. अश्वी ताम्रपटात त्याला 'वड्डिग' म्हटले आहे. अश्व व वसई ताम्रपटात त्याचेबद्दल येणारा श्लोक थोडा घोटाळा निर्माण करणारा आहे. तो असा-

**आर्वाक्तस्य बभूव भूतलहरिः श्रीवड्डिगाख्योनृपः**
**तस्मात्छीवर भिल्लमो क्षितिपतेः प्रत्यक्षधर्माभवत् ।**
**भार्या यस्य च झंझराजातनया श्रीलस्थियव्हांह्वया**
**धर्मत्यागविवेकबुद्धिसगुणाः श्रीराष्ट्रकूटान्वया ॥**

यातील अर्वाक् किंवा आर्वाक या शब्दाचा अर्थ 'आधी' (आर्वाक् तस्य=श्रीराजाचे आधी) असा करून भगवानलाल इंद्रजींनी बराच ऊहापोह केला आहे. त्यांचे मत असे की, 'वड्डिग' हा श्रीराजाचे आधी राजा झाला. श्रीराज हा त्यावेळी अल्पवयी होता. वयात येताच त्याने वड्डिगाला पदच्युत करून आपले पैतृकराज्य परत मिळविले. या तर्कपरंपरेला काहीच आधार नाही. डॉ. भांडारकर यांनी असे दाखवून दिले आहे की, 'आर्वाक् तस्य' या शब्दाचा अर्थ 'त्याचे आधी' असा घेता येणार नाही. प्राचीन अभिलेखातून राजवंशावली क्रमवारच दिलेल्या असतात. त्यात आधी होऊन गेलेल्या राजाचे नाव त्याच्या उत्तराधिकाऱ्यानंतर येणे शक्य नसते. शिवाय कळसबुद्रुक येथील ताम्रपटात वड्डिगाला स्पष्टच श्रीराजाचा पुत्र म्हटले आहे. तेव्हा वरील विवेचनाचा कणाच मोडून पडतो.

संगमनेर ताम्रपटातून वड्डिगाबद्दल बरीच महत्त्वाची माहिती मिळते. त्यातील पहिली गोष्ट अशी की, वड्डिगाचा विवाह राष्ट्रकूट राजा धोरप्पा याची कन्या व्होडियव्वा हिच्याशी झाला होता व दुसरे असे की, यादव राजवंशाचे इतिहासात प्रथमच त्यांचे सम्राट किंवा अधिपती असलेल्या राष्ट्रकूट घराण्याचा उल्लेख येऊन वड्डिगाचा पुत्र भिल्लम द्वितीय हा राष्ट्रकूट कृष्ण तृतीयचा (९३९-९३७ इ. स.) सामंत होता, हे कळते. यातील विवाहाचे प्रश्नाचा आपण प्रथम विचार करू.

संगमनेर ताम्रपट संपादित करताना डॉ. कीलहॉर्न ह्यांनी असा तर्क सुचविला आहे की, धोरप्पा हे ध्रुव ह्या संस्कृत नामविशेषाचे प्राकृत रूप आहे. राष्ट्रकूट सम्राट ध्रुव धारावर्ष (इ. स. ७८०-७९३) ह्याचे एक बिरूद 'निरूपम' असे होते. तर वड्डिगाचा स्वामी कृष्ण तृतीय ह्याच्यानंतर राज्यावर आलेला खोट्टिग ह्याला निरूपम ह्या नावाचा धाकटा भाऊ होता. कदाचित् ह्या निरूपमाचेच दुसरे नाव ध्रुव किंवा धोरप्पा असेल. (राष्ट्रकूट राजांना वेगवेगळी बिरूदे धारण करण्याची अनिवार आवड होती व समान नावांचे राजे सारखीच बिरूदे धारण करीत असत. कृष्ण

प्रथम, कृष्ण द्वितीय, व कृष्ण तृतीय या सर्वांचेच आवडते बिरूद अकालवर्ष होते. आणि ह्यातील पहिल्या दोघांचे बिरूद शुभतुंग असेही होते.) अर्थात्, खोट्टिगाचा धाकटा भाऊ निरूपम ह्याचे एक नाव ध्रुव असणे सहज शक्य आहे. हे जर खरे असेल तर हाच ध्रुव वद्दिगाचा सासरा होता, असे म्हणावे लागेल.

आता आपण यादव आणि त्यांचा अधिपती कृष्ण द्वितीय ह्याच्या संबंधाविषयी विचार करू. मागे दृढप्रहारीविषयी विचार करतानाच आपण पाहिले की, राष्ट्रकूट गोविंद तृतीयांनंतर राष्ट्रकूटांचे विशाल साम्राज्यास उतरती कळा लागत चालली होती. उत्तरेत गुर्जर प्रतिहारांशी सतत युद्धे चाललीच होती. त्यात माळव्यात परमारांची नवीच सत्ता उदयास येत होती. राष्ट्रकूटांचा ऱ्हास हे त्यांना वरदान ठरले. अशा अवस्थेत राष्ट्रकूट कृष्ण तृतीय नंतर खोट्टिग हा राजा झाला. त्याच्या काळात परमारांना चांगलाच वाव मिळाला. त्यांनी आता मंडलाधिपती सामन्तत्त्वनिदर्शक पदवी सोडून, महाराजाधिराज ही पदवी धारण केली. परमार सियक द्वितीय राष्ट्रकूटांची राजधानी मान्यखेटवर चाल करून आला व त्याने मान्यखेटचा संपूर्ण विध्वंस केला. आता राष्ट्रकूटांचे मांडलिक हळूहळू स्वतंत्र होऊ लागले. राष्ट्रकूटांचे मांडलिक चालुक्य ह्यांनी स्वातंत्र्याची घोषणा केली व राष्ट्रकूट कर्क द्वितीय ह्याचा मांडलिक तैलप द्वितीय हा स्वतंत्र राजा झाला, तेव्हा कर्कराज राजधानी सोडून पळून गेला.

आता सत्तास्पर्धा एकीकडे माळव्याचे परमार अणि दुसरीकडे नव्याने स्वतंत्र झालेले कल्याणीचे चालुक्य यांच्यात सुरू झाली. चालुक्य तैलप द्वितीय ह्याने परमार वाक्यतिराज मुंज ह्याचे प्रदेशावर सतत आक्रमणे चालू ठेवली. असे मेरुत्तुंगाचा ग्रंथ 'प्रबंधचिंतामणि' ह्यावरून कळते. शेवटी मुंज प्रतिकाराला तयार झाला. एका भीषण वैराची ज्योत जागविली गेली व ती पिढ्यानपिढ्या तशीच जळत राहिली. वाक्यतिराज मुंजासारखा उदार, कलारसिक राजमंडळाला केवळ ललामभूत, सौजन्याचा सागर असा राजा त्यात शेवटी बळी गेला व पद्मगुप्तासारखा कवी त्याच्या मृत्यूने शोकविव्हल झाला.[१] मेरुत्तुंग असे सांगतो की, मुंजाने तैलपाचा एकूण सहा वेळा पराभव केला, तर चालुक्याच्या नीलगुंडा शिलालेखावरून परमारांचाही काही वेळा तरी पराभव झाला असे दिसते. चालुक्य आणि परमार ह्यांचे अशाच एखाद्या जीवघेण्या युद्धात वद्दिगाचा पुत्र भिल्लम द्वितीय ह्याने तैलपाचे बाजुने पराक्रम गाजवून परमार सैन्यास धूळ चारली असावी. संगमनेर ताम्रपटात भिल्लमाने मुंजाचा पराभव करून रणरंगभीम ह्यास मदत केली, असे वर्णन

**१. तैलप द्वितीय ह्याने वाक्यतिराज मुंजाला ठार मारल्यानंतर पद्मगुप्ताने पुढील उद्‌गार काढले.**

**हा! शृंगारतरंगिणीकुलगिरे! हा! राजचूडामणे !**<br>
**हा! सौजन्यसुधानिधान! अहह! वैदग्ध्यदुग्धोदधे !**<br>
**हा! देवोज्जयिनी ! भुजंगमयुवती प्रत्यक्षकंदर्प हा !**<br>
**हा! सद्‌बांधव ! हा कलामृतकर !क्वासि ? प्रतीक्ष स्वमाम् !**

आहे. रणरंगभीम म्हणजेच चालुक्य नृपती तैलप द्वितीय हा होय. त्याचे एक बिरूद आहवमल्ल असे होते. आहवमल्ल व रणरंगभीम हे समानार्थीच शब्द आहेत. (संगमनेर ताम्रपटात मात्र कोरक्याचा चुकीमुळे 'स्वेनाराति .........' ह्या श्लोकाच्या आधीचे दोन श्लोक गाळले गेले असून, भिल्लम द्वितीयचे पराक्रम चुकून वड्डिगाचे नांवावर लिहिले गेले आहेत, असे त्या ताम्रपटाचे संपादक डॉ. कीलहॉर्न यांनी दाखवून दिले आहे.)

ह्या सर्व विवेचनाचा सारांश असा की, वड्डिग हा राष्ट्रकूट कृष्ण तृतीयचा मांडलिक होता. त्याने राष्ट्रकूट राजा धोरप्पा किंवा ध्रुव द्वितीय निरूपम ह्याची कन्या व्होडियव्वा हिच्याशी विवाह केला. यादव घराण्यातील राष्ट्रकूटांचा मांडलिक असा तो शेवटचाच. त्याचा पुत्र भिल्लम द्वितीय ह्याने राष्ट्रकूटांचे पडत्या काळात चालुक्यांचा उगवत्या सत्तेला अर्घ्य दिले व चालुक्य तैलप द्वितीय ह्याचे बाजूने परमारांविरुद्ध युद्धात भाग घेतला. वड्डिगापासून पुढचे सर्व यादवराजे आता चालुक्यांचे मांडलिक समजले पाहिजेत.

राष्ट्रकूट सम्राट कृष्ण तृतीय अकालवर्षदेव हा त्या वंशातील शेवटचा पराक्रमी राजा होय. डॉ. अळतेकर म्हणतात, त्याप्रमाणे 'सकलदक्षिणादिग् धिपती' ही पदवी त्यालाच शोभून दिसते. ह्याच सम्राटाचे स्वामित्व वड्डिगाने स्वीकारले व अभिमानाने चालविले.

**धाडियस द्वितीय :**

यादव वंशाची संगमनेर, कळस, वसई, अश्वी इत्यादि ताम्रशासने वड्डिगानंतर भिल्लम द्वितीयचेच नाव घेतात. या ताम्रपटातून वंशावळीचा क्रम काहीसा विचलित झाल्याचे आढळून येते व इथे कोरक्याने काही श्लोक गाळले असावेत, असे दिसते. हेमाद्री मात्र आपल्या राजप्रशस्तीत -

**जज्ञे धाडियमस्ततः प्रतिभटक्ष्मापालकालानलः ॥**

असा वड्डिगानंतर धाडियसाचा उल्लेख करतो. कदाचित् या ताम्रपटातील गाळल्या गेलेल्या ओळींमध्ये धाडियसाचे नाव असावे. हा भिल्लम द्वितीयचा थोरला भाऊ असावा. हेमाद्री ज्या अर्थी या धाडियसाचा शूर म्हणून गौरव करतो, त्या अर्थी त्याने आपल्या शत्रूंविरुद्ध (परमार) काही पराक्रम गाजवला असावा. त्याचेच काळात सियक द्वितीय ह्या परमार नृपतीने मान्यखेटचा विध्वंस केला (इ. स. ९७२) याच वर्षी प्राकृत भाषेचा कवी धनपाल याने आपला ग्रंथ 'पाइयलच्छी' पूर्ण केला.

**भिल्लम द्वितीय :**

हेमाद्रीचे व्रतखंडातील -

**तस्मादाविरभूत्प्रभूतविभवो भर्ता भुवो भिल्लमः ।**

या श्लोकार्धावरून धाडियसानंतर भिल्लम द्वितीय हा राजा झाला, हे कळते. परंतु वड्डिग आणि भिल्लम यांच्यात काय नाते होते, ते हेमाद्री सांगत नाही. कळस ताम्रपटात मात्र त्याला स्पष्टपणे वड्डिगाचा पुत्रच म्हटले आहे. तेव्हा तो धाडियसाचा धाकटा भाऊ असावा, असे दिसते. मात्र याच

ताम्रपटातील-

तस्माद् दुग्धमहार्ण्णवादिव शशी विश्वं समुद्भासयन्
सीमा शौर्यरसस्य भिल्लमनृपः संग्रामरामोऽभवत् ।

या श्लोकावरून विद्वावानांनी अनेक तर्क लढविले आहेत. धाडियस हा वद्दिगाला पदच्युत करून राज्यावर आला. पण त्यालाही बाजूला सारून भिल्लम द्वितीय ह्याने राज्य मिळविले. ज्या अर्थी वरील श्लोकात भिल्लमाला क्षुब्ध समुद्रातून वर येणारा चंद्र असे म्हटले आहे, त्या अर्थी तो धाडियसाच्या राज्यक्रांतीच्या प्रयत्नाला बाजूला सारून वर आल्याचे दिसते. डॉ. ओंकारप्रसाद वर्मांनी या विधानांचे खंडन करताना लिहिले आहे की, यादव राजघराण्याच्या उदयकाळीच अशा राज्यक्रांतीची घटना घडेल, हे पटत नाही. शिवाय धाडियस हा (हेमाद्री मतानुसार)वद्दिगाचा पुत्र होता व वद्दिगाचा पराक्रम लक्षात घेता, त्याचा पुत्र त्याचे विरुद्ध क्रांती करील, हे योग्य वाटत नाही. पण या सर्व आक्षेपांचा व त्यावरील उत्तरांचा पाया मुळात दुर्बळ आहे. वरील श्लोकात राज्यक्रांतीचा मूळ आधार जो 'क्षुब्ध समुद्र' तो वरील श्लोकात कुठे नाहीच मुळी ! इथे फक्त 'क्षीरसमुद्रातून चंद्राचा उद्भव व्हावा, तसा भिल्लमाचा उदय झाला एवढेच काय ते वर्णन आहे. यादव स्वतःला सोमवंशी समजत असल्यामुळे असे वर्णन येणे सहज शक्य आहे. भिल्लमाची समुद्रातून उदय पावणाऱ्या चंद्राशी तुलना हा केवळ कविकल्पनेचा विलास आहे. त्यात राजकीय घटना शोधणे फारसे फलदायी होणारे नाही. सारांश, हेमाद्रीचे राजप्रशस्तीनुसार वद्दिगानंतर धाडियस व त्यानंतर भिल्लम द्वितीय हे यादव सिंहासनावर आले.

आता आपण भिल्लम द्वितीय ह्याचे कर्तृत्वाचा विचार करू. त्याच्या राज्यकालातील संगमनेर ताम्रपट, शके९२२ चा असून, तो यादव राजवंशाचा पहिला उपलब्ध लेख आहे. या ताम्रपटाची भाषा संस्कृत पण अशुद्ध आणि व्याकरणदुष्ट आहे. यात यादवांची पौराणिक वंशावळ शंभु-ब्रह्मा-मरीचि-अत्रि-इंदु-पुरुरवा-आयुस्-नघुष-ययाति-यदु अशी दिलेली आहे. ऐतिहासिक भागात दृढप्रहारीला गाळले असून, वंशावळीला सेऊणचंद्रापासून प्रारंभ केला आहे. यादव राजघराण्याचा पहिला ऐतिहासिक लेख म्हणून या ताम्रपटाचे महत्त्व अनन्यसाधारण आहे.

संगमनेर ताम्रपटात भिल्लमाचा पराक्रम वर्णन करण्यासाठी जो श्लोक आला आहे त्याचा अर्थ असा की, भिल्लमाने मुंजराजाचा पराभव केला आणि चंचल लक्ष्मीला आपला स्वामी रणरंगभीम ह्याचे गृही पातिव्रत्यधर्माने राहावयास भाग पाडले. त्यापैकी मुंज म्हणजेच प्रख्यात परमारनृपती वाक्पतिराज मुंज होय. मेरूत्तुंगाचा प्रबंधचिंतामणि ग्रंथ सांगतो की, चालुक्यांनी त्याच्या प्रदेशावर वारंवार आक्रमणे करून त्यांस अतिशय त्रास दिला.

मात्र रणरंगभीम नावाबद्दल दोन तर्क संभवतात. चालुक्य तैलप द्वितीय ह्याचा पुत्र सत्याश्रय ह्याचे एक बिरूद 'साहसभीम' होते, असा त्याचा राजकवी रन्न सांगतो. ही पदवी रणरंगभीम ह्या

पदवीशी किंचित् जुळतेही. पण सत्याश्रय हा राज्यावर येण्याचे आधीच परमार वाक्यतिराज मुंज हा तैलप द्वितीयचे बंदीवासात मृत्यू पावला, असे मेरुत्तुंग सांगतो. तेव्हा सत्याश्रय आणि मुंज ह्यांच्यात युद्ध होण्याची सुतराम शक्यता नाही.[२]

तैलप द्वितीय व वाक्यतिराज मुंज ह्याच्यातील वैर मात्र इतिहासप्रसिद्ध आहे. त्यानेच मुंजाला ठार मारले, असे प्रबंधचिंतामणि ह्या ग्रंथावरून व तैलपाचे वंशजांच्या अनेक शिलाताम्रशासनातूनही कळते. शिवाय तैलपाचे 'आहवमल्ल' हे बिरूद 'रणरंगभीम' ह्या अर्थाचेच आहे. तेव्हा भिल्लमाने ज्या सम्राटासाठी वाक्यतिराज मुंजाविरुद्ध झुंज घेतली, तो चालुक्य तैलप द्वितीयच होता, यात संशय उरत नाही.

संगमनेर ताम्रपटात भिल्लमाने एका नूतन शिवालयाची उभारणी केली असेही कळते. या मंदिरातील दैवताचे नाव 'विजयाभरणनाथ' असे दिले आहे. 'विजयाभरण' हे भिल्लम द्वितीयचेच बिरूद असावे. प्राचीन काळी मंदिराच्या निर्मात्याचे नाव त्या दैवतास बहुधा जोडले जात असे.[३] त्यामुळे 'विजयाभरण' हे भिल्लमाचेच बिरूद असावे. मुंजपरमार व तैलप द्वितीय ह्यांच्यातील घनघोर युद्धात पराक्रमाचे प्रदर्शन केल्यामुळेच ते त्याच्या स्वामीनें दिले असावे, असाही तर्क संभवतो.

याशिवाय या ताम्रपटात भिल्लमाची बिरूदे महासामंत, आरातिसूदन संग्रामराम, सेल्लविदेग, कुंदुकाचार्य व द्वारावती पुरवराधीश्वर अशी येतात. सेल्लविदेग हे कानडी बिरूद वाटते. ते भिल्लमाला त्याचा कानडी स्वामी तैलप द्वितीय ह्याने दिले असावे. त्याचा अर्थ भाला चालविण्यात कुशल. सेल्ल म्हणजे भाला. कुंदुकाचार्य ह्या बिरूदावरून तो चेंडू खेळण्यात प्रवीण असावा असे वाटते. द्वारावतीपुरवराधीश्वर ही पदवी यादव राजे आपण द्वारकेहून महाराष्ट्रात स्थलांतरित झालो, हे सांगण्यात कसा अभिमान बाळगीत, ते सूचित करते.

**लस्थियव्वा :**

संगमनेर, कळस, अश्वी आणि वसई ताम्रपटात भिल्लमाच्या पत्नीचे नाव लस्थियव्वा, लच्छियव्वा किंवा लक्ष्मी असे येते. तिच्या वर्णनासाठी अश्वी ताम्रपटात आलेला श्लोक असा-

**भार्या यस्य च झंझराजतनया श्रीलस्थियव्वाह्वया**

२. तैलपाने मुंजास जिंकून बंदीवासात टाकल्यानंतर तैलपाची बहीण मृणालवती हिचे मुंजावर प्रेम बसले व दोघांनी पळून जाण्याचा गुप्त कट केला पण शेवटी मृणालवतीने ही वार्ता तैलपास सांगितली व रागावलेल्या तैलपाने मुंजांस जीवे मारले. ३. उदाहरणार्थ, विष्णुवर्धन जिनालय, शंखवसवि, चामुंडरायवसदि, द्रोहघरट्ट जिनालय ही कर्नाटकातील जैन मंदिरांची त्यांच्या निर्मात्यांवरून पडलेली नावे पहा किंवा पैठण येथील सोमेश्वरदेवाचे शिलालेखातील सोढल नारायण, वेसुनारायण, म्हातुनारायण ही दात्यांचे नावावरून पडलेली देवतांची नावे पहा. (प्राचीन मराठी कोरीव लेख, पृष्ठ ३६९ व मिराशी वा. वि., पैठणचा नवीन शीलालेख, नवभारत व १० अंक ३ पृ. १०-१२).

धर्मत्यागविवेकबुद्धिसगुणा श्रीराष्ट्रकूटान्वया
या जाता नवबालराजसमये यद्वन्वयाधारिता
सप्तांगोद्यतराज्यभारधरणात् राज्यत्रयार्घ्या ततः ॥

यातून पुढील गोष्टी प्रकट होतात :

१ लक्ष्मी किंवा लस्थियव्वा ही धर्म व त्याग, विवेक व बुध्दी यांनी युक्त असून, ती झंझराजाची कन्या होती.

२ ती राष्ट्रकूट वंशातील होती.

३ लस्थियव्वा हिने स्वतःच्या मुलाचे राज्य पालक या नात्याने नीट सांभाळले.

४ ती तीन राजकुलांना पवित्र व पूजार्ह होती.

यातील झंझराज कोण व लस्थियव्वा राणी कोणत्या तीन राजवंशांना वंदनीय होती, ह्याचा शोध घेतला पाहिजे. पंडित भगवानलाल इंद्रजी ह्या झंझराजाला कोंकणच्या शिलाहार घराण्यातील समजतात. कारण मसूदी ह्या मुसलमान इतिहासकाराने झंझराज हा सैमूर (चेमूल=चौल) येथे राज्य करीत होता, असे लिहिले आहे. पण एक तर हा झंझराज राष्ट्रकूट घराण्यातील नव्हता व दुसरे असे की, झंझराज शिलाहाराचा काळ अंदाजे ८४८ शके किंवा ९२२ इ. स. असा आहे. व तो भिल्लम द्वितीयचे काळाशी (शके ९२२ किंवा इ. स. १०००) मिळता नाही. कदाचित् झंझ एखाद्या लहान राष्ट्रकूट शाखेचा सामंत राजा असावा, अशी छोटी सामंत घराणी त्या काळी पुष्कळ होती.[४] लस्थियव्वा जरी राष्ट्रकूटांच्या एखाद्या शाखेतील असली, तरी तिने त्या शाखेचे नाव उज्ज्वल केले. साहजिकच तिच्यामुळे जुन्या मान्यखेटच्या राष्ट्रकूट वंशालाही पुन्हा प्रतिष्ठा प्राप्त झाली असावी. अर्थात ती ज्या तीन कुळांना वंदनीय ठरली, ती अशी-

१ पितृकुळ- एखादे लहान राष्ट्रकूट घराणे

२ पतिकुळ- यादव राजघराणे

३ राष्ट्रकूटकूळ- हिच्यामुळे राष्ट्रकूटांच्या बुडत्या घराण्याचे नाव पुन्हा उज्ज्वल झाले.

अशा ह्या कर्तृत्वशाली स्त्रीने आपली मुले लहान असता नव्याने प्राप्त झालेले व सप्तांगांनी विस्तृत होऊ लागलेले राज्य[५] नीट सांभाळले. सातवाहन कुळातील नागनिका किंवा वाकाटक कुळातील प्रभावती, जिजाबाई, अहिल्याबाई होळकर यांचेप्रमाणेच ह्या लस्थियव्वा राणीचे चरित्र असावेसे वाटते. पण दुर्दैवाने या वंदनीय स्त्रीबद्दल जास्त माहिती उपलब्ध नाही. यादवांच्या उदयाच्या काळात तिच्या थोर व गरिमाशाली स्वभावामुळे यादवांची प्रतिष्ठा वाढली असावी.

४. उदाहरणार्थ, नागपूर म्युझियम (सीताबर्डी) शिलालेखात (शक १००८) चालुक्यांचा मांडलिक महासामंत धाडिअदेव राणक हा लत्तनौरविनिर्गत राष्ट्रकूटवंशातील होता, असे वर्णन आहे. E. I. Vol. III, page 304-306. ५. स्वामी, अमात्य, मित्र, कोश, राष्ट्र, दुर्ग व सेना ही राज्याची सात अंगे होत.

कोंकणातील शिलाहार राजा अनंतदेव ह्याचे खारेपाटण ताम्रपटात भिल्लम नामक एका यादव राजाचा उल्लेख येतो. तो असा की, शिलाहार अपराजितदेवाने (९७५ ते १०१० इ. स.)

१) गोम नावांचे राजास साहाय्य केले.

२) ऐयपदेवाचे राज्य राखले.

३) भिल्लमास संरक्षण दिले.

अपराजितदेवाचा काळ भिल्लम द्वितीयचे काळाशी मिळताजुळता आहे. तेव्हा खारेपाटण ताम्रपटातील भिल्लम हा भिल्लम द्वितीयच असावा. यापैकी पहिल्या दोन राजांविषयी आपणांस माहिती उपलब्ध नाही. त्यापैकी एक जण बस्तरच्या नागवंशी राजांपैकी असावा, असा डॉ. मिराशींचा तर्क आहे.[६] व त्याचा आधार घेऊन शिलाहार अपराजितदेव व भिल्लम द्वितीय ह्यांचे संबंधी डॉ. ओंकारप्रसाद वर्मांनी केलेले विवेचन गुंतागुंत वाढविणारे आहे.[७] पद्मगुप्त कवीच्या नवसाहसांकचरित या ग्रंथात परमार राजा सिंधुराज ह्याला विद्याधरांनी साहाय्य केले, असे वर्णन आहे. हे विद्याधर म्हणजे शिलाहार राजेच असावेत. कारण ते आपल्या वंशाची उत्पत्ती विद्याधर जीमूतवाहन याचेपासून मानतात. अर्थात्, शिलाहार व परमार यांच्यात मैत्रीपूर्ण संबंध होते, हे स्पष्ट झाले. यादव आता चालुक्यांचे मांडलिक असल्यामुळे त्यांची परमारांशी वारंवार युद्धे होत असत, हे आपण मागेच पाहिले. अशाच एखाद्या अडचणीचे क्षणी शिलाहारांनी परमारांकडील आपली प्रतिष्ठा वापरून यादवांना साहाय्य केले असावे किंवा असेही असेल की, जेव्हा परमार सिंधुराज बस्तरच्या नागवंशी राजविरूद्ध निघाला व त्याला शिलाहारांनी सैनिकी साहाय्य दिले, तेव्हा ज्यांनी अगदी नव्यानीच चालुक्यांचे सामंतपद स्वीकारले आहे अशा यादवांची मधल्यामध्ये शंभर वर्षे भरली. कोंकणातून बस्तरकडे जाण्याचा मार्ग सेऊणदेशातूनच जातो. अशा वेळी अत्यंत कूटनीतीने वागून भिल्लम द्वितीय हा अपराजित शिलाहारालाच शरण गेला असावा व त्याने आपले राज्य वाचविले असावे. राजकारणात बुडत असता काडी समजून सापाचाही आश्रय घ्यावा लागतो.[८]

भिल्लम एका महत्त्वाच्या संधिकाळात यादव सत्तेचा प्रमुख झाला. राष्ट्रकूट साम्राज्य अस्ताला जात होते. कल्याणीला चालुक्यांचा भाग्यरवी उदयाचलावर होता. दक्षिण भारताचे मानचित्र पालटत होते. नवीन मनुला प्रारंभ होत होता. द्वितीय भिल्लमाने ह्या उदयरवीलाच अर्घ्य दिले व आपल्या वंशाचा भाग्योदय साधला. यादव सत्तेची प्रबळ पायावर उभारणी करणारा राजा म्हणून त्याचे महत्त्व यादव इतिहासात अनन्यसाधारण आहे.

****

६. I. A. Vol. LXII, page 120. ७. Dr. Verma, Yadavas and their times, page 27-28. ८. शहाजीला बंदिवासातून सोडविण्यासाठी शिवाजी महाराजांनी शहाजहानचा आश्रय घेतला, हे उदाहरण यावेळी स्मरते.

# वेसुगि ते सेऊणचंद्र द्वितीय

**वेसुगि :**

हेमाद्रीरचित राजप्रशस्तीत भिल्लम द्वितीय ह्याचेनंतर वेसुगिचे नाव येते ते असे-

**एतस्मान्महसां महानिधिरसौ श्रीवेसुगिर्जज्ञिवान् ॥**

कळस ताम्रपटात त्याचे नावामागे सामंतचुडमणि हे बिरूद असून, त्याची पत्नी नायलदेवी किंवा नायल्लादेवी ही गोग्गि राजाची कन्या होती, असे म्हटले आहे. डॉ. भांडारकरांचे मते 'हा गोग्गि म्हणजे शिलाहार वंशातील झंझराजाचेही आधी निदान पन्नास वर्षे तरी आहे, हे आपण मागे पाहिलेच, तेव्हा त्याचा भाऊ वेसुगिचा समकालिन असावा, असे वाटत नाही.

लाट देशातील चालुक्यांच्या वंशात बारप्पाचा पुत्र म्हणुन एका गोग्गि राजाचे नाव येते. या वंशातील त्रिलोचनपालदेव राजाचे एका अभिलेखात-आपला पूर्वज गोग्गिराज ह्याने 'महाविष्णूने राक्षसांपासून पृथ्वीचा उद्धार करावा', तसा आपल्या भूमीचा राक्षसांपासून उद्धार केला, असा उल्लेख आहे. हे राक्षस म्हणजेच अनहिलवाडपाटणचे सोळंकी राजे होते, असे रासमाला या गुजरातचे इतिहास ग्रंथावरून कळते, तर प्रख्यात जैन पंडित कलिकालसर्वज्ञ हेमचंद्र ह्याचे 'द्व्याश्रय' काव्यावरून अनहिलवाडपाटणचा मूळराज सोळंकी ह्याने आपला पुत्र दुर्लभराज ह्याच्या साहाय्याने लाट देशावर आक्रमण करून बारप्पाला ठार मारले, असा उल्लेख सापडतो. बारप्पा हा कल्याणीचे चालुक्य वंशातील तैलप द्वितीय ह्याचा सामंतच होता. अशा अवस्थेत गोग्गिने यादवांचे साहाय्य मागणे सहज शक्य आहे व यादवही कल्याणीच्या चालुक्यांचे मांडलिक असल्यामुळे, त्यांनी गोग्गिला साहाय्य केले असावे. हे ऋण गोग्गिने यादववंशात आपली कन्या देऊन फेडले असावे.

यादव शिलाताम्रशासनातून वेसुगिच्या नावाचे तेसुकी, वासुगि वादुगि असेही पर्याय आढळतात.

**अर्जुन :**

यादवांचे अभिलेखातून वेसुगिनंतर भिल्लम तृतीय ह्याचेच नाव येते, पण हेमाद्री मात्र आपल्या राजप्रशस्तीत वेसुगिनंतर अर्जुनाचे नाव देतो, ते असे-

**हन्ता भीष्मभुजौजसामसुहृदां तस्मादभूदर्जुनः ॥ २४ ॥**

**अजसमाविष्कृतदानवारिः**

**प्रभूतहस्तार्पितदानवारिः**

**ततःस राजा विरराज राजा-**

**-श्रियो विलासैर्जितराजराजः ॥ २५ ॥**

येथे हेमाद्रीने अर्जुनाच्या पराक्रमाला महाभारतातील अर्जुनाच्या भीष्माविद्धच्या पराक्रमाची उपमा

दिली आहे. कदाचित्, ह्या अर्जुनानेही अनहिलवाडपाटणच्या सोळंकी राजांविरुद्ध काही विजय मिळविले असावेत. तो मोठा दातृत्वशील, विलासी आणि वैभवशाली होता, असे वरील प्रशस्तीश्लोकावरून वाटते.

**भिल्लम तृतीय :**

अर्जुनानंतर हेमाद्री भिल्लम तृतीयचे नाव देतो. ते असे-

**आसीद् विलासी नृपतेरमुष्मात्स भिल्लमः पल्लवितोरुकीर्तिः**

ह्याचे काळतील कळस बुद्रुक ताम्रपट प्रसिद्ध आहे व तो भिल्लम तृतीय ह्याने शके ९४८ क्रोध संवत्सरात कार्तिक महिन्यात सूर्यग्रहण पर्वावर दिलेला आहे. (याची इंग्रजी मिती २३ नोव्हेंबर १०२५, मंगळवार अशी येते) याचा अर्थ असा की, भिल्लम तृतीयचा राज्यकाल १०२० ते १०४५ असा गृहीत धरता येईल. यावेळी कल्याणीचे चालुक्य सत्तेवर सम्राट जयसिंह द्वितीय जगदेकमल्ल हा विराजमान होता. त्याचा काळ १०१५ ते १०४२ इ. स. असा आहे.

या काळात परमार सिंहासनावर महाप्राक्रमी व विख्यात राजा भोज हा होता. त्याचे शिलाताम्रशासनावरून त्याने लाट, कर्ण्णाट व कोंकण प्रांतावर विजय मिळविला असे कळते. त्याचा उत्तराधिकारी यशोवर्मा याचा ताम्रपट तर नाशिक जिल्ह्यात कळवण ह्या ठिकाणी सापडला आहे. भोजचरितात भोजाने कल्याणीच्या चालुक्यांचा पराभव करून आपल्या चुलत्याच्या वाक्यतिराज मुंजाच्या पराभवाचा सूड घेतला, असे म्हटले आहे.

जयसिंह द्वितीय जगदेकमल्ल ह्याला हा काळ चांगलाच कठीण गेला असणार. त्याचे सामंतही त्याचेविरूद्ध गुप्त योजना आखू लागले. त्याच्या काही सामंतानी तर त्याला जीवेच मारण्याचा कट केला होता, असे त्याच्या नागाई शिलालेखावरून कळते. त्या राजद्रोही सामंतात भिल्लम तृतीयही सामील असावा, असा डॉ. नीलकान्त शास्त्री ह्यांचा तर्क आहे. नांदेड जिल्ह्यात तळखेडला सापडलेल्या शके ९६९ च्या शिलालेखाचा त्यांनी आधार घेतला आहे. यात जयसिंह द्वितीय जगदेकमल्ल ह्याचा उत्तराधिकारी सोमेश्वर प्रथम ह्याचा ब्राह्मण सेनापती नागवर्म ह्याचा उल्लेख असून, त्याचे एक बिरूद 'सेऊणदिशापट्ट' असे दिले आहे. तेव्हा डॉ. नीलकान्त शास्त्रींचा असा तर्क आहे की, तृतीय भिल्लम हा परमारास जाऊन मिळाल्यामुळे चालुक्यांचे बाजूने नागवर्म ह्याने त्याचा पराभव करून 'सेऊणदिशापट्ट' ही पदवी स्वीकारली असावी.

पण हा तर्क सत्याचे कसोटीस उतरणारा नाही. एक तर जयसिंह द्वितीय ह्याची कन्या हम्मा अथवा आवल्लदेवी हीच भिल्लम तृतीय ह्यास दिलेली, अशा अवस्थेत तो आपल्या श्वशुराविरुद्धच परमारांना साहाय्य करील, हे न पटणारे आहे. दुसरे असे की, नागवर्म ह्याला केवळ 'सेऊणदिशापट्ट' एवढीच पदवी आहे. येथे सेऊणदिशा म्हणजे पश्चिम दिशा (नांदेड जिल्ह्याचे संदर्भात) एवढाच अर्थ संभवतो. अनेक नगरांतून उत्तरेकडच्या वेशीला दिल्ली दरवाजा व

पश्चिमेकडच्या वेशीला मक्का दरवाजा म्हणतात किंवा त्या त्या दिशेला जे नगर असेल, त्याचे नाव वेशीला देतात; तसाच हा नागवर्म पश्चिम दिशेला 'सेऊणदेशाची दिशा-सेऊण दिशा' म्हणताना दिसतो व या दिशेकडे त्याने काही विजय मिळविले असावेत. मराठवाडा भागात शके ९५० ते ११५० च्या काळात बरीच लहान सामंत घराणी होती, असे आपणांस या भागातील शिलाताम्रशासनांवरून कळते. कदाचित् ह्यातील एखाद्या सामंताविरुद्ध नागवर्मा ह्याने काही सैनिकी अभियान काढले असावे. त्यात भिल्लम तृतीय हा परमारांना जाऊन मिळणे, नागवमनि त्याचा पराजय करून 'सेऊणदिशापट्ट' इत्यादि बिरूद धारण करणे ह्या गोष्टींचा संबंध नाही. ह्या नागवर्म्याची बिरूदे मोठी लांबलचक दिसतात. विंध्याधिपमल्लशिरच्छेदन, मारवर्ममदमर्दन ही त्यातील काही. यातच वरील सेऊणदिशापट्ट हे बिरूद आहे. त्याची एवढी गंभीरपणे चर्चा करण्याचे फारसे कारण नाही.

भिल्लम तृतीय यांस कळस ताम्रपटात संग्रामराम हे बिरूद लावलेले आढळते. आपणांस आठवते की, हेच बिरूद द्वितीय भिल्लमानेही स्वीकारले होते. द्वितीय भिल्लमाने ज्याप्रमाणे तैलप द्वितीय ह्यास परमार वाक्पतिराज मुंज ह्याचे विरुद्ध साहाय्य केले, तसेच साहाय्य भिल्लम तृतीय ह्याने जयसिंह द्वितीय ह्यास भोज-परमार व यशोवर्मा ह्यांचेविरुद्ध केले असावे, असा तर्क सहजच सुचतो.

हेमाद्रीच्या राजप्रशस्तीतील-

**आसीद् विलासी नृपतेरमुष्मात्स भिल्लमः पल्लवितोरुकीर्तिः**
**स वादुगिः स्वादुगिरां कवीनां स्तोत्रैकपात्रं भवति स्म तस्मात् ॥**
**ततो महीं महीपालः पालयामास वेसुगि :**
**संहृतप्रोद्यदुद्दामधामसामंतसंतति : ॥ २७॥**
**ततोऽपि नृपभिल्लमः समरसीमभीमक्रियः**
**निरर्गलभुजार्गलायुगलकाललीलालयः ।**

या श्लोकातून भिल्लम तृतीय-वादुगि-वेसुगि-भिल्लम चतुर्थ हा वंशक्रम निघतो. या सर्वांची नावे यादव शिलाताम्रशासनांत येत नाहीत, उलट कळस व वसई ताम्रपटात तृतीय भिल्लमानंतर एकदम सेऊणचंद्र द्वितीयाचेच नाव येते. कळस ताम्रपटाची मिती १०२५ इ. स. व देवळाली ताम्रपटाची मिती १०५२ इ. स. अशी आहे. या उण्यापुऱ्या २७ वर्षांचे काळात हेमाद्री मतानुसार हे चार राजे झाले आहेत. अर्थात, त्यांचा राज्यकाल अतिशय मर्यादित व अल्प असावा. डॉ. वर्मांनी मात्र या चार राजांना शक ९४८ (कळस ताम्रपट) व शक ९९१ (वसई ताम्रपट) या दोन तिथ्यांचे मध्ये ठेवून व सेऊणचंद्र द्वितीयच्या देवळाली ताम्रपटाच्या (शक ९७४) चा विचार न करता त्यांना एकूण ४२ वर्षांचा राज्यकाल दिला आहे, ते चूक आहे.

वादुगिला हेमाद्रिने कवींचा आवडता व स्तुतिपात्र म्हटले आहे. त्यानंतर वेसुगिचा क्रम येतो. त्याने काही उद्दाम सामंतांचे दमन केले, असे म्हटले आहे. सेऊणचंद्र द्वितीयच्या वाघळी शिलालेखात एका मौर्यकुलप्रदीप गोविंदराजाचा उल्लेख आहे. त्याने सेऊणचंद्र द्वितीयला आपला महामंडलनाथ म्हटले आहे. कदाचित् ह्या मौर्यकुलाला वेसुगिनेच शासन करून, यादवांचे अंकित केले असावे. आणि त्याच्या ह्याच पराक्रमाचा उल्लेख हेमाद्रीने 'संहृतप्रोद्यमुद्दामधामसामंत संततिः ।' या ओळीने केला असावा.

यानंतर भिल्लम चतुर्थ ह्याचे नाव येते. त्याला हेमाद्रीने समरांगणातील भीम म्हटले आहे. पण त्याविषयी फारशी माहिती उपलब्ध होत नाही.

**सेऊणचंद्र द्वितीय :**

हेमाद्री भिल्लम चतुर्थनंतर सेऊणचंद्र द्वितीयचे नाव देतो ते असे-

**ततः समरमेदिनीपतिपतंगभंगव्रत :**
**प्रतापशिखिलंघितस्त्रिजगदंगणः सेऊण : ॥२८॥**

अर्थ असा की, सेऊणचंद्राने अनेक राजांचा पराभव केला व त्याचे पराक्रमास तिन्ही जगांचे अंगण जणू उणे पडले. या सेऊणचंद्र द्वितीयचे आतापर्यंत एकूण तीन अभिलेख उपलब्ध झाले आहेत.

१ नव्यानेच उपलब्ध झालेला देवळाली ताम्रपट शक ९७४.
२ वसई येथील ताम्रपट शक ९९१.
३ वाघळी येथील शिलालेख शक ९९१.

देवळाली ताम्रपटावर एक टिपण प्रसिद्ध इतिहास संशोधक ग. ह. खरे यांनी All India History Congress च्या १९५५च्या अधिवेशनात वाचले. हा ताम्रपट शके ९७४ चा असून, त्यात सेऊणचंद्र द्वितीय ह्याने देवलवल्ली (आधुनिक देवळाली) हा गाव आपला दंडनायक श्रीधर ह्यास दान दिल्याचा उल्लेख आहे. हा सेऊणचंद्र द्वितीयचा सर्वांत आधीचा उपलब्ध लेख आहे.

वाघळी हे गाव खानदेशातील चाळीसगांवजवळ पूर्वेस सहा मैलांवर आहे. ह्या ठिकाणी एका शिवमंदिरात (सध्या ते महानुभाव पंथीयांचे अधिकारात आहे.) हा शिलालेख तीन शिलांवर कोरलेला आहे. या शिलालेखाचे संपादक डॉ. कीलहॉर्न यांनी त्यांना 'A', 'B' आणि 'C' अशा संज्ञा दिल्या आहेत. 'B' शिलेवरील लेख अगदीच नष्ट झाला आहे. उरलेल्या दोन शिलांवरील लेखांत मिळून महामंडलनाथ सेऊणचंद्र ह्याची प्रशस्ती व त्यांचे सामंतकुल असलेल्या सौराष्ट्रातील वलभी ह्या स्थानापासून आलेल्या मौर्य घराण्याची वंशावळ दिलेली आहे. व शेवटी मौर्यकुलप्रदीप गोविंदराज ह्याने शिवमंदिरास दिलेल्या दानांचे विवरण आहे.

वसई ताम्रपट, वसई येथे एका शेतकऱ्यास शेत खणताना सांपडला, तो डॉ. भाऊ दाजी यांचेकडे आला. त्यांचे मृत्यूचे पश्चात् तो डॉ. नारायण दाजींकडे होता. आनरेबल कमिशनर श्री.

गिब्ज ह्यांनी तो. बर्जेस ह्यांना दिला. तो. भगवानलाल इंद्रजी ह्यांनी इंडियन अँटिक्वरी पुस्तक १२ वे, पृष्ठ ११९-१२६ मध्ये छापिला आहे. या ताम्रपटाची मिती शके ९९१ श्रावण पूर्णिमा आहे. या पर्वावर राजाने चिंचोली गांव सर्वदेवाचार्य ह्यास दान दिल्याचा उल्लेख आहे.

सेऊणचंद्र द्वितीयविषयीचा राजप्रशस्तीतील श्लोकार्ध वर उद्धृत केलाच आहे. त्याच्या वसई ताम्रपटात व आईरमदेवाच्या अश्वी ताम्रपटात त्याच्याविषयी पुढील श्लोक येतो.

**तद्वंशोद्भव सेउणेन्दुनृपतिर्जातोत्र धर्माधिकः**
**सर्वान् भूतलयाश्रितान् क्षितिपतीन् निर्जित्य शौर्यासिना**
**राज्यं येन समुद्धृतं सतिलकं स्वर्गगते भिल्लमे**
**यद्वत्सूकररूपसाम्यहरिणा लोकत्रयं चाहृतं ॥**

याचाच अर्थ असा की, भिल्लम चतुर्थनंतर यादव राजवंशाला दुर्दशेचे दिवस आले व पृथ्वीचा उद्धार करणाऱ्या महावराहाप्रमाणे सेऊणचंद्राने आपल्या राज्याचा व वंशाचा या आपत्तीतून उद्धार केला.

या दुर्दशेला कारणेही तशीच होती. उत्तरेतील राजकारणात परमार भोजाविरुद्ध त्रिपुरीचा कर्णकलचुरि आणि गुजरातचा चालुक्य भीम एकवटले आणि त्यांनी भोजाचा पराभव करून थेट धारानगरीपर्यंत चाल केली. मालवप्रदेश कलचुरि अश्वारोहींनी तुडविल्यावर या प्रांताच्या दक्षिणेस असलेल्या सेऊण प्रदेशावर त्यांची दृष्टी पडणे अगदी स्वाभाविक होते. त्यात नाशिक जिल्ह्याचा काही भाग तर भोजाचा उत्तराधिकारी यशोवर्मा ह्याच्या अधिकारात होता, हे त्याच्या कळवण ताम्रपटावरून सहज सिद्ध आहे. कर्णकलचुरिच्या रीवा शिलालेखात त्यांने कुंतल पल्लव देश जिंकीत कांचीपुरापर्यंत आपल्या विजयी सेना नेल्या, असे वर्णन आहे. ते अतिशयोक्त आहे. पण त्यावरून कर्णाच्या सैनिकी अभियानाची दिशा कळते. परमारांचा इतिहास लिहिणारे डॉ. दिनेशचंद्र गांगुली यांनी तर असेही म्हटले आहे की, कलचुरिंचा सेनापती वपुल्लक ह्याने श्वेतपद प्रदेश (नाशिक विभाग) जिंकून घेतला. पण डॉ. मिराशी ह्यांनी असे साधार सिद्ध केले आहे की, श्वेतपद हा बुंदेलखंडाचा भाग आहे. ते कसेही असले तरी कर्णकलचुरिच्या ह्या उद्योगामुळे सेऊण राज्यास संकट निर्माण झाले असावे, हे मात्र तर्कसंगत वाटते.

दक्षिणेतही यावेळी चालुक्य आणि चोल ह्यांच्यातील संघर्ष पराकोटीला पोचला. यावेळी चोल सिंहासनावर वीरराजेंद्र हा सम्राट होता. त्याने इ. स. १०५४ च्या कोप्पमच्या युद्धात चालुक्यांचा भीषण पराभव केला. चालुक्य सोमेश्वर प्रथम दुर्बल शासक होता. त्याने चोल राजास कूडलसंगम ह्या स्थळी युद्धाचे आव्हान दिले व तू पूर्ण न करता आल्यामुळे शेवटी आत्महत्या केली. त्याचा उत्तराधिकारी चालुक्य सोमेश्वर द्वितीय हाही फारसा कर्तृत्वशाली नव्हताच. अशा अवस्थेत कलचुरिचे यश मध्यप्रदेश व महाराष्ट्र कर्णाट यांना व्यापून उरले तर नवल वाटावयास नको. या परिस्थितीत उदीयमान यादवसत्तेची नौका संकटांच्या वादळात हेलकावे खाऊ लागली.

याच घटनाक्रमांचा उल्लेख वसई व अश्वी ताम्रलेखात जलौघमग्न धारेची उपमा देऊन केला गेला असावा.

पण एवढ्यावरच दक्षिण भारतातील उलथापालथ संपली नाही. चालुक्य सोमेश्वर ह्याचे आत्मनाशानंतर चालुक्य घराण्यात गृहकलहाचा अग्नी लागला. सोमेश्वर द्वितीय आणि विक्रमादित्य सहावा (परमर्दिदेव) हे भाऊ-भाऊ परस्परांविरुद्ध युद्धाचे आव्हानात उभे ठाकले. साहजिकच त्यांच्या सामंतातही फूट पडली. अशा वेळी द्वारसमुद्रचे होयसळ, उच्छंगीचे पांड्य, गोव्याचे कदंब व यादव ह्यांनी विक्रमादित्य सहावा याची बाजू उचलून धरली तर वेंगीचा चोळ राजा राजेंद्र कुलोत्तुंग ह्याने सोमेश्वर द्वितीय ह्याचे साहाय्य केले.

सेऊणचंद्र द्वितीय या प्रसंगी सहाव्या विक्रमादित्याचे बाजूने मोठ्या धैर्याने उभा राहिला. म्हणूनच हेमाद्रीने -

**समुद्धृतो येन महाभुजेन द्विषां विमर्दात्परमर्दिदेवः**
**आस्थापि चालुक्यकुलप्रदीपः कल्याणराज्येऽपि स एव येन ॥ २९ ॥**

या श्लोकात सेऊणचंद्रने विक्रमादित्य सहावा (परमर्दिदेव) ह्याला केलेल्या साहाय्याचे वर्णन केले आहे. यामुळे साहजिकच सोमेश्वर द्वितीय आहवमल्ल यादवावर क्रुद्ध झाला. त्याच्या विचपल्ली (जि. मेहबुबनगर) येथील शिलालेखात त्याचा सेनापती छिद्दचोल महाराज याने एका सेऊणराजाचा पराभव केल्याचा उल्लेख आहे. तो सेऊणनृपती बहुधा सेऊणचंद्र द्वितीयच असावा.

या सर्व घटनाचक्रामुळे सेऊणचंद्राचे महत्त्व निःसंशय वाढते. त्याला विक्रमादित्य सहावा याचेकडून नवीन भूप्रदेशही मिळाला असावा. त्यांचे शिलालेख आता नाशिकचे पूर्वेस चाळीसगांव-वाघळीसारख्या प्रदेशात सापडतात. वसई ताम्रपटावरून त्याच्या अधिकारीवर्गाची ओळख होते.

| | | |
|---|---|---|
| सेनापती | - | महाप्रचंडदंडनायक श्रीधर |
| मुख्यप्रधान | - | वासुदेवैय |
| मुख्यमंत्री | - | भाभीयक |
| पातलकरणी | - | भरवैयनायक |
| राजाध्यक्ष | - | आपैयाक |
| महत्तम | - | आमादित्य |
| राजगुरू | - | सर्वदेवाचार्य |

ह्यातील श्रीधराचे नाव देवळाली ताम्रपटातही येते. तो ताम्रपट शके ९७४ चा आहे व तिथे त्याला नुसतेच दंडनायक म्हटले आहे. तर वसई ताम्रपटात त्याला महाप्रचंडदंडनायक म्हटले आहे. ही त्याची पदोन्नती झालेली दिसते.

वाघळी शिलालेखाचे वर्णन मागे आलेच आहे. त्यात मौर्यकुलप्रदीप गोविंदराज हा स्वतःस सेऊणचंद्र द्वितीय ह्याचा सामंत म्हणवतो. हे कुळ वलभी सोराष्ट्र ह्या गावाहून येऊन खानदेशात स्थायिक झाले व त्यांनी यादवांकडे आपली सेवा अर्पित केली. या लेखात मौर्यांच्या बावीस पिढ्यांची वंशावळ दिली आहे. ती अशी : सोम्-मांधातृ-किकट-तक्षक-भीम-सर्वशूर - गोविंदराज-साध्वसिक(प्रथम)-झंझराज-देवनासीन्-मुंज-पद्माकर-वापैय-०-वालपराज-साध्वसिक(द्वितीय)- शांतिराज-प्रवरसूकर-भाईलेक-भीमराज-गोंविंदराज.

याच गोविंदराजाने वाघळी येथे एक सर्वांगसुंदर शिवालय निर्माण केले व त्याचे समोर जलपरिपूर्ण वापी बांधली. शिलालेखात या वास्तूंचे सुंदर वर्णन आले आहे, ते असे-

**-सर्वेषां पार्थिवानां त्रिदिवपतिपुरारोहनिः श्रेणिभूतं**
**गोंविंदो भूमिपालत्स्वमलनृपगुणैरन्वितः कीर्तिकामः ॥ ३४ ॥**
**वापीं चकार सुविमलोपलगाढबद्धा**
**सोपानपंक्तिसुरवेश्मनिविष्टदेवा**
**शंखोज्वलोर्मिवबहुशुभ्रजलप्रवाहा**
**संस्नापिताभिशपनामधनाशदक्षां ॥ ३५ ॥**

सौम्यसंवत्सर आषाढ पौर्णिमेच्या दिवशी या मंदिरासाठी सेऊणचंद्राने संगमी व मधुवाटिका ही गावे दिली, तर गोंविंदराजाने देवाचे मंगलभोग,गंध-धूप-दीप-शास्त्र-गीत-नृत्य ह्यांचेसाठी, नर्तिकांचे उपजीविकेसाठी, ब्राह्मणांच्या भोजनासाठी शाश्वत अन्नछत्र चालावे म्हणून व वेदाभ्यासी विद्ववानांचे भोजनासाठी भूमी दिली ती अशी-

१ वगलुकम्मत भूमी - ह्याचे पूर्वेस भंभि, दक्षिणेस देवल क्षेत्र, पश्चिमेला जानिन व उत्तरेला कारकगांव

२ वखुली क्षेत्र - याचे पूर्व-पश्चिम-दक्षिणेला मार्ग कम्मत आणि सिद्धेशभूमि व उत्तरेला वह.

३ वनकूटक भूमी - ह्याचे पूर्व व उत्तरेला नदी व दक्षिणेला वह आणि पश्चिमेला ग्रामभू.

४ वटयक्षिणी वाट - पूर्वेला कार्पटिकाचे क्षेत्र, दक्षिणेला देवाचे शेत, पश्चिमेला ढोरे जाण्याचा मार्ग,(गोपथोवधिः) आणि उत्तरेला वटकूप (वडाचे झाड व बारव)

कम्मत हा नदीकाठचे गाळाचे शेतासाठी उपयोगात येणारा शब्द यादवकालीन अभिलेखात व महानुभाव साहित्यात वारंवार येतो. वह किंवा वाह, वाही म्हणजे लहान नाला. नागपुरात अजून एका नाल्यास 'अयाचितबुवाची वाही' म्हणतात. ही दाने १६ विद्याभ्यासी पंडितांना गोविंदराज व त्याची राणी नायकी ह्यांनी दिली. तिचे वर्णन 'भवभयात् भक्ता सदा या हरेः' असे केले आहे.

अर्थात्, गोंविंदराज हा परमधार्मिक होता, ह्यात संशय नाही. शिलालेखात त्याचे हे वर्णन-

**ब्रह्मज्ञानामृतं तन्निभृतवरसरोराजहंसोऽमलांगो**

**राजश्रीचारुकान्तादयिततरतनूपुण्यवृक्षस्य मूलं**

**धात्रासृष्टो यमेको जगति नरपतिःसज्जनानंदकारो**

**शैवध्यानातिभिन्नस्वहृदयजतमोवृत्तिगोविंदराजः ॥**

त्याला अगदी तंतोतंत लागू पडते, यात संशय नाही. वाघळी शिलालेखातील गोविंदराजाच्या दानाची तिथी श्रावण पौर्णिमा आहे. या तिथ्या २० जुलै १०६९ व १३ ऑगस्ट १०६९ अशा अनुक्रमे येतात.

सेऊणचंद्राचे तीन शासनांपैकी देवळाली ताम्रपट शके ९७४चा व वाघळी शिलालेख शके ९९१ चा आहे. अर्थात् त्याचा राज्यकाल शके ९७० ते१००० (१०४८ ते १०७८ इ. स.) असा गृहीत धरता येईल. यादवकालात हा अतिशय महत्त्वाचा व सामर्थ्यशाली शासक होऊन गेला. उत्तरकालीन यादवांच्या बऱ्याचशा वंशावळी त्याचेच नाव प्रारंभी देतात.

त्याने कर्ण कलचुरिच्या आक्रमणाच्या कठीण काळात यादवसत्तेचे रक्षण केले व चालुक्यांच्या गृहयुद्धात दूरदृष्टीने विक्रमादित्य सहावा याला साहाय्य करून आपला उत्कर्ष साधला. चोहोकडे सत्तास्पर्धेचे वादळ घोंघावत असता स्थिरचित्ताने यादव राज्याची धुरा सांभाळून ते वाढविले. त्याच्या काळात यादवांची मंत्री, अधिकारी, सेनापती, उपसामंत असा परिवार वाढून ते चालुक्य राज्यांतर्गत एक लहान राज्य (Imperium ed imperio) बनले. सेऊणचंद्र प्रथमच्या नावावरून त्याच्या प्रदेशाला सेऊणदेश हे नाव पडले, तर द्वितीय सेऊणचंद्राने सेऊणदेशाला यश, कीर्ती व प्रतिष्ठा मिळवून दिली.

****

# आईरमदेव ते मल्लुगिदेव

द्वितीय सेऊणचंद्रानंतर हेमाद्री आईरमदेवाचे नाव देतो. त्याच्या राज्यकाळातील ताम्रपट अश्वी ह्या गावी सापडला आहे. या ताम्रपटाची भाषा संस्कृत असून, तिथी शके १०२० बहुधान्य वैशाख वद्य ३० आहे. आईरमदेवाचे वर्णनासाठी हेमाद्रीच्या राजप्रशस्तीत-

परम्मदेवः स ततो बभूव द्विषद्वधूनेत्रघनांबुदृष्टि
परम्मदेवेन रुचांचयेन यस्यप्रतापेन चिरं व्यराजि ॥

हा श्लोक येतो, तर अश्वी ताम्रपटात-

तपुत्रोनृपतित्रयैकतिलको वैरीभकंठीरवो
वीरः शूरविपक्षपक्षदलनो राजा इतम्मोऽभवत्
येन श्रीभुवनैकमल्लमजितो निर्जित्य सप्तांगकं
राज्यं श्रीपरमर्दिने क्षितिभृते दत्तं स्वसेवाक्रमात् ॥
भार्या यस्याभवद्देवी लक्ष्मीरिव भुवि स्वयं
श्रीयोगल्लेति यया नाम्ना रंजितं भुवनत्रयं ॥

यातील पहिल्या श्लोकाचा अर्थ असा की, जे राज्य चालुक्य राजा भुवनैकमल्ल ह्याला जिंकता आले नाही, ते आईरमदेवाने जिंकले आणि परमर्दीला सेवावृत्तीने देऊन टाकले. यात स्पष्टच चालुक्य सोमश्वर द्वितीय भुवनैकमल्ल आणि विक्रमादित्य सहावा यांच्यातील यादवी युद्धाचा निर्देश दिसतो. या यादवी युद्धात आईरमदेवाने विक्रमादित्य सहावा ह्याचे बाजूने भाग घेतलेला दिसतो.

या ताम्रपटाचा विषय, श्रीनगर २५०० या प्रदेशातील संगमनेर ८४ या भागात असलेले कोंकणेग्राम हे गाव ब्राह्मणांना दान देण्यासंबंधी आहे. यावेळी राजा नर्मदापूर नामक गावात काही पुण्यपर्वनिमित्त होता. (डॉ. ओंकारप्रसाद वर्मा श्री. डिकसळकरांचे आधारे लिहितात की, हा गाव बहुधा नर्मदातीरी असावा. पण इतक्या द्राविडी प्राणायामाची आवश्यकता नाही. ताम्रपटात नर्मदापूर हे नर्मदातीरी असल्याचा स्पष्टच उल्लेख आहे.)

योगल्लादेवी ही आईरमदेवाची पत्नी होती. ताम्रपटात तिच्या मातृकुलाचा निर्देश मात्र नाही. अश्वी ताम्रपटाचा काळ शके १०२० (इ. स. १०९८) असा आहे. तेव्हा त्याचा राज्यकाळ इ. स. १०८० ते ११०५ असा गृहीत धरल्यास ते चूक ठरू नये. सिन्नर येथील आयरेश्वर हे देवालय आईरमदेवाने बांधले असावे.आईरमेश्वर > आयेरेश्वर असा अपभ्रंश. त्याचे संस्कृतीकरण ऐश्वर्येश्वर.

**सिंघण प्रथम (सिंहराज) :**

आईरमदेवानंतर सिंहण प्रथम हा राजा झाला. आईरमदेवाचा तो भाऊ होता, असे व्रतखंडातील राजप्रशस्तीवरून कळते.

ह्या सिंघणदेवाचा एकही अभिलेख आतापर्यंत उपलब्ध नव्हता, परंतु आम्ही अंबाजोगाईजवळ चनई या गावी सिंघणदेव प्रथमचा एक लेख मिळवून तो प्रसिद्ध केला आहे.[१] व अंबाजोगाई येथील संगीत मशीद म्हणून ओळखल्या जाणाऱ्या मशिदीतील लेख ह्याच सिंघणाचा आहे, असे साधार दाखविले आहे.[२]

हे दोन शिलालेख, व्रतखंडातील राजप्रशस्तीचा उतारा आणि यादवांच्या काही शिलाताम्रशासनात येणारे सिंघणदेव याच्या प्रशस्तीपर श्लोक या आधारावर आपल्याला या राजाच्या कर्तृत्वाची ओळख करून घ्यावयाची आहे.

त्यातील अंबाजोगाईजवळ उपलब्ध झालेल्या चनई गावाच्या शिलालेखाचा विचार पुढे केला आहे.

हा शिलालेख अंबेजोगाईजवळच चनई ह्या गावी उपलब्ध झाला. हे गाव बीड अंबेजोगाई मार्गावर अंबेजोगाईपासून अलीकडे तीन मैल अंतरावर आहे. गाव अगदी लहान असून गावाचे पूर्वेस कदंब वृक्षाचे राईत भग्न देवालयाचे व शिल्पखंडाचे अवशेष इतस्ततः पडले आहेत. याच अवशेषात एक पुष्करिणी (वापिका) असून दोन हेमाडपंती शिवालये आहेत, पण तीही उद्ध्वस्त व भग्न अवस्थेत आहेत.

या शिवमंदिराजवळच एक मोठे टेकाड असून त्या खालीही काही अवशेष असावेत, उत्खनन केल्यास ते उघडकीस येण्याची शक्यता आहे. प्रस्तुत शिलालेख ह्या दोन मंदिरांपेकी सोमनाथ म्हणून जे मंदिर ओळखले जाते त्या मंदिरावर आहे. शिलालेखाची शिला मंदिराच्या दर्शनी भागात उजव्या बाजूला आडवी बसविलेली आहे. त्यामुळे ठसे घेणे कष्टाचे काम झाले आहे.

हा लेख एका तांबड्या लांबट शिळेवर खोल व मोठ्या अक्षरात कोरलेला आहे. शिळा ओबडधोबड असून तिच्यावर अनेक ओरखडे व खाचा उमटलेल्या आहेत त्यामुळे लेखाच्या वाचनात अनेक विकल्प निर्माण होतात. लेखाच्या एकूण पंधरा ओळी असून प्रत्येक ओळीत पाच-सहा किंवा कदाचित सात अक्षरे आहेत. अक्षरे मोठी असली तरी आता अस्पष्ट झाली आहेत तरी ती वाचता येतात, हे आपले सुदैवच.

लेखाची लिपी देवनागरी आहे व तीत यादवकालीन लिपीची वैशिष्ट्ये फारशी आढळून येत नाहीत. पृष्ठमात्रा नाहीतच परंतु 'न' चे 'ल' सारखे वळण व 'ब' चे 'ध' सारखे वळण निःसंशय प्राचीन आहे.

भाषा मराठी आहे आणि मराठी भाषेच्या अभ्यासाचे दृष्टीने हा लेख अत्यंत महत्त्वाचा आहे. लेखातील अष्टमीसाठी 'अठी' आणि शनिवारासाठी 'सणिवार' ही रुपे चिंत्य आहेत.

१. नवभारत, ऑगस्ट १९७०. २. प्रतिष्ठान, मे. १९७२.

परंतु कोरक्याने लेख अत्यंत निष्काळजी रीतीने कोरला असावा, हे स्पष्ट दिसते काही शब्दांमध्ये त्याने काना आणि मात्राही गाळल्या आहेत.

उदाहरणार्थ पुढील स्थळे :-

| वाचन ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|
| १ | सकु | शके |
| ५ | सणिवार | शनिवार |
| १५ | चांडलु | चांडालु |

यावरून लेखाचे अशुद्ध स्वरूप ध्यानात येते.

या लेखात ओळ १ ते ५ मध्ये लेखाचा काळ दिला आहे, तो असा-

''स्वस्ति श्री सकु १००२ रौद्रसंवत्सरे
आषाढमासे अठि सणिवार'' (ओळ १ ते ५)

अर्थात शक १००२ रौद्र संवत्सर या वर्षामधील आषाढ महिन्यातील शुक्ल किंवा कृष्ण पक्षातील अष्टमी (शनिवारयुक्त) ही शिलालेखात अभिप्रेत आहे, असे दिसते.

परंतु पूर्वी सांगितल्याप्रमाणे शिलेवर खाचा पडलेल्या असल्यामुळे शिलालेखाच्या वाचनात विकल्प निर्माण होतात. त्यामुळे कालोल्लेख दोन प्रकारे वाचता येतो, तो असा-

अ. स्वस्ति श्री सकु १००२ रौद्र संवत्सरे आषाढमासे अठी सणिवार

ब. स्वस्ति श्री सकु १०६२ रौद्र संवत्सरे आषाढ मासे अठी सणिवार यामुळे लेखाचा काळ नेमका साठ वर्षे पुढे ढकलला जातो. त्यामुळे संवत्सर नामाचाही काळ ठरविण्यास उपयोग होत नाही. कारण साठ वर्षांनी तीच संवत्सरनामें पुन्हा येतात.

परंतु आमचे असे आग्रहाचे प्रतिपादन आहे की, 'स्वस्ति श्री सकु १००२ रौद्र संवत्सरे' हेच वाचन बरोबर आहे. कारणे अशी-

अ. 'स्वस्ति श्री सकु १०६२' हे वाचन १००२ ह्या अंकातील दुसऱ्या शून्याखाली जी खाच किंवा ओरखडा पडला आहे, त्यामुळेच संभवते. त्यामुळे दुसरे शून्य, सहा या अंकासारखे दिसते. परंतु सहा ह्या अंकाचे हे वळण योग्य वाटत नाही, परंतु सहाच्या खालचा हा भाग शिळेवरील ओरखडा मानला, तर शक १००२ हे वाचन सुव्यस्थित वाटते.

ब. परंतु ह्यापेक्षाही बलवत्तर प्रमाण म्हणजे लेखातील मास व वार यांचा उल्लेख आहे, तो 'आषाढ मासे अठी सणिवार' असा आहे. यात आषाढ मासातील शुक्ल अथवा कृष्ण पक्षातील अष्टमी अभिप्रेत आहे व त्या दिवशी शनिवार येणे आवश्यक आहे. पिल्लेजंत्री प्रमाणे शके १००२ च्या आषाढ वद्य अष्टमीस शनिवार बरोबर येतो.[३]

३. Raobahadur Swamikanu Pillai, An Indian Ephemeris, III p. 192.

अर्थात् शके १००२ रौद्र संवत्सर आषाढ मास (कृष्ण पक्ष) अष्टमी शनिवार हा काळ ह्या शिलालेखाचा काळ ठरतो. ह्याला आणखी प्रमाणे पुढे दाखविण्यात येतीलच.

ह्या लेखाच्या पाचव्या व सहाव्या ओळीत महाकुमार श्रीसिंघणदेवराणक हा उल्लेख आला आहे. सर्व प्रथम आला आहे. सर्वप्रथम एक गोष्ट लक्षात येते की, हा सिंघणदेव म्हणजे सुप्रसिद्ध पराक्रमी सम्राट सिंघणदेव द्वितीय देवगिरीकर होऊ शकत नाही. कारण सम्राट सिंघणदेवाचा काळ शके ११२१ ते शके ११६९ असा आहे. आणि यातील प्रारंभीची दहा वर्षे त्याच्या युवराजपदाची असूनही अगदी प्रारंभापासूनच त्याच्या नावामागे समस्तभुवनाश्रय, पृथ्वीवल्लभ, महाराजाधिराज, यादवकुलकमलकलिकाविकासभास्कर, इत्यादि विशेषणे लावलेली आढळून येतात.[४] अर्थात् देवगिरीचा हा पराक्रमी सम्राट इथे अभिप्रेत नाही. दुसरा सिंघणदेव डोळ्यासमोर येतो तो म्हणजे कलचुरि सिंघणदेव. हा कलचुरि बिज्जलाचा पुत्र शके ११०५ मध्ये राज्यावर आला आणि त्याच वर्षी पश्चिम चालुक्यांचा मांडलिक बनला. अर्थात्, त्याचे शासन बीड, उस्मानाबाद भागावर असणे स्वाभाविक आहे. इतकेच नव्हे तर, ह्याच सिंघणदेवाचा एक लेख अंबाजोगाई येथे संगीत मशीद नावाने ओळखल्या जाणाऱ्या मशिदीत मिळाला आहे आणि तो डॉ. शं. गो. तुळपुळे यांनी संपादिला आहे.[५]

परंतु प्रस्तुत शिलालेखातील सिंघणदेव हा कलचुरि सिंघणदेव असणेही शक्य नाही. कारणे अशी

अ. चनई शिलालेखाचा काळ शके १००२ किंवा शके १०६२ कसाही धरला, तरी तो कलचुरि सिंघणदेवाच्या शके ११०५ या बेहट्टी ताम्रपटाने सिद्ध होणाऱ्या काळाशी जुळत नाही.[६]

ब. शिवाय हा संगीत मशीद शिलालेख अपूर्ण व कालरहित असून, तो कलचुरि सिंघणाचा असल्याबद्दल बलवत्तर प्रमाणे उपलब्ध नाहीत.

शेवटी आपण अशा निष्कर्षाप्रत येतो की, या लेखातील सिंघणदेव हा सेऊणदेशकर सिंघणदेव प्रथम यादव हा असावा. सेऊणदेशकर यादवांची या संदर्भापुरती वंशावळ अशी-[७]

सेऊणचंद्र द्वितीय (वसई ताम्रपट व वाघळी शिलालेख शके ९९१)

| | |
|---|---|
| आईरमदेव किंवा<br>पेरम्मदेव (किंवा परमदेव)<br>(अश्वी ताम्रपट शके १०२०) | सिंघणदेव (प्रस्तुत शिलालेखात<br>उल्लेखित)<br>शके १००२ |

४. ग. ह. खरे, दक्षिणेच्या मध्युपुगीन इतिहासाची साधने, भाग २, पृ. ६२. ५. डॉ. शं गो. तुळपुळे, प्राचीन मराठी कोरीव लेख, क्र. ६७. ६. Indian Antiquary, IV 274. ७. R. G. Bhandarkar, Early History of Deccan.

सेऊणदेशकर यादव हे कल्याणी चालुक्यांचे मांडलिक होते. कल्याणी चालुक्यांचे राज्यही बीड, उस्मानाबाद याच भागात होते. अर्थात् त्यांच्या मांडलिकाचे शिलालेख ह्या भागात सापडणे स्वाभाविक आहे. परंतु त्यातही एक अडचण शिल्लक राहतेच ती अशी. सेऊणचंद्र द्वितीय यास पुत्र दोन. मोठा आईरमदेव (इरम्मदेव किंवा पेरम्मदेव) ह्याचा अश्वी ताम्रपट उपलब्ध असून तो शके १०२०चा आहे. अर्थात् मोठ्या भावाचा लेख शके १०२०चा व लहान भावाचा मात्र शके १००२चा हे कसे शक्य आहे ?

परंतु त्याही प्रश्नाची सोडवणूक समाधानकारकरीतीने करता येते.

अ. सेऊणचंद्र द्वितीय यास पुत्र दोन. पैकी थोरला आईरम्मदेव व धाकटा सिंघणदेव. सेऊणचंद्र द्वितीय याचा काल शके ९९१असता आईरम्मदेवाचा अश्वी ताम्रपट शके १०२० चा असावा हे स्वाभाविक आहे. पण मग सिंघणाचा प्रस्तुत लेख १००२ चा कसा, ह्या प्रश्नाचे उत्तर असे की प्रस्तुत लेखात सिंघणाला केवळ महाकुमार ही पदवी लावली आहे. महासामंत ही त्याच्या घराण्याची पदवी लावलेली नाही. तेव्हा निष्कर्ष असा काढता येईल की, इरम्मदेव हा महासामंत असतानाच त्याचा हा धाकटा भाऊ महाकुमार या नात्याने बीड, अंबाजोगाई भागात प्रशासकीय कामाचा अनुभव घेत असावा. राजघराण्यातील पद्धतीला हे धरून आहे व योग्य आहे.

ब. शिवाय हा शिलालेख जर शके १०६२ चा धरला, तर आणखी तीन अडचणी निर्माण होतील.

क. सेऊणचंद्र द्वितीय (शके ९९१) आणि सिंघणदेव प्रथम (शके १०६२) या दोन पिढ्यांत ६०-७० वर्षांचे अंतर पडेल व अशक्य असले नसले तरी स्वाभाविक नाही.

ख. जर हा शिलालेख १०६२चा मानला तर मग सेऊणचंद्र तृतीयच्या शके १०६३-६४ च्या अंजनेरी शिलालेखाची संगती कशी लावायची ? म्हणजे हा शिलालेख सिंघण प्रथमचा अगदी शेवटचा आणि अंजनेरी शिलालेख हा सेऊणचंद्र तृतीयचा अगदी पहिला मानावा लागेल. ते शक्य होणार नाही.

ग. जर हा शिलालेख शके १०६२ चा मानला तर शके १०६६ मध्ये अंबाजोगाईस उदयादित्यदेवाचे शासन होते[८] त्याची संगती लावता येणार नाही. म्हणून निष्कर्ष खालीलप्रमाणे मांडता येतील.

अ. प्रस्तुत लेखाचा काल निःसंशयपणे शके १००२ रौद्र संवत्सर हा आहे.

ब) तो सेऊणदेशकर सिंघणदेव प्रथम ह्याचे काळास जुळतो.

क) हा काळ यादवांचे वंशावळीस बाधक ठरत नाही.

---

८. डॉ. शं. गो. तुळपुळे, प्राचीन मराठी कोरीव लेख, लेख क्र. ५.

ड) ह्या काळात सेऊणदेशकर सिंघणदेव हा बीड, अंबाजोगाई भागात महाकुमार म्हणून काम पाहात होता.

ह्या शिलालेखात एकच व्यक्तिनाम येते व ते महाकुमार सिंघणदेव ह्याचे. त्याबाबतीत विस्तृत विवेचन वर आलेच आहे.

ह्या लेखात ओळ ६ व ७ मध्ये अंबादेसि हे स्थलनाम आले आहे. अंबादेश म्हणजे सध्याचे अंबाजोगाई व आसपासचा प्रदेश हे तर सिद्धच आहे. परंतु मराठीचे आद्यकवी मुकुंदराज ह्यांच्यामुळे प्रस्तुत स्थलास महत्त्व प्राप्त झाले आहे. त्यामुळे थोडे विवेचन करणे भाग आहे.

अ. योगेश्वरी माहात्म्य ह्या अंबाजोगाईच्या स्थलमाहात्म्य सांगणाऱ्या ग्रंथात अंबाजोगाईला जयंती नगरी असे म्हटले आहे. परंतु ते जयंतपाळाची नगरी म्हणून जयंती नगरी म्हणून बनावट वाटते. ह्याच ग्रंथात ह्या नगरीला अंबे असेही म्हटले आहेच.

ब. अंबाजोगाई येथे प्राप्त झालेल्या चौबारा शिलालेखात ह्या नगरास 'आम्रपूर' असे म्हटले आहे.[९] हे आंबे ह्या ग्रामनामाचे संस्कृत रूप दिसते.

क. अंबाजोगाई येथे प्राप्त झालेल्या सकलेश्वर देवळातील शिलालेखात ह्या नगरास आम्रपूर असे म्हटले आहे[१०] व तेही आंबे ह्या ग्रामनामाचे संस्कृतरूप दिसते.

ड. सकलेश्वर मंदिरातील शिलालेखातील मराठी भागातही "आम्रदेशे लघुबाऊची ग्रामदत्त" असा उल्लेख आहे.

इ. यानंतर शके १२०० मध्ये लिपिनिविष्ट झालेल्या 'लीळाचरित्र' ह्या महानुभाव ग्रंथात ह्या गावाचा उल्लेख "खोल नायकाचे आंबे" असा आला आहे. त्यावेळी हा गाव देवगिरीकर यादवांचा वैदर्भीय ब्राह्मण सेनापती खोलेश्वर ह्याचे अधिकारात होता. सामंतांचे नावावरून गावाचे नामकरण करण्याची रीत प्राचीन असून सर्वत्र आढळते. "बिज्जलाचे बीड" "अनंतपालाचे शिऊर" ही अंबाजोगाईच्या आसपासची उदाहरणे देता येतील.

फ. यानंतर अंबाजोगाई येथेच प्राप्त झालेल्या खोलेश्वर मठ शिलालेखातही आम्रपूर असाच उल्लेख आला आहे.[११] अर्थात् या सगळ्या उल्लेखांवरून एक गोष्ट लक्षात येते की, अंबे हे स्थलनाम आंबा ह्या फलविशेषापासून सिद्ध झाले असून त्याचा देवीशी संबंध नाही आणि एरव्ही ही अंबाजोगाई ह्यातील प्रथमपदाचा अर्थ जर देवी घेतला तर

---

९. श्री. ग. ह. खरे, दक्षिणेच्या मध्ययुगीन इतिहासाची साधने. १०. श्री ग. हे. खरे, दक्षिणच्या मध्ययुगीन इतिहासाची साधने, भाग १, पृ. ६५. भाग १ - पृ. ५५-७०. ११. डॉ. शं. गो. तुळपुळे, प्राचीन कोरीव लेख क्रमांक ३४, पृष्ठे १६४-१९०.

द्विरुक्तीचा दोष राहतो. जाता जाता आणखी एक गोष्ट नजरेस आणावीशी वाटते, ती म्हणजे पंढरपूर येथील चौऱ्यांशीच्या लेखातील स्तंभ १ ओळ २५ मध्ये "आंबेकारा दोढपंडितु ग १ दांडा फु. २२" व स्तंभ २ ओळ ३९ मध्ये "आंबकारे क्रीष्ट देवेदा ग १ दे. फुले ३०" असा आंबा येथील दोन व्यक्तींचा निर्देश आला आहे.

या लेखातील दुसरे स्थलनाम ओळ क्र ९ मध्ये आले असून ते "छनैग्राम" असे आहे. "छनैग्राम" म्हणजेच प्रस्तुत लेखाचे उपलब्धिस्थळ चनई या नावाचे गाव होय. प्रस्तुत लेखाचा आशय म्हणजे शके १००२ मध्ये आषाढ (वद्य) अष्टमी शनिवार या दिवशी महाकुमार सिंघणदेवाने देवास दान दिले. गुरवालाही भूमी दिली. हे दान जो फेडील तो कुत्रा, गर्दभ आणि चांडाळ होय अशा शापही शेवटी दिला आहे. हे दान अष्टमीला दिले गेले हे योग्यच आहे कारण अष्टमीव्रत हे एक महत्त्वाचे व्रत आहे. ही व्रते सुमारे तीस आहेत. शुक्लपक्षातील नवमीयुक्त अष्टमीस व वद्यपक्षातील सप्तमीयुक्त अष्टमीस ही व्रते करतात[१२] अष्टमीला महिषासुरमर्दिनीची पूजाही करतात. आषाढ शुद्ध अष्टमी ही दुर्गाष्टमी व वद्य अष्टमी ही कालाष्टमी म्हणून ओळखली जाते. अंबाजोगाईचे परिसरात ह्या व्रतांना महत्त्व असणारच. ह्याच तिथीला सिंघणदेवाने सोमेश्वरास दान दिले आहे.

प्रस्तुत शिलालेख अनेक दृष्टीने महत्त्वाचा आहे.

अ. हा मराठी भाषेतील अत्यंत प्राचीन लेखांपैकी एक ठरतो.

जर डॉ. मिराशींचे मत ग्राह्य धरले, तर दिवे आगर ताम्रपट हा मराठीचा आद्यलेख मानला जाईल[१३] व द्वितीय मान प्रस्तुत लेखासच मिळेल.

ब. सेऊणदेशकर यादवांचा हा खानदेशाबाहेर उपलब्ध झालेला पहिलाच शिलालेख होय. त्यांचे ताम्रपट मात्र वसई, अश्वी ह्या गावी कोंकणात सापडले.

क. सेऊणदेशकर सिंघण प्रथमचा हा पहिलाच उपलब्ध लेख आहे.

ड. हा अत्यंत प्राचीन लेख असल्यामुळे मराठी भाषेच्या अभ्यासक्रमास तो निःसंशयपणे उपयुक्त ठरेल.

ज्या ठिकाणी सिंघणदेव प्रथम ह्याचा एकही शिलालेख उपलब्ध होत नव्हता, त्या ठिकाणी कसाबसा एक शिलालेख अंबाजोगाईजवळच अंदाजे तीन मैलांचे अंतरावर चनई येथे उपलब्ध झाला व तो शके १००२ आषाढ अष्टमी शनिवार, या तिथीचा असून, तो निःसंशय सेऊणदेशकर यादव सिंघणदेवाचा आहे, हेही आपण पाहिले. आता याच आधारावर आपण आणखी एक अंबाजोगाईचाच शिलालेख सेऊणदेशकर यादव सिंघणदेव प्रथम ह्याचाच कसा ठरतो, ते पाहू.

**१२. पंडित महादेवशास्त्री जोशी, भारतीय संस्कृति कोश, खंड १ला, पृ. ३१५. १३. डॉ. वा. वि. मिराशी, मराठी साहित्य पत्रिका, डिसेंबर १९६८.**

अंबाजोगाई हा गाव प्राचीन असून, त्या ठिकाणी अनेक मंदिरे वगैरे अवशेष प्राचीन काळी होते व यादवकाली हा गाव चांगला भरभराटलेला व समृद्ध व शोभिवंत होता, असे यादव सम्राट सिंघणदेव याचा सेनापती खोलेश्वर ह्याचे शिलालेखावरून वाटते.

या एकट्या गावातून आतापर्यंत पाच शिलालेख उपलब्ध झाले, ते सर्व प्रकाशितही झाले आहेत[१४] परंतु या गावी एक नवीन यादवकालीन मराठी शिलालेखाचे श्रेय 'प्राचीन मराठी कोरीव लेख' ह्या ग्रंथाचे लेखक डॉ. शं. गो. तुळपुळे ह्यांच्याकडे जाते. त्यांना हा लेख अंबाजोगाईत संगीत मशीद ह्या नावाने ओळखल्या जाणाऱ्या एका मशिदीत मिळाला. ही मशीद म्हणजे पूर्वी भोगादित्यदेवाचे मंदिर होते. असे याच लेखावरून कळते. ह्या लेखाचे दोन भाग मंदिराचे दोन खांबांवर कोरलेले होते. त्यातील उत्तरार्ध फक्त उपलब्ध असून, पूर्वार्ध मात्र खांबाला लागून मुसलमानांची प्रार्थना सांगावयाच्या तीन पायऱ्यांचा ओटा बांधल्यामुळे नष्ट झाला, असा डॉ. तुळपुळे ह्यांचा तर्क आहे. या मशिदीचे आसपास कंचनीची वस्ती असल्यामुळे या मशिदीला संगीत मशीद म्हणतात, असा त्यांचा तर्क आहे. पण हे पूर्वी भोगादित्यदेवाचे दगडी देवालय असल्यामुळे त्याची मशीद झाल्यावर त्याला दगडी मशीद (उर्दूत संगी-मशीद, संग=दगड) म्हणू लागले, असे आम्हाला वाटते.

हा शिलालेख डॉक्टरसाहेबांनी आपल्या प्राचीन मराठी कोरीव लेख ह्या ग्रंथात पृष्ठ ३५१ ते ३५४ वर प्रसिद्ध केला आहे.

लेखाचे वाचन स्वच्छ आहे व त्यात पाठभेद नाहीत. ते वाचन असेः

| | | |
|---|---|---|
| ओळ | १ | स्वस्ति श्रीमनु महा |
| | २ | प्रधान दंडनायक दोचर |
| | ३ | साचा पुतु। स्त्री महामंड |
| | ४ | लेस्वर सिंघणदेवाचा |
| | ५ | पट्टसाहणि दावरसा |
| | ६ | चें कीर्त्तिने पौलि पट्टसा |
| | ७ | ला मढु भोगादित्यदे |
| | ८ | वा पुजपुनस्कारा भूमि |
| | ९ | दत्त गद्याण दहाची मला. |

यात महामंडलेश्वर सिंघणदेव याचा उल्लेख येतो. हा सिंघणदेव कोण ? असा प्रश्न विचारून डॉ. तुळपुळे ह्यांनी त्याचे उत्तर देण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांचे विवेचनाचे सार विस्तृतपणे व शक्यतो त्यांचे शब्दांत पुढे दिले आहे. ते असे-

१४. ग. ह. खरे, दक्षिणच्या मध्ययुगीन इतिहासाची साधने, खंड १, पृष्ठ ५६.

१. हा शिलालेख यादव सम्राट देवगिरीकर सिंघण द्वितीय ह्याचा असणे शक्य नाही. कारण सम्राट सिंघण बहुधा शके १११२ मध्ये राज्यावर आला व त्याच वर्षीच्या त्यांच्या इंगळी शिलालेखात[१५] त्याला त्रिभुवनमल्ल हे बिरूद लावलेले आहे. शिवाय त्याचे यौवराज्यकालातील शिलालेखातही त्याला कुठेही महामंडलेश्वर म्हणून म्हटलेले नसून, त्याचा अगदी प्रारंभीच्या पुळुज शिलालेखातही त्याला प्रौढचक्रवर्ती हे बिरूद आहेच[१६] सारांश, देवगिरीकर सम्राट यादव सिंघणदेव द्वितीय याचा एकही शिलालेख असा नाही की, ज्यात त्याला महामंडलेश्वर म्हटले आहे. अर्थात् हा शिलालेख सिंघणाचा नव्हे.

२. यापुढे डॉ. तुळपुळे असे म्हणतात की, हा शिलालेख कलचुरि सिंघणदेवाचा असावा. तो आपला वडील भाऊ वीरनारायण आहवमल्ल याचेनंतर राज्यावर आला. त्याचा त्या वर्षीचा बेहट्टी ताम्रपट प्रसिद्ध असून, तो शके ११०५ चा आहे. त्यात त्याला महाराजाधिराज ही पदवी आहे. पण त्याच वर्षी त्याचे सार्वभौमत्व पश्चिम चालुक्य राजा सोमेश्वर चतुर्थ ह्याचेकडे गेले. अर्थात् आता त्याचा उल्लेख महामंडलेश्वर म्हणून यावयास हवा. पण दुर्दैवाने तसा त्याचा उल्लेख असलेले लेख अद्याप सांपडलेला नाही. त्याचे 'महामंडलेश्वर' म्हणून उल्लेख असलेले लेख सापडतील तर बरे होईल.

३. डॉक्टरसाहेबांचा पुढचा तर्क असा की, हा संगी मशीद शिलालेख कलचुरि सिंघणाचा शिलालेख म्हणून ठरवता येतो. व त्यास आधार म्हणजे संगी मशीद शिलालेखात आलेली दोचरस व दावरस ही व्यक्तिनामे ही वैशिष्ट्यपूर्ण आहेत. यादव राजघराण्यात निदान देवगिरीकर सिंघणदेव सम्राट याचेपर्यंत तरी रसपदान्त नांवे अधिकारीवर्गाची वा सामंतादिकांची सापडत नाहीत. पण कलचुरिच्या शिलाताम्रशासनात ती विपुल सापडतात. उदाहरणार्थ, ह्याच कलचुरि सिंघणाचा पिता बिज्जल ह्याच्या बळगाम्बे शिलालेखात[१७] त्याचा दंडनायक कोणी महादेवरस होता- त्याच्या 'करणां' ची म्हणजे लेखनिकांची नावे पोटरस, छट्टिमरस, पद्मरस व सोवरस अशी होती. बिज्जलाचा मोठा पुत्र सोमेश्वर किंवा संकम कलचुरि याचे लेखात सोविदेवरस, आछरस, मायिदेवरस, बम्मीदेवरस अशी नावे सांपडतात. सारांश, रसपदाने सिद्ध होणारी अधिकाऱ्यांची नावे प्रायः कलचुरि घराण्याशी संबंधित दिसतात. तेव्हा ज्याचे अधिकाऱ्यांची नाव दोचरस व दावरस आहेत. तो हा सिंघणदेव कलचुरि सिंघणदेवच असावा, असा डॉ. तुळपुळे यांचा तर्क आहे.

४. डॉ. तुळपुळे यांचा शेवटचा तर्क असा की, लेखाची भाषा व लिपीही कलचुरि सिंघणाचे काळास मिळती-जुळती आहे. (अंदाजे शक १११० इ. स. ११८८)

१५. Karnataka Desa Inscriptions, Vol. 2 page 377. १६. श्री. ग. ह. खरे, दक्षिणच्या मध्ययुगीन इतिहासाची साधने. १७. Mysore Inscriptions, Page 100.

डॉक्टरसाहेबांचे हे म्हणणे सकृतदर्शनी बरोबर वाटते. पण थोडा अधिक विचार केला की, त्यात अनेक विसंगती दिसू लागतात.

१. हा शिलालेख यादव सम्राट देवगिरीकर सिंघण द्वितीय ह्याचा तर नव्हेच, याविषयी डॉक्टरसाहेबांचे मत कुणासही मान्य व्हावे असेच आहे.

२. पण तो कलचुरि सिंघणाचा नव्हे. त्याची कारणे अशी : ज्याप्रमाणे डॉक्टरसाहेब स्वतःच मान्य करतात. त्याप्रमाणे कलचुरि सिंघणाचा 'महामंडलेश्वर' म्हणून उल्लेख असलेला एकही लेख उपलब्ध नाही. व त्यामुळे हा लेख स्वतःप्रमाण ठरू शकत नाही. त्याला उपोद्‌बलक पुराव्याची आवश्यकता आहे.

३. मराठवाड्यावर कल्याणी कलचुरिंचे कधी काळी आधिपत्य होते किंवा नाही. हीच मुळी विचारार्ह गोष्ट आहे. कलचुरिंच्या कल्याणी राजधानीपसून जवळ असलेल्या उस्मानाबाद जिल्ह्यात त्याचे कानडी-मराठी लेख सापडतात. पण बीड-नांदेड-परभणी जिल्ह्यात त्यांचे लेख अद्याप सापडलेले नाहीत. बीड जिल्ह्यात अंबाजोगाई येथील हा शिलालेखच वादाचा विषय असल्यामुळे तो स्वतःप्रमाण ठरू शकत नाही. मराठवाड्यातील कलचुरि प्रभावाचा विस्तृत आढावा प्रा. देगलूरकर यांनी एका लेखात घेतला आहे.[१८] पण त्यांनाही बीड जिल्ह्यात ज्याला निःसंशय कलचुरि लेख म्हणता येईल असा लेख दाखवता आलेला नाही. सारांश, मराठवाड्यावर कल्याणी कलचुरिचे आधिपत्य (उस्मानाबाद जिल्हा सोडल्यास) निरपवाद सिद्ध नाही.

४. रसपदान्त अधिकाऱ्यांची नांवे केवळ कलचुरिंशी संबंधित मानणे चूक आहे. अरस(अरसु) हा कानडी शब्द असून, त्याचा अर्थ राजा असा होतो तो आदरार्थी बहुवचन या संदर्भात वापरतात. कलचुरि तर सोडाच, पण चालुक्य, होयसळ यांचे शिलालेखांतून अधिकाऱ्यांची 'रस' पदांत नांवे वाटेल तेवढी काढून दाखविता येतील, होयसळ शिलालेखांत तर सम्राट विष्णुवर्धन, वीरबल्लाळ यांची नावेही वीरबल्लाळदेवरसरू अशी येतात.

५. कलचुरिंचीच वंशावळ जर आपण पाहिली, तर त्यातील संकम, कन्नर, सिंघणदेव, मैलुगि, ही नावे यादव घराण्यातील नावांशी मिळतीजुळती आहेत. अर्थात केवळ नामसादृश्य हा काही एखाद्या घराण्याचा शिलालेख ठरावावयाचा एकमेव उपाय नव्हे.

६. पण एवढे कशाला, देवगिरीकर सम्राट सिंघणदेव ह्याचे आधीपासून यादव अधिकाऱ्यांची नांवे रसपदान्त सापडतात. पुढील उदाहरणे पहा.

१. यादव भिल्लम पांचवा ह्याचा मुत्तिगी शिलालेख (ह्याचे तिसरे राज्यवर्ष इ. स. ११८७) त्याचा सामंत महामंडलेश्वर विबुधदेवरस म्हणुन होता.[१९]

१८. डॉ. देगलूरकर, विदर्भ संशोधन मंडळ वार्षिक, वर्ष १९६९. १९. A. S. I. A. R. 1929-30, p. 172.

२. यादव भिल्लम पाचवा ह्याचा मुत्तिगी शिलालेख (ह्याचे तिसरे राज्यवर्ष इ. स. ११९२) त्याचा महाप्रधानाधिपति वज्ररस दंडनायक असून, त्याला अभिनवविबुधचाणक्य ही पदवी होती.[२०]

यावरून सहजच सिद्ध होईल की, 'रस' पदान्त असलेली अधिकाऱ्यांची नावे यादव राजघराण्याशी संबंधित पूर्वीपासूनच होती, म्हणून डॉक्टरसाहेबांचा वरील तर्क बरोबर नाही.

शिवाय अंबाजोगाईजवळ चनई ह्या गावीच सेऊणदेशकर यादव सिंघणदेव प्रथम ह्याचा शिलालेख (अंबाजोगाईपासून अगदी एका मैलावर) सांपडलेला असल्यामुळे हा संगीत मशीद शिलालेखही सेऊणदेशकर यादव सिंघणदेव ह्याचाच असावा, ह्या आमच्या मतास पुष्टी मिळते.

शिवाय सेऊणदेशकर यादव सिंघण प्रथम व कर्नाटकातील त्यांचे सम्राट चालुक्य यांचे संबंध स्पष्ट आहेत, यादव महादेव ह्याच्या काळेगाव ताम्रपटात[२१] व यादव रामचंद्रदेव ह्याचे पैठण ताम्रपटातून[२२] यादवांची वंशावळ सिंघणदेव प्रथमपासूनच सुरू होते व त्याचे पराक्रमाचा वर्णन करणारा पुढील श्लोक ह्या दोन्ही ताम्रपटांत येतो.

**खेलत्खड्गावतंसो रणशिरसि वशीकृत्यकर्णाटराजं**
**यः पांड्यं दंडयित्वा न्यधितजलनिधेः स्तंभमभ्यर्णभूमौ**
**यद्बाणव्राणपातैः समरमभिभजज्जर्जरो गुर्जरेंद्रः**
**स श्रीमानाविरसीत्तुहिनकरकुले सिंघण साहसांकः ॥**

ह्याचा अर्थ असा की, सिंघणाने कर्णाट राजाला स्वतःच्या पराक्रमाने वशीभूत केले. दुसरे हेमाद्रीच्या राजप्रशस्तीत त्याने कर्पूरतिलक गज आणून चालुक्य सम्राट परमार्दि याचे कर्पूरव्रत पूर्ण केले, असेही वर्णन आहे.

**लंजीपुरात्समानीय कर्पूतिलकं गजः।**
**स कर्पूरव्रतं पूर्णकरोत्परमर्दिनः ॥**

लंजीपुराचे ऐवजी त्रंजीपूर असाही पाठ आहे व तो ग्राह्य धरल्यास त्याचे समीकरण तंजावरशी मांडता येईल व हत्तीही लंजीपूर (हल्लीचे लाजी बालाघाट जिल्हा) सारख्या हत्तीसाठी प्रसिद्ध नसलेल्या प्रदेशातील गावी मिळण्यापेक्षा त्रंजीपूर-तंजावर येथेच मिळणे संभवनीय. तेव्हा सिंघणदेव प्रथम ह्याचा कर्नाटकाशी अतूट संबंध होता व त्याच्या लेखात कानडी नांवे येणे सहज शक्य आहे, असे आमचे प्रतिपादन आहे.[२३]

याप्रमाणे आपणांस आता सिंहराज किंवा सिंघण ह्याबद्दल माहिती देणारे तीन साधने झाली.

२०. A. S. I. A. R. 1928-29, p. 118. २१. E. I. XXXII, 31. २२. I. A. XIV page 314. २३. Bhandarkar Early History of Deccan, page 110.

१. चनई व अंबाजोगाई येथील त्याचे शिलालेख.

२. राजप्रशस्ती.

३. काळेगाव व पैठण ताम्रपटातील त्याचे स्तुतीपर श्लोक.

यावरून त्याच्या कर्तृत्वाचा आलेख आपण पुढीलप्रमाणे काढू शकतो.

१. शके १००२ (१०८० इ. स.) च्या आसपास त्याचा मोठा भाऊ इरम्मदेव शासन करीत असता, सिंघण प्रथम हा बीड भागात राजकीय कामाचा अनुभव घेत होता.

२. इरम्मदेवाकडून राज्य मिळाल्यानंतर त्याने आपल्या खड्गाच्या तिखट पराक्रमाने कर्णाट राजाला वशीभूत केले.

३. त्याने पांड्य राजाला शासन करून त्याचे राज्यात विजयस्तंभ रोवला. त्याचे हे सैनिकी अभियान उच्छंगीचे पांड्यांविरुद्ध असावे. कारण त्यांनी या वेळेस होयसळ विष्णुवर्धन ह्याची मदत करून चालुक्य राज्य उलथून टाकण्याचा प्रयत्न चालविला होता. ह्यात त्यांना गोव्याचा कदंब जयकेशि द्वितीय, येलबुर्गा येथील सिंद अच्छुगी द्वितीय ह्यांचीही मदत होती.[२४] परंतु चालुक्य विक्रमादित्य सहावा याने ह्या सर्वांचे मनोरथ धुळीला मिळविले. कदाचित् ह्याच युद्धात पांड्यांविरूद्ध सिंघणाने भाग घेतला असावा.

४. त्याने युद्धात गुर्जरांना जर्जर केले. परंतु ह्या आक्रमणांचा आपणांस नीट माग लागत नाही.

५. या शूर कृत्यांमुळे त्याला साहसांक ही पदवी मिळाली. व तो चालुक्य सम्राटाचा कृपापात्र बनला.

६. त्याने (बहुधा त्रंजीपुराहून-तंजावरहून) कर्पूरतिलक गज आणून परमर्दि राजाचे कर्पूरव्रत पूर्ण केले. परंतु हे युद्धावर बसवलेले रूपक असावे व सिंघणाने युद्धात मिळालेले हत्ती आपल्या राजास दिले असावे, असा डॉ. वर्मा यांचा तर्क आहे.[२५]

सारांश सिंघणदेव प्रथम हा यादव राजघराण्यातील एक पराक्रमी व महत्त्वपूर्ण शासक होता असे दिसते व हेमाद्रीचे राजप्रशस्तीतील वर्णन-

तस्मादनंतरमनन्तभुजप्रतापः
क्षोणिपतिः समभवत्स ह सिंहराजः
तस्यानुजस्तदनुभूवलयं बलीयान्
अत्रापत त्रिजगतीविजयी स राजा ॥ ३१ ॥

हे त्याच्या पराक्रमी वृत्तीमुळे त्याला साजूनच दिसणारे आहे. त्याच्या गुजरातमधील सैनिकी अभियानाविषयी मात्र आपणांस अधिक माहिती उपलब्ध नाही. त्याचा अधिपती चालुक्य

२४. Ghulam Yazdani, Early History of Deccan, page 363. २५. O. P. Varma, The Yadavas & their times, page 41.

विक्रमादित्य सहावा ह्याचे बळगाम्बे शिलालेखात[२६] लाट (गुजरात) देशाशी राजकीय संबंध ठेवण्यासाठी एका विशेष अधिकाऱ्याची (हेरि-लाट-कन्नड संधि विग्रहित) नियुक्ती झाल्याचा उल्लेख आहे. याचा अर्थ चालुक्य विक्रमादित्याने गुर्जर देशवर आक्रमण केले होते, असा जर घेतला तर या आक्रमणात सिंघणदेव प्रथम ह्यानेही आपल्या स्वामीच्या बाजूने भाग घेतला असावा व म्हणूनच पैठण व काळेगाव ताम्रपटात त्याचे गुजरात विजयाचे वर्णन आले असावे.

कर्नाटकातील धारवाड जिल्ह्यातील हावेरी तालुक्यातील होन्नती या गावी शके १०४६ चा एक शिलालेख उपलब्ध झाला आहे. त्यात सेऊणदेश व पळियंड ४००० या प्रदेशावर राज्य करणाऱ्या एका महामंडलेश्वर सिंघणदेवाचा उल्लेख आहे. हा सिंघणदेव म्हणजे यादवनृपती सिंघणदेव प्रथम असावा. यातील पळियंड ४००० म्हणजेच सध्याच्या उस्मानाबाद (धाराशिव) जिल्ह्यातील प्रत्यंडक किंवा परेंडा दुर्ग आणि त्याच्या आजूबाजूचा प्रदेश. ह्या होन्नत्ती अग्रहारावर व त्याच्या आजूबाजूच्या प्रदेशावर गुत्तवंशातील जोम किंवा जोयिदेव प्रथम ह्या सामंताचे शासन होते. चालुक्य राज्यात इतक्या दूर दक्षिणेस सिंघणदेव प्रथम ह्याला शासन अधिकार कसे मिळाले असावेत, ह्याचे डॉ. श्रीनिवास रित्ति ह्यांना आश्चर्य वाटते[२७] पण ह्यात आश्चर्य वाटण्यासारखे काही नाही. आपण वर पाहिलेच की, चालुक्य विक्रमादित्य सहावा ह्याला कल्याणी येथे राज्यपद मिळवून देण्यात सिंघणदेव प्रथम ह्याचा वाटा फार मोठा होता. तो आपल्या चालुक्य सम्राटाचा विश्वासपात्र व केवळ उजवा हातच असा होता. त्याने कर्पूरतिलक हत्ती आणून सम्राटाचे कर्पूरव्रत पूर्ण केले. अशा आपल्या धुरंधर सामंतास विक्रमादित्य सहावा ह्याने आपल्या कल्याणी राजधानीजवळच प्रत्यंडक (परेंडा) दुर्गावर अधिपती नेमले, तर आश्चर्य वाटावयास नको. विक्रमादित्य सहावा ह्याचा स्वकुलातील शत्रू सोमेश्वर प्रथम ह्याचा सेनापती तेजुगि ह्याचाही सिंघणदेव प्रथम ह्याने पराभव केला असावा. असे तेरदाळ येथे सांपडलेल्या शिलालेखावरून कळते.[२८]

होन्नत्ती शिलालेखावरून सिंघणदेव प्रथमचा एक अधिकारी उल्लाहराज व चनई शिलालेखावरून त्याचे आणखी दोन अधिकारी दावरस आणि दोचरस यांची नावे आपणांस कळतात.

डॉ. श्रीनिवास रित्ति हे नाशिकजवळील अंजनेरी येथील शिलालेखातील सेऊणचंद्र तृतीय व सिंघणदेव प्रथम ह्यांना एकच व्यक्ती मानतात. ते अर्थातच चूक आहे.[२९] आपल्या या विधानाला

२६. Mysore Inscriptions, page 108. २७. Dr. Shrinivas Ritti, The Seunas, page 59. २८. Karnatak Inscriptions, Vol. V, page 300. २९. Dr. Shrinivas Ritti, The Seunas, page 58.

त्यांनी कसलाही पुरावा दिलेला नाही.

सिंघणदेव प्रथम ह्याचा काळ आपणांस शके १०२५ ते १०४० (इ. स. ११०३ ते १११८) असा गृहीत धरता येईल. बीड जिल्ह्यात पाल सिंघण नामक गाव आहे. तेही या 'सिंघणदेव प्रथम' वरूनच पडले असावे.

**सेऊणचंद्र तृतीय :**

हेमाद्री सिंघणदेव प्रथम नंतर मल्लुगि या राजाचा उल्लेख करतो. पण नाशिकजवळ अंजनेरी ह्या गावी तेथील चंद्रप्रभ ह्या जैन तीर्थंकरांचे मंदिरावरचा शके १०६३ (इ. स. ११४५) चा लेख सेऊणचंद्र नामक एका राजाचा उल्लेख करतो. त्याचे नाव हेमाद्रीच्या राजप्रशस्तीत तर नाहीच, पण यादव शिलाताम्रशासनातून ज्या वंशावळी येतात त्यातही सापडत नाही. पण अंजनेरी शिलालेखातील त्यांच्या द्वारावतीपुरपरमेश्वर, विष्णुवंशोद्भव, यादवकुलकमलकलिका विकासभास्कर, यादवनारायण ह्या बिरुदावळी मात्र तो यादवकुळातीलच होता, असे सहज सिद्ध करतात. कदाचित तो यादववंशातील एखाद्या शाखेचा राजा असावा व म्हणूनच त्याचा नावाचा उल्लेख यादव अभिलेखात वा हेमाद्रीच्या राजप्रशस्तीत येत नसावा. त्यांचा वंशही पुढे वृध्दिंगत झालासे दिसत नाही. वरील बिरुदांशिवाय "समधिगतशेष पंचमहाशब्द, सामंतपितामह (स्वसामर्थ्याने सामंतपदे निर्माण करणारा), सामंतजमरात (दुष्ट सामंतांचा नाश करणारा), महासामंत इत्यादि बिरूदे त्याच्या नावामागे लाविली आहेत. हा यादव इतिहासात सेऊणचंद्र तृतीय म्हणून ओळखला जातो. हा एक जैन शिलालेख आहे. अर्थात् त्याचा प्रारंभ 'ॐ पंच परमेष्ठिभ्यो नमः' (अर्हत, सिद्ध, आचार्य, उपाध्याय व साधू या पंचपरमेष्ठींना वंदन असो) या जैन प्रार्थनेने होतो.[३०] ह्यात सेऊणचंद्र तृतीय ह्याच्या हाताखालील अधिकारी (महामहत्तम) पाणुमडऊरी ह्याचा उल्लेख येतो. हे नाव फारसे कर्णमधुर नाही, हे पंडित विजयमूर्ती ह्या जैन संशोधकांचे मत कुणालाही पटेल असेच आहे.[३१] पण पाणु(पानु) हे नाव यादवकाळात बरेच उपयोगात होते, असे दिसते. (श्रीचक्रधरांच्या शिष्यांपैकी एकाचे नांव पानुनायक असून, स्वामी कन्नडजवळ करंजखेडला असता त्याचे 'हाटग्रही' उतरले होते) मडऊरी हे या अधिकाऱ्याचे आडनाव दिसते. देशिंग बोरगांव येथिल लेखात पानुम हे नांव येते. शिलालेखात त्याची बरीच लांबलचक प्रशस्ती गायली आहे. ह्याने आणि त्याचा स्वामी सेऊणचंद्र तृतीय ह्याने विचारविनिमय करून दोन 'हाटग्रहे' (दुकाने) श्रीचंद्रप्रभ स्वामींचे मंदिरासाठी करमुक्त करून दान केली. लाहड साधू, वत्सराज साधू व दशरथ साधू (साधू > साहु=सेठ) यानी पण श्रीचंद्रप्रभ स्वामीचे व

३०. यावरून डॉ. वर्मा ह्यांनी नाशिक-अंजनेरी भागात जैनांचे प्राबल्य असावे व म्हणूनच या भागास श्वेतपाद नाव पडले असावे असे तर्क केले आहेत, पण त्यांना फारसा आधार नाही. ३१. जैन शिलालेख संग्रह, तृतीय भाग, पृष्ठ ४२.

शिवालयास (कारण मूळ शिलालेखात 'चंद्रप्रभाय देवाय कंदर्पदहनाय च ' असे शब्द आहेत) दान दिली. हे शासन 'दुष्टगणकगज कंठीरव साधुगणंकचरणारविंदमकरंद लुब्धषट्पद' दिवाकर पंडित (कोलेश्वर पंडिताचा पुत्र) ह्याने शैलपट्टावर लिहिले.

या लेखाची तिथी शके १०६३, दुंदुभिं संवत्सर, ज्येष्ठ शुद्ध १५, सोमवार अनुराधा नक्षत्र, सिद्धीयोग अशी दिलेली आहे.

**मल्लुगि :**

सिंहराज किंवा सिंघणदेव ह्याचेनंतर हेमाद्रीने मल्लुगिच्या वर्णनासाठी पुढील श्लोक लिहिले आहेत, ते असे-

**तस्मादप्रतिमल्लोभूत् मल्लुगिर्वल्लभः क्षितेः**
**उदजृंभत जंभारिभूरिदोर्दंडचंडिमा ॥३२॥**
**आसाद्य सद्यः स्वनिवासहेतोः श्रीपर्णखेटं नगरं रिपुभ्यः**
**आहारि येनोत्कलभूमिपालादुत्तुंगमातंगघटा हठेन॥ ३३ ॥**

ज्या अर्थी हेमाद्रीने त्याच्या वर्णनासाठी दोन श्लोक उपयोगात आणले आहेत, त्या अर्थी मल्लुगि हा या वंशातील पराक्रमी राजा असावा. त्याने आपल्या निवासस्थानासाठी शत्रूंकडून पर्णखेट हे नगर जिंकून घेतले. आणि उत्कल देशातील राजाचा स्वबाहुबलाने पराक्रम करून त्याचे अजस्त्र गजदल जिंकून घेतले.

यापैकी पर्णखेट म्हणजे विदर्भात अकोला- नागपूर लोहमार्गावर असणारे पालखेड स्टेशन असावे. (डॉ.श्रीनिवास रित्ति पर्णखेट हे धुळे जिल्ह्यातील पालखेड असावे असे म्हणतात, पण पुरावा देत नाहीत. डॉ. वर्मांनी याविषयी मौनच पाळले आहे.)

अकोल्याजवळ दक्षिणेस बारशी टाकळी या गावी असलेला शके १०८९ चा शिलालेख प्रसिद्ध असून, तो डॉ. वा. वि. मिराशी यांनी संपादित केला आहे[३२] यात एका अनाम राजवंशाचे वर्णन असून, त्या वंशातील घटाम, हेमाद्रिदेव याने राजल ह्यास परास्त केले, असे वर्णन आहे. (या हेमाद्रिदेवासच पुढे सिंघणाचा सेनापती खोलेश्वर ह्याने परास्त केले) अर्थात् बारशी टाकळीचा हा अनाम राजवंश यादवांचा शत्रू होता असे दिसते. अर्थात मल्लुगिने जिंकलेले पर्णखेटनगर विदर्भातील उपर्युक्त पालखेडच असावे, ह्यात संशय राहात नाही. या अनाम राजवंशाचे वरील शिलालेखात त्यांची राजधानी बारशीटाकळी या नगरीचे वर्णन पुढीलप्रमाणे दिले आहे.

**तेकल्लीं राजधानीं स्वां धर्मदुर्गं कलौ युगे**
**वाराणसी कृता तेन विमलैः सुचरित्रकैः ॥**

३२. E.I., Vol. XXI, 128-132.

महानुभावीय ग्रंथ गोंविंदप्रभुचरित्रात एका 'टेकीच्या रायाचा' वारंवार उल्लेख येतो. डॉ. वि. भि. कोलते यांनी या टेकीच्या रायासच देवगिरी राजा म्हटले आहे. पण तेक्कली > टेकी हा सहज होणारा अपभ्रंश लक्षात घेतला, तर बारशीटाकळीच्या ह्याच अज्ञात व अनाम वंशाचा उल्लेख आहे., हे स्पष्ट व्हावे[३३] (डॉ. कोलते ज्या दोन लीळांतून (क्र. ६७ व २२७) या टेकीच्या रायाचा उल्लेख लिहितात त्यातून क्र. २२७ मध्ये टेकीच्या रायाचा मुळी उल्लेखच नाही, हे विशेष).

ज्या उत्कल राजाचे गजदल मल्लुगिने हिरावून घेतले तो कोण असावा, ह्याबद्दलही विद्वानांत एकवाक्यता नाही. उत्कल देशातील काकतीयनृपती रूद्रदेव याच्या अन्नमकोंडा शिलालेखात त्याने पोलावास देशाच्या मल्लुगिदेवाचा पराभव केला असल्याचे म्हटले आहे. पण पोलावास देश म्हणजे आंध्र प्रदेशातील करीमनगर जिल्ह्यातील जगत्याल तालुका. या प्रदेशावर यादवांचे राज्य नव्हते हे सांगणे नकोच. तेव्हा हा पोलावास देशवासी मल्लुगि म्हणजे यादव मल्लुगि नव्हे हे निश्चित.[३४]

ते कसेही असले, तरी मल्लुगि, अत्यंत अवघड अशा राजकीय परिस्थितीचे काळात चालुक्य सत्तेबरोबर होता. कल्याणीच्या चालुक्य राजवंशाचे ऐश्वर्य लयाला गेले होते. चालुक्य सिंहासनावर तैलप तृतीय (इ. स. ११५०-११६३) हा दुर्बल शासक होता. बिज्जल (अथवा बिज्जण कलचुरि) हा त्याचा एक उद्दाम सामंत. तो इ. स. ११५५-१७ पर्यंत तरी बनवासी प्रांतावरील शासक होता, असे आपणास त्याच्या बळगाम्वे शिलालेखावरून कळते.[३५] त्याने चालुक्यांचे बाजूने मालव, लाट इत्यादि प्रदेशावर विजय मिळविले. त्याचा सेनापती मैलार हा तार्दवाडीवर शासन करीत असे. चालुक्य सम्राटांचे होयसळ, कदंब व काकतीय हे सामंत स्वतंत्र होण्याची धडपड करीत होते अशा अवस्थेतच या उद्दाम बिज्जणाने तैलपाविरुद्ध विद्रोहाचे निशाण उभारले. तैलप तृतीय याने आपला यादव सामंत मल्लुगि याची मदत मागितली. जल्हणाच्या सूक्तिमुक्तावलीत या स्वरूपात मल्लुगिचे सेनापती दादा व महीधर यांनी बिज्जण कलचुरिच्या सैन्याचा पराभव केल्याचे उल्लेख आहेत. अर्थात् तैलपाने आपल्या यादव सामंताचे साहाय्य घेतले, हे निश्चित. पण बिज्जणाच्या षड्यंत्रामुळे चालुक्य साम्राज्य अतिशयच खिळखिळे झाले. तैलप तृतीय हा कल्याणहून अण्णिगेरी येथे निघून गेला. व बिज्जणाने महाराजाधिराज, भुजबलचक्रवर्ती ही सार्वभौमत्वाची बिरूदे धारण केली. पुढे श्रीबसवेश्वर ह्या वीरशैव संताने उभारलेल्या सामाजिक व धार्मिक चळवळीत बिज्जलाचीही आहुती पडली ते वेगळेच.

अशा कठीण काळात आपल्या सम्राटाशी निष्ठावानपणे वागल्याने मल्लुगीचे व भिल्लम

३३. डॉ. कोलते वि. भि., गोंविंदप्रभू चरित्र, लीळा क्र. ६९ व [illegible] ३४. [illegible] Kakatiyas of Warangal, page 50. ३५. [illegible]

राजघराण्याचे महत्त्व अनन्यसाधारण वाढले.

या मल्लुगिदेवाचा एकमेव शिलालेख खानदेशातील शिरपूर तालुक्यात बोराडी नामक गावाजवळ धाबादेव या ठिकाणी आहे. यात सिंघणदेवाचा पुत्र मल्लुगिदेव ह्याने कौंडेव्वा देवीचे 'मठु देऊळ वापी.' इत्यादि बांधल्याचा उल्लेख आहे.[३६] यातील 'स्त्री सिंघणदेवसुते मेलुगिदेवें आपणें सुहस्ते लीषीतं प्रमाणं' हे शब्द महत्त्वाचे आहेत.

****

३६. प्राचीन मराठी कोरीव लेख, क्र. ६४.

# मल्लुगिनंतर

चालुक्य राज्यश्री चंचल होऊन त्या वंशास सोडून जात असता, त्यांच्या मांडलिक असलेल्या यादव राजवंशातही दुर्दशेचेच वातावरण होते. हेमाद्रीच्या राजप्रशस्तीवरून व यादव शिलाताम्रशासनावरून आमरगांगेय, अमरमल्लुगि गोविंदराज, कालीयबल्लाळ, कर्ण, भिल्लम पाचवा इतक्या राजांचे शासन झालेले दिसते. त्यांचा क्रम व आपसातील नाती ठरविणे अतिशय कष्टाचे काम आहे. हेमाद्रीच्या राजप्रशस्तीत मल्लुगिनंतर-

**तस्मादमरगांगेयः संबभूव भुवः पतिः**
**अथाविंदत गोविंदराजः साम्राज्यसंपदम् ॥ ३५ ॥**
**ततो मल्लुगिपुत्रोऽभूद् भूपालोमरमल्लुगि :**
**अथ कालीयबल्लाळ : पालयामास मेदिनीम् ॥ ३६ ॥**
**महीपतेस्तस्य विहाय पुत्रान्**
**गुणानुरक्ता यदुवंशलक्ष्मीः**
**श्रीभिल्लमं तस्य तदापितृव्य-**
**-मव्याजराजंद्भुजमाजगाम ॥ ३७ ॥**

यातून




हा क्रम निघतो व तोच डॉ. भांडारकर यांनी स्वीकारला आहे.[१]

पण यादवांच्या शिलाताम्रशासनातून वेगळ्याच वंशावळी आपल्या पुढे येतात त्या अशा-

१. भिल्लम पाचवा ह्याचा गदग शिलालेख[२]




यातील अमरगांग हे नांव राजप्रशस्तीतही आहे. पण कर्ण मात्र नाही. म्हणून डॉ. वर्मा

**१. Dr. R. G. Bhandarkar, The Early History of Deccan, page 112. २. E. I. Vol. XIII, page 217-219.**

घोटाळ्यात पडले आहेत. पण कर्णाचा वंश अमरगांगेय, अमरमल्लुगि किंवा भिल्लम पाचवा ह्यांचेप्रमाणे पुढे चालला नसावा. कदाचित् ह्याचे शासन कर्नाटकसारख्या सुदूर प्रदेशात अल्पकाळच चालले असावे.

२. यादव सिंघणदेव द्वितीय ह्याचा धारवाड ताम्रपट[३]

अमरगांगेय
|
मल्लुगि
|
भिल्लम

३. सिंघण द्वितीयचा अनवट्टी शिलालेख व हरळाहल्ली ताम्रपट[४]

मल्लुगि
|
भिल्लम

४. रामचंद्र देवाचा पैठण ताम्रपट[५]

सिंघणदेव प्रथम
|
मल्लुगि
|
भिल्लम

अशा रितीने आपणास सहजच दिसून येते की, वेगवेगळ्या शिलाताम्रशासनातून येणाऱ्या वंशावळी वेगवेगळ्या आहेत व त्यांची संगती लावणे कष्टप्रद आहे. डॉ. सरकार, डॉ. पांडुरंगराव देसाई, डॉ. कीलहॉर्न यांनी हा सर्व गोंधळ दूर करण्याचा प्रयत्न केला आहे. व त्या सर्वांची मते डॉ. वर्मा यांनी उद्धृत केली आहेत. डॉ. श्रीनिवास रित्ति ह्यांनी ह्या प्रश्नाचा उलगडा करण्याचे अगदीच टाळले आहे. पण ह्यातील काही गोष्टी अगदीच स्पष्ट आहेत. त्या अशा-

१. सिंघणदेव प्रथम ह्यानंतर मल्लुगि हाच यादववंशात पराक्रमी राजा झाला व त्यानंतर महत्त्वाचा पराक्रमी राजा भिल्लम पाचवा हाच.

२. हेमाद्रिच्या राजप्रशस्तीत कालीयबल्लाळ ह्याच्या पुत्रांना सोडून, राज्यलक्ष्मी त्यांचा चुलता भिल्लम पाचवा ह्याचे भुजबळाचा आश्रय घेती झाली, असे जे वर्णन आहे, त्यावरून पुढील तर्क संभवतात.

३. अमरगांगेय, अमरमल्लुगि व गोंविंदराज, कालीयबल्लाळ व भिल्लम ह्यापैकी काही

३. E. I. Vol. XIII, page 32-41. ४. Karnataka Desa Inscriptions, Vol. I., page 200 and JBBRAS, Vol. XV., Page 333. ५. I. A. XIV, page 314.

शासक नाशिक-सिन्नर या मराठी भागात तर काही पळियंडा (परेंडा), सोन्नलिगे (सोलापूर) या कानडी प्रदेशावर शासन करीत असावेत. म्हणून गोविंदराज, अमरगांगेय ही नांवे मराठी तर कालीयबल्लाळ (काली=बल्लाळ=बलवान हा कानडी शब्द आहे) हे नांव कानडी वाटते.

४. यात कर्नाटकातील चालुक्य व कलचुरि ह्यांच्यातील संघर्षाचा लाभ घेऊन भिल्लम पाचवा ह्याने कर्नाटकातच आपला उत्कर्ष साधला. त्याने आपले प्रारंभिक विजय प्रत्यंडक (परेंडा) मंगळवेढा ह्या कानडी सीमेवरच मिळविले आहे.

५. साहजिकच मल्लुगि ह्या पराक्रमी राजानंतर (त्याचे शासन प्रत्यंडक या कानडी भागावर होते, हे आपण मागे पाहिलेच आहे.) कानडी प्रदेशातील शिलालेख व साधन-सामुग्रीच्या अभावामुळे उत्तरकालीन यादव शिलाताम्रशासने भिल्लम पाचवा ह्याचेच नाव देतात व त्याला मल्लुगिचा पुत्रही म्हणतात.

६. पण भिल्लम पाचवा खरोखरच मल्लुगिचा पुत्र होता काय ? यादव कृष्णदेवाच्या शके ११७३ च्या मेथी शिलालेखात भिल्लमाच्या पित्याचे नाव 'कृष्ण' असे दिले आहे. हा कृष्ण व गदग शिलालेखातील कर्ण हे एकच काय ?

७. 'ततो मल्लुगिपुत्रोभूद्भूपालोमरमल्लुगि' हे हेमाद्रीचे वर्णन (अमर मल्लुगिचा पुत्र होता) अक्षरशः खरे मानावयाचे काय? केवळ नामसादृश्यामुळे हेमाद्रीने अमरमल्लुगिला मल्लुगिचा पुत्र ठरविले असावे काय ?

८. 'महिपतेस्तस्य विहाय पुत्रान' म्हणजे कुणाच्या पुत्रांना सोडून राज्यलक्ष्मी भिल्लमाकडे गेली अमरमल्लुगिच्या ? कालीयबल्लाळाच्या ? ह्या प्रश्नाचे उत्तर असे असेल काय ?

९. भिल्लम पाचवा ह्याचे कर्तृत्व कल्याणी, लोकीगुंडी, धारवाड, गदग, निंबाळ ह्याच भागात घडले. त्याचा एकही लेख (एकूण उपलब्ध लेख १७) अद्याप महाराष्ट्रात सापडलेला नाही. कर्नाटकातील राज्य मंगळवेढा प्रत्यंडक(परेंडा) येथील राजांना मारून त्याने खड्गाचे साहाय्याने संपादन केले, असा पराक्रम गाजवून तो आपल्या पैतृक राज्यात नाशिक, सिन्नर, खानदेश भागात आला तेव्हा राज्यलक्ष्मीने यादव राजकुमारांना सोडून त्यास माळ घातली, असे वर्णन योग्य जमते. ज्या अकर्तृत्ववान यादव राजकुमारांना सोडून यादववंशी भिल्लमावर लक्ष्मी अनुरक्त झाली, ते अमरमल्लुगिचेच पुत्र असावेत. कारण खानदेशात शिरपूरजवळ बाबाकुवर ह्या गावी एक स्तंभलेख आहे. हा अद्याप अज्ञात व अप्रकाशित आहे. त्याचे वाचन असे-

ओळ १ श्रीअमरदेवाचे व खामु
२ खलादिशेषे मेलुगिदेवे

हा अमरमल्लुगिचा शिलालेख असावा. तेव्हा अमरमल्लुगिचे राज्य खानदेशात व भिल्लम पाचवा ह्याचा अधिकार कर्नाटकात होता. पराक्रमी भिल्लम असिलतेचे घाव अंगावर मिरवीत आपल्या 'देशी' परतला व यादव राज्यलक्ष्मी त्यावर भाळली. कदाचित् भिल्लम पाचवा हा यादवांच्या मुख्य शाखेतील नसावाही. कर्ण किंवा कृष्ण ह्या अप्रसिद्ध यादववंशी वीराच्या ह्या पुत्राने कर्नाटकात

आपल्या पराक्रमाने आपल्या भाग्याचा लेख लिहिला व संपूर्ण यादव राज्याचाच तो स्वामी झाल्यावर त्याला वंशावळीत स्थान देण्याचा प्रयत्न होऊन मल्लुगिचा मुलगा व अमरमल्लुगिच्या वंशजांचा चुलता ठरविण्यात आले असावे. परमार उदयादित्य, मालोजीराजे भोसले ह्यांचे कर्तृत्वाचा आलेख असाच आहे.

१०. सारांश, मल्लुगिचा काळ शके १०६७ ते १०८७ (इ. स.११४५-११६५) असा गृहीत धरला तर अमरगांगेय, अमरमल्लुगि, गोविंदराज, कालीयबल्लाळ कर्ण ह्यांचे शासनकाल ११६५ इ. स. ११८५ इ. स. ह्या २० वर्षांचे काळात बसवावे लागतील. कारण भिल्लम पाचवा ह्याचा प्रथम लेख म्हणजेच बिजापूर संग्रहालय लेख, शक ११०६ (इ. स. ११८५) चा आहे. म्हणजेच इसवी सनाचे बारावे शतक संपता संपता यादवसत्तेने आपल्या वरील मांडलिकत्वाचे बंधन झुगारून देऊन भिल्लम पाचवा ह्याचे मुखाने साम्राज्यपदाची घोषणा केली.

****

# भिल्लम पाचवा

दक्षिण भारतातील अस्थिर परिस्थितीचे नीट मूल्यांकन करून यादववंशाच्या साम्राज्यपदाची घोषणा करणारा प्रथम पुरुष म्हणून यादव वंशाच्या इतिहासात भिल्लम पाचवा ह्याचे अनन्यसाधारण महत्त्व आहे. त्याचे बहुतेक शिलालेख विजापूर आणि धारवाड या जिल्ह्यांत सापडले आहेत. त्याचे बहुतेक लेख कानडी आहेत.[१] अर्थात् त्याच्या कर्तृत्वाचा प्रारंभिक भाग विजापूर, धारवाड, बीदर, सोलापूर जिल्ह्यांत घडला, हे सहज दिसते.

१. भिल्लमाच्या ह्या यशाचे प्रतिबिंब यादवकालीन साहित्यातहि उमटलेले आपणास दिसून येतो. हेमाद्रीने आपल्या राजप्रशस्तीत-

**महिपतेस्तस्य विहाय पुत्रान्**
**गुणानुरक्ता यदुवंशलक्ष्मी**
**श्रीभिल्लमं तस्य ततः पितृव्य-**
**-मव्याजराजं भुजमामगाम ॥ ३७ ॥**
**यः श्रीवर्धनमाससादनगरं क्षोणिपतेरंचला-**
**-द्यः प्रत्यंडकभूभृतं च समरे दृष्टं त्यंजेष्ट क्षणात्**
**यो वा मंगलवेष्टकं क्षितिपतिं श्रीबिल्लणं जघ्निवान्**
**कल्याणश्रियमप्यवाप्य विदधे यो होसलेशं व्यसुम् ॥ ३८ ॥**
**स दण्डिकामंडलमंडयित्रीमकंपसंपत्प्रभवैर्विलासैः**
**चक्रे पुरं देवगिरिं गिरीशप्रसादसंसादितदिव्यशक्तिः ॥ ३९ ॥**

या तीन श्लोकांत त्याची प्रशस्ती गायली आहे. तर जल्हणाच्या सूक्तिमूक्तावली या ग्रंथात त्याच्या विजयाचे वर्णन पुढील श्लोकात केले आहे.

**मल्लः पल्लवितोरुभित्तिरभितस्त्रस्यदूबलो मैलुगिः**
**मुंजः खंजितविक्रमस्त्रिभुवनब्रह्मा किल ब्राह्मणः**
**अन्नो मुन्नपराक्रमोविजितभूर्बभूरणप्रांगणे**
**येनाकारि मुरारिविक्रमभूता किं किं न तस्योर्जितम् ॥ १२॥**[२]

या श्लोकावरून भिल्लमाच्या प्रारंभिक विजयाची कल्पना येते.

---

१. याला अपवाद केवळ सोलापूर जिल्ह्यातील मार्डी येथील शिलालेखाचा, पण यात मारूडिनगर (आधुनिक मार्डी) येथील योगेश्वरदेवाचे मंदिरास भिल्लम पाचवा ह्याच्या काळात मिळालेली दाने सिंघणदेव द्वितीय ह्याच्या काळात शिलेवर लिपीबद्ध करण्यात आली आहेत. २. Quoted from Bhandarkar, Early History of Deccan, Page 230.

**२. चालुक्य साम्राज्याची दुर्दशा :**

भिल्लमाच्या महत्त्वाकांक्षेला उपकारक होईल, अशीच राजकीय परिस्थिती यावेळी दक्षिणेत होती. चालुक्य सिंहासनावर सोमेश्वर चतुर्थ हा पराक्रमशून्य शासक यावेळी राज्य करीत होता. (त्याचा राज्यकाल इ. स. ११८४ ते १२०० असा आहे.) त्यांचे बहुतेक सामंत त्याच्या दुर्बलतेचा लाभ घेऊन स्वतंत्र होण्याच्या उद्योगास न लागते, तरच नवल. द्वारसमुद्रचे होयसळ, उच्छंगीचे पांड्य, गोव्याचे कदंब, वरंगलचे काकतीय या सर्वांनीच चालुक्य सत्तेचा अधःपात आपल्या विद्रोहांनी जवळ आणला. इ. स. ११८४ ते ११९० चा इतिहास या शासकांच्या परस्परांविरुद्धच्या युद्धांनी भरलेला आहे. सोमेश्वर चतुर्थ त्रिभुवनमल्ल हा ह्या सर्वांना तोंड देता देता अगदी कंटाळून गेला. कलचुरिनृपती बिज्जलाने तर काही काळ कल्याणी नगरच जिंकून घेऊन आपल्या सार्वभौमत्वाची घोषणा केली. पण लवकरच कलचुरि घराण्यातहि गृहकलह सुरू होऊन त्यांना कल्याणी सोडून देणे भाग पाडले.

अशा अवस्थेत भिल्लमाने स्वपराक्रमाची परीक्षा पाहण्याचे ठरविले.

**३. श्रीवर्धन :**

हेमाद्रीमतानुसार त्याने प्रथम श्रीवर्धन हे नगर राजा अंतल ह्याचेपासून जिंकून घेतले. या श्रीवर्धन नगराचे स्थलनिश्चितीविषयी विद्वानांत बरेच मतभेद आहेत. डॉ. दिनेशचंद्र गांगुली हे नगर नागपूरजवळील नंदीवर्धन होते, असे मानतात, पण पुरावा काहीच देत नाहीत.

डॉ. वर्मा व डॉ. रित्ति हे श्रीवर्धन हे कोकणातील समुद्रकाठचे नगर असे मानतात.[३] पण कोकणात यावेळी शिलाहारांचे राज्य होते आणि शक ११०६-८ च्या सुमारास कोकणात शिलाहार अपराजितदेवाचे राज्य असून, त्याच्या ११०८ च्या परळ शिलालेखात[४] त्याला 'समस्तराजावली विराजित महाराजाधिराज कौंकणचक्रवर्ती' ह्या पदव्या लावल्या आहेत. तेव्हा कोकणातील श्रीवर्धननगर शके ११०५-१११७ या काळात कुणा अंतल नावाचे राज्याच्या वर्चस्वाखाली असावे, हे सिद्ध होत नाही. ते मंगळवेढा, कल्याणी, प्रत्पंडक (परेंडा) या परिसरातच शोधले पाहिजे.

लीळाचरित्रात बीड हे ग्रामनाम येते. रत्नमाळा हे लीळाचरित्राचे संस्कृत रुपांतर आहे व त्यात बीडसाठी श्रीवर्धन असा पर्याय आहे. महानुभाव पंथात श्रीवर्धनस्थ बाबा बीडकर असा प्रयोग येतो. अंतल ह्या बीडचाच लहानसा सामंत असावा.

---

३. Dr. Ritti, The Seunas, Page 72, Dr. Varma Yadavas and Their times, page 51. ४. डॉ. तुळपुळे, प्राचीन मराठी कोरीव लेख, क्र. १६ पृ. ८०.

**४. प्रत्यंडक :**

प्रत्यंडंक म्हणजेच उस्मानाबाद जिल्ह्यातील परेंडा दुर्ग (या सभोवतीच्या प्रदेशास पळियंडा ४००० असे म्हणत) हा प्रदेश यादवनृपती सिंघणदेव प्रथम ह्याच्या अधिकाराखाली होता, हे आपण मागे पाहिलेच. कदाचित् मधल्या अराजकाचे काळात हा दुर्ग यादव सामंताकडून काढून घेऊन इतर कुण्या सामंताला देण्यात आला असावा. कदाचित् एखादा बलदंड सामंत तेथे शिरून बसला असावा. (हेमाद्री त्याला दुष्ट हे विशेषण लावतोच.) भिल्लमाने ह्या दुष्ट सामंताला जीवे मारून हा दुर्ग जिंकला, असे दिसते.

डॉ. वर्मा मात्र प्रत्यंडक दुर्गाचे समीकरण पूर्वीच्या भोर राज्यातील प्रचंडगड याचेशी मांडतात. ते अर्थात्च चूक आहे. या प्रचंडगडाचे प्राचीन नांव 'तोरणा' असे होते. व छत्रपती शिवाजी महाराजांनी ते आपल्या आवडीनुसार बदलून 'प्रचंडगड' असे ठेविले.[५] अर्थात् प्रत्यंडक म्हणजे परेंडा दुर्ग ह्यात संशय नाही.

**५. मंगलवेष्टक :**

म्हणजे पंढरपूरजवळील मंगळवेढा हे नगर. चालुक्य सत्ता श्रीहीन झाली नसता कलचुरि बिज्जल इथेच सामंतपद उपभोगीत होता. व इथेच महात्मा बसवेश्वरांचाही निवास घडलेला आहे. या ठिकाणचा राजा बिल्लण ह्याला भिल्लमाने ठार मारले. डॉ. वर्मा ह्या सामंताच्या नावाची चर्चा करीत नाहीत. हा कलचुरि बिज्जल तृतीय असावा. तो कलचुरिनृपती रायमुरारि सोविदेव याचा पुत्र होता. पण भिल्लमाने त्याला मारले. हे मात्र खरे नव्हे. कारण तो भिल्लमामागेही बरीच वर्षे जिवंत होता. तो कलचुरि सिंघणदेवानंतर राज्यावर आला.

आता आपण जल्हणाच्या सूक्तिमुक्तावलीतील श्लोकांचा विचार करू.

**६. मल्ल :**

या नावाच्या एका राजाचा उल्लेख रायचूर जिल्ह्यातील मल्लट या गावातील शिलालेखात सापडतो. हे राजे आपणास हैहयवंशी म्हणवून घेत व आपण महिष्मतीपुराहून आलो, असे अभिमानाने सांगत. ह्यापैकी मल्ल द्वितीय ह्याच्या एका शिलालेखात मल्ल (द्वितीय) ह्याने भिल्लमाच्या प्रचंड सैन्याचा नाश केला, असे वर्णन आहे. हाच जल्हणाने उल्लेखिलेला मल्ल असावा.

**७. मैलुगिदेव :**

डॉ. रित्ति ह्यांच्या मते, हा कलचुरि वंशातील शासक मैलुगिदेव असावा. हा कलचुरिनृपती पेरमाडिदेव व नागलदेवी ह्यांचा पुत्र होता. पण त्यांचा राज्यकाल इ. स. ११६७ पूर्वीच संपुष्टात आला, तेव्हा भिल्लमाने त्याचा पराभव केला असणे शक्य नाही.

मैलुगि नामक एका मांडलिकाचा उल्लेख नांदेड जिल्ह्यातील अर्धापूर शिलालेखातही येतो. अर्धापूर (आराध्यपूर) येथील रट्टवंशीय शासक बल्लाळ ह्याला 'मैलुगिमांडलिकराज्य

५. काळे दि. वि., शिवाजी सुव्हेनीर मराठी भाग, पृ. ५८.

प्रतिष्ठापनाचार्य' व 'यादवराज्यस्थैराचार्य' ह्या पदव्या लावल्या गेल्या आहेत. हा शके १११९ (इ. स.११९०) चा शिलालेख आहे. डॉ. रित्ति ह्यातील मैलुगि म्हणजेच यादवनृपती मल्लुगि (सिंघणदेव प्रथमनंतर राज्यावर आलेला) असे मानतात. आपण मागे पाहिलेच की, मैलुगिचा राज्यकाल इ. स. ११४५ ते ११६५ असा ठरवावा लागतो. अशा अवस्थेत इ. स. ११९० मध्ये राज्य करणाऱ्या बल्लाळाने त्यास साहाय्य करून राज्यावर बसविणे शक्य नाही. शिवाय मागील प्रकरणात आपण मैलुगिच्या पराक्रमाचा आलेख पाहिलाच आहे. त्याने पर्णखेटनगर व उत्कलाधिपाची गजसेना जिंकून आपल्या पराक्रमाचा परिचय दिला. तेव्हा त्याला रट्टवंशातील बल्लाळाचे साहाय्य घ्यावे लागेल हे संभवत नाही. शिवाय हा मैलुगि जर यादव मैलुगिच मानावयाचा, तर 'मैलुगिमांडलिक-राज्यप्रतिष्ठापनाचार्य' ही पदवी लावल्यावर पुन्हा 'यादवराज्यथैर्याचार्य' म्हणण्यात द्विरुक्तीचा (tautology) दोष येणार नाही काय ? तस्मात् अर्धापूर शिलालेखातील हा मैलुगि यादव मल्लुगि देवापेक्षा वेगळा आहे, यात संशय नाही.

कदाचित् हा मैलुगि नांदेड परिसरातील एखादा सामंत असावा. ह्याचा भिल्लमाने पराभव केला असावा. ह्यात मध्यस्थीचे काम रट्टवंशीय बल्लाळ ह्याने करून मैलुगि सामंत व भिल्लम ह्यांची मैत्री करून देऊन एकाच वेळी 'मैलुगिमांडलिकराज्यप्रतिष्ठापनाचार्य' व 'यादवराज्यथैर्याचार्य' ह्या पदव्या मिळविल्या असाव्यात. येथे बिजापूर येथील शासकांच्या (आदिलशाही सुलतानांच्या) बाजूने कर्नाटकातील नायकांविरुद्ध युद्ध करणाऱ्या (आदिलशाहीचा आधारस्तंभ असलेल्या) व त्याचवेळी या हिंदूनायकांना शक्यतो संरक्षण देणाऱ्या महाराज शहाजीराजांची सहज आठवण होते.

८. ब्रह्मा, मुंज, अन्न व बभ्रू :

सूक्तिमुक्तावलीत उल्लेखिलेल्या या चार नृपतीचा मात्र नीट शोध लागत नाही. तथापि ब्रह्मा हा सोमेश्वर चतुर्थ त्रिभुवनमल्ल याचा सेनापती ब्रह्मा हा असावा. त्याने आपल्या सम्राटावरून स्वतःचे नाव त्रिभुवनब्रह्मा असे पालटून घेतले होते. भिल्लमाने स्वतंत्र होण्याचा उद्योग सुरू केल्यानंतर सोमश्वर चतुर्थने त्याला भिल्लमाविरुद्ध पाठविले असावे व भिल्लमाने त्याचा पराभव केला असावा.

मुंज व अन्न ह्यांचा काहीच शोध लागत नाही.

बभ्रू ह्या नावाचा उल्लेखही डॉ. ओंकारप्रसाद वर्मा करीत नाहीत. डॉ. रित्ति मात्र हा बभ्रू म्हणजे काकतीय नरेश प्रतापरुद्र हा असावा, असे कै. डॉ. पांडुरंगराव देसाई यांचे सूचनेनुसार लिहितात व ह्याला आधार म्हणजे रुद्र व बभ्रू ह्या दोन्ही नावाचा अर्थ 'शिव' असाच होतो, असे सांगतात[६] पण हा अतिशय दुर्बल तर्क आहे. सूक्तिमुक्तावलीचा कर्ता जल्हण हा प्रतापरुद्रसारख्या अतिशय महत्त्वाच्या राजाचा इतक्या त्रयस्थपणे उल्लेख करील, हे संभवनीय

६. Dr. Shriniva Ritti, The Seunas, page 97.

वाटत नाही, असो.

९. आतापर्यंत आपण हेमाद्रीच्या राजप्रशस्तीनुसार जल्हणाच्या सुक्तिीमुक्तावलीनुसार भिल्लमाच्या सैनिकी विजयांविषयी माहिती पाहिली. पण भिल्लमाचे खरे कर्तृत्व म्हणजे चालुक्यांच्या दुर्बल सत्तेचा त्याने केलेला नाश. आपण मागे पाहिलेच की, यावेळी कल्याणीवर चालुक्यवंशातील सोमेश्वर चतुर्थ त्रिभुवनमल्ल ह्याचे शासन होते. भिल्लमाचे प्रारंभी बिज्जण कलचुरीचा वंशज मैलुगिदेव ह्याचे विरुद्ध जो विजय संपादन केला, त्यामुळे चालुक्य सत्तेला थोडी स्थिरता प्राप्त झाली असावी. ह्याचा लाभ घेऊन सोमेश्वर चतुर्थ ह्याने भिल्लमाविरुद्ध सैनिकी अभियाने काढलेली दिसतात. त्याच्या काही अभिलेखांतून त्याने भिल्लमाचा पराभव करून कल्याणीचे उत्तरेस गौतमी (गोदावरी) नदीच्या तीरावर आपल्या सैन्याचा तळ ठोकला, असे वर्णन आढळते. (डॉ. श्रीनिवास रित्ति ह्यांनी ही माहिती नव्यानेच उजेडात आणली आहे. पण सोमेश्वराच्या सैन्याचा तळ ज्या गावी होता ते गाव मंजरातीर्थ हे मांजरा ह्या नदीवरील एखादे तीर्थस्थान असावे हे त्यांचे म्हणणे मात्र चूक आहे. मंजरातीर्थ म्हणजे गोदावरी व मांजरा ह्यांचे संगमावरील मंजरथ तीर्थ. हे गोदावरी नदीवरच असून, बीड जिल्ह्यात माजलगाव ह्या तालुक्याचे ठिकाणापासून दक्षिणेस सहा मैल अंतरावर आहे.)[७] या प्रारंभिक पराभवानंतर भिल्लमाने आपली स्थिती सुधारली असावी. त्याने लवकरच चालुक्य सोमेश्वराचा पराभव करून राजधानीचे कल्याणीनगरच जिंकून घेतले.[८] चालुक्य सम्राट आपली राजधानी सोडून बनवासी प्रदेशातील जयंतीपूर ह्या गावी निघून गेला.

**१०. सार्वभौमत्वाची घोषणा :**

भिल्लमाच्या उपलब्ध शिलालेखावरून त्याचे पहिले राज्यवर्ष (त्याच्या साम्राज्यपदाच्या घोषणेचे पहिले वर्ष) ठरविणे कष्टाचे काम आहे. त्याच्या काही शिलालेखांतून इ. स. ११८७, काहीतून इ. स. ११८६ तर काहीतून इ. स. ११८४-८८ ही वर्षे त्याचे पहिले राज्यवर्ष म्हणून आपणांस प्राप्त होतात. हा गोंधळ होण्याचे कारण चालुक्य सोमेश्वर चतुर्थ ह्याचेशी त्याची चाललेली सतत युद्धे व त्यातून कधी विजय तर कधी पराभव ह्या घटनाचक्रातून निर्माण झाला असावा. इ. स. ११८४ पासूनच साम्राज्यपदाकडे त्याची पावले पडत होती. चालुक्य सत्तेचा शेवटी नाश होऊन, कल्याण राजधानीत प्रवेश करून आपल्या विजयाची घोषणा करण्यास त्याला इ. स. ११८६-८७ हे वर्ष उजाडावे लागले असावे, असा तर्क आपण करू शकतो.

१०. पण हे साम्राज्यपद भिल्लमाला सुखासुखी मिळाले नाही. चालुक्यांच्या नष्टप्राय साम्राज्यावर अधिकार सांगणारी दुसरीही एक सत्ता दक्षिण कर्नाटकात होती व ती म्हणजे द्वारसमुद्रचे होयसळ, चालुक्य सिंहासनावर त्यांचाही डोळा होताच. या कुळातील विष्णुवर्धन,

७. Dr. Shrinlva Rittl, The Sounas, page 74. ८. हेमाद्रीच्या राजप्रशस्तीतील 'कल्याणश्रियमप्यवाप्य' विदधे यो होसलेशं त्यसुम।' हे वर्णन पहा.

होयसळ इत्यादि ह्याने स्वतंत्र होण्याचा एकदा प्रयत्न केला होता, हे आपण मागे (पृ.५५) पाहिलेच. आता चालुक्य सत्ता मुमूर्षू अवस्थेत असता ते कल्याणनगरावर आधिपत्य मिळविण्याचा प्रयत्न न करते तरच नवल. ह्यातूनच यादव व होयसळ सैन्यात एक निकराची झुंज सोराटुर ह्या ठिकाणी झाली. ह्या युद्धात यादवांचा निश्चितपणे पराभव झाला, आणि म्हणूनच होयसळनृपती वीरबल्लाळदेव द्वितीय ह्याच्या व त्याच्या वंशजांच्या शिलालेखातून या युद्धाची लांबलचक क्वचित् अतिशयोक्त वर्णने आपणांस वाचावयास मिळतात.[९]

अ. अण्णिगेरे येथील इ. स. १२०२ च्या एका शिलालेखात होयसळ बल्लाळ हा भिल्लमाच्या अथांगसेनासागराला सुकवून टाकणारा वडवानळ आहे. असे वर्णन आले आहे. ह्याच शिलालेखात बल्लाळाने भिल्लमाचा लोक्कीगुंडी (आधुनिक लक्कुंडी-गदगच्या दक्षिणेस सहा मैल) ते सोराटूर अशा पाठलाग करून शेवटी सोराटुर येथे त्याच्या सैन्याचा विध्वंस केला, असे म्हटले आहे.

ब. होयसळनृपती नरसिंह ह्याच्या हरिहर येथील इ. स. १२२४च्या शिलालेखात ह्या सोराटूरच्या युद्धाचे विस्तृत वर्णन देण्यात आले आहे. ते असे-

यादवांच्या सैन्यात २०,००० पदाती व १२,००० अश्वारोही सैनिक होते. बल्लाळाने या सैन्याचा सतत पाठलाग केला. एरांबर्गे, कुरूगोड, गुत्ती, बेलिट्टगे रट्टपल्ली, विराटनकोटे हे दुर्ग जिंकून घेतले व शेवटी यादव सैन्याचा नाश केला.

भिल्लमाने होयसळांविरूद्ध प्राणपणाने झुंज दिली पण त्याचा पराभव झाला हे निश्चित. ह्याच युद्धात भिल्लमाचा सेनापती जैत्रसिंह, जैत्रपाळ किंवा जैबुगी ह्याला वीरमरण लाभले. होयसळांच्या एका शिलालेखात बल्लाळाने 'आपल्या खड्गाला कामदेवाच्या (बहुधा उच्छंगीच्या पांड्य वंशातील) रक्ताचे पाणी पाजले. भिल्लमाच्या मस्तकरूपी पाषाणावर धार लावली. व जैतुगीच्या मुखकमलात ती कोषबद्ध केली,' असे वर्णन आहे. यावरून भिल्लमाचा हा पराक्रमी सेनापती यादव सेनेचे रक्षण करताना स्वामिकार्यार्थ रणांगणावर पडला, असे दिसते.

पण सोराटूरच्या ह्या भीषण रणकंदनात भिल्लम राजा मारला गेला, हे काही संशोधकांचे म्हणणे मात्र खरे नाही.

११. यादव व होयसळ ह्यांच्या धारवाड जिल्ह्यात सापडलेल्या शिलालेखांचा विचार करता, हे युद्ध इ. स. ११९० च्या जानेवारीपासून डिसेंबरपर्यंत केव्हा तरी घडले असावे असे वाटते.[१०]

ह्या युद्धात यादवांचा पराभव झाला खरा. पण होयसळ सैन्याचीही अपरिमित हानी झाली. म्हणूनच हेमाद्रीच्या राजप्रशस्तीत भिल्लमाने होयसळ नृपतीला पंगू बनविले, असे वर्णन येते. (कल्याणश्रियमप्यवाप्य विदधे यो होसलेश व्यसुम्) होयसळांच्या महत्त्वाकांक्षेला ह्यामुळे

९. Dr. O. P. Verma, Yadavas and their times, page 60. १०. Shrinivas Ritti, The Seunas, page 84.

भयानक हादरा बसला. यादवांनाही आपला सत्ताविस्तार आवरता घ्यावा लागला. पण तरीही यादव सैन्य विजापूर, धारवाड या कानडी प्रदेशात ठाण मांडून राहिलेच आणि कल्याण ही चालुक्य राजनगरी यादवांचे अधिकारात राहिली.

१२. भिल्लमाने उत्तरेतही काही विजय मिळविले असावेत. त्याच्या मृत्तिगे शिलालेखात त्याने मालव, वराळ (वऱ्हाड, विदर्भ), कलिंग, गौड, पांचाल, अंग, वंग, नेपाल इत्यादि देशांतील राजांचे पराभव केले, असे म्हटले आहे. हे वर्णन अतिरंजित आहे, हे स्पष्टच दिसते. तरी पण माळव्याचे परमार हे यादवांचे परंपरागत शत्रू त्यांच्या विरुद्ध भिल्लमाने काही विजय मिळविले असावेत. नड्डल (आधुनिक नाडोल, राजस्थान) येथील चाहमानांच्या काही लेखांत त्यांच्या यादवांशी झालेल्या युद्धाचा निर्देश आढळतो.

१३. असा हा भिल्लमाचा पराक्रम आलेख आहे. यादव घराण्याची सार्वभौम सत्ता उद्घोषित करणारा तो पहिला राजा आहे. या घोषणेनंतर त्याने आपली राजधानी देवगिरी ह्या ठिकाणी आणली, असे म्हटले आहे. हेमाद्रीच्या राजप्रशस्तीतील-

**स दण्डिकामण्डलमंडयित्रीमकंपसंपत्प्रभवैर्विलासैः।**

**चक्रे पुरं देवगिरिं गिरीशप्रसादसंसादितदिव्यशक्तिः॥**

ह्या श्लोकावरून तसा ग्रह होणे स्वाभाविकही आहे. कृष्णदेव यादवांच्या तासगाव ताम्रपटातही[११] सुरगिरी (देवगिरी) हा दुर्ग भिल्लमाने बांधला, असे म्हटले आहे, पण भिल्लमाचे आयुष्यच इतके धकाधकीचे होते की, देवगिरीदुर्गसारखे प्रचंड वास्तुकाम त्याचे हातून घडले असावे, हे मनाला पटत नाही. हेमाद्रीच्या राजप्रशस्तीतील व कृष्णदेव यादवाच्या तासगांव ताम्रपटातील हे उल्लेख उत्तरकालीन आहेत तेव्हा त्यांचेवर विश्वास ठेवणे योग्य नाही.

देवगिरीचा प्रचंड दुर्ग वेरूळच्या लेण्यापासून अगदी जवळ (पाच मैल अंतरावर) आहे. वेरूळच्या कैलास लेण्याप्रमाणेच इथेही खडक फोडून काढून तो अभेद्य करण्याचा प्रयत्न केला आहे.

यावरून हा दुर्ग बहुधा यादवपूर्वकालीन व राष्ट्रकूटकाळतील असावा, असे वाटते. भिल्लमाने दक्षिणेतील विजयानंतर आपल्या वास्तव्यासाठी हा दुर्ग निवडला असावा, इतकेच. त्यामुळेच भिल्लमाच्या काळापासून देवगिरीच्या सभोवती जे नगर वसले, त्यास 'कटक' (राजधानी, सैन्याचा तळ) या नावाने ओळखीत. महानुभाव वाङ्मयात देवगिरी दुर्गाच्या पायथ्याच्या 'कटक' नगराचे उल्लेख वारंवार येतात. (चक्रधराचे एक शिष्य लखुदेवोबा गोदानासाठी 'कटका' गेले. किंवा 'कटकी' महादेवरायाचे श्राद्ध होते. चक्रधरांची एक देमती नावाची शिष्या 'कटक'ची राहणारी असल्यामुळे तिला 'कटक कार देमती' असे म्हणत) या कटकचेच पुढे कटकी>खटकी> खडकी असा अपभ्रंश होत औरंगाबादचे प्राचीन नाव 'खडकी' हे

११. E. I. Vol. XXVII, p. 208-316, वाचन ओळ १६-१७.

सिद्ध झाले. मुसलमान इतिहासकार या नावाची 'खडकी म्हणजे दक्षिण भारताची खिडकी' असे व्युत्पत्ती सागंतात, त्यात तथ्य नाही.

पण भिल्लमाचे खरे सैनिकी कर्तृत्व ज्या भागात घडले. त्या उत्तर कर्नाटक भागात (विजापूर, धारवाड व बिदर जिल्हा) त्याची दुसरी सैनिकी राजधानी होती. त्याच्या निंबाळ शिलालेखात निंबहूर (निंबाळ) येथील कोटीशंकरदेव ह्या देवतेच्या देवस्थानास दिलेली दाने राजा 'तडवलगे' ह्या स्थानावरून राज्य करीत असता दिली गेलेली आहेत. त्याच्या शक ११११च्या मुत्तिगे शिलालेखातही 'तडवल्लगे' ही त्याची राजधानी (नेलेविडु=तात्पुरती वास्तव्याची जागा) होती, असा उल्लेख आहे. 'तडवल्लगे' म्हणजेच विजापूरच्या उत्तरेस सोळा मैलांवर असलेला आधुनिक तडवलगा हे गांव होय.

भिल्लमाने स्वतःभोवती सैनिकांचे व पराक्रमी सामंतांचे एक वलयच निर्माण केले. त्यातील काहींची नावे अशी :

अ . महामंडलेश्वर बंदरस किंवा बंदुगि. हा तार्दावाडी १००० चा शासक होता. तो विजयपूर (आधुनिक विजापूर) येथील धनसंग्रह ह्याचे कुलातील असून, त्याचे कुलनाम शिलाहार असे होते. 'जीमृतवाहनान्वयजातं' आणि 'कोपणपुरवराधीश्वर' ह्या त्याच्या पदव्या होत्या.

ब. याच कुळातील डांकरस मल्लिदेव हाही भिल्लमाचा सामंत होता.

क. कदंब कुळातील बिज्जण तृतीय हा भिल्लमाचा सामंत म्हणून करडकल ३०० या प्रदेशावर मुदुगल्लु (आधुनिक मुदगल) येथून शासन करीत असे, असा उल्लेख त्याच्या करडकल शिलालेखात (ता. लिंगसुगुर, जि. रायचूर) सापडतो.

ड. भिल्लमाच्या निंबाळ शिलालेखात त्याचा महाप्रधान मायिदेव ह्याचा उल्लेख येतो.

इ. तारिकाडु येथून शासन करणाऱ्या लक्ष्मीदेव दंडनायकाचा उल्लेख भिल्लमाच्या पिरापूर शिलालेखात येतो. 'मगरमुरारी' हे त्याचे बिरूद होते.

फ. भिल्लमाच्या हिप्परगी शिलालेखात त्याचा पट्टसाहनी (पट्टसाधनिक=प्रमुख सैनिकी अधिकारी) पेयिय साहणि व त्याचे हाताखालील अधिकारी मल्लसाहणि यांचा उल्लेख येतो.

ग. याशिवाय देवरस व वाच किंवा भास्कर (अण्णिगेरे शिलालेख) वज्ररस, जल्ह हेही भिल्लमाचे अधिकारी होतेच.

ह. पण भिल्लमाचे साम्राज्यप्राप्तीत ज्याचा वाटा सर्वांत मोठा आहे असा व भिल्लमाचा केवळ उजवा हातच असा जैत्रपाल ( जैत्रसिंह) हा होयसळांविरुद्ध लक्कुंडी दुर्गाजवळ यादव सैन्याचे प्राणपणाने रक्षण करता करता मारला गेला.

पृथ्वीराज चव्हाणाचा भाट चंदबरदाई ह्याच्या 'पृथ्वीराज रासो' ह्या प्रशस्तीकाव्यात 'देवगिरीचा राजा भानू ह्याची कन्या शशिव्रता व पृथ्वीराज' ह्यांच्या प्रेमप्रसंगाचे वर्णन आहे. भाटांनी केलेली पृथ्वीराजाची वर्णने ऐकून शशिव्रता त्याच्या प्रेमात पडली, पण 'भानूने' तिचे लग्न

जयचंद्र गाहडवालचा (कनोजचा राजा) पुत्र वीरचंद्राशी ठरविले. लग्नाच्या घटिकेस पृथ्वीराजाने देवगिरीवर धाड घालून शशिव्रतेला पळूवन नेले, अशी कथा आहे. डॉ. अळतेकरांनी भानू व भिल्लम ह्यांना एकच ठरविण्याचा प्रयत्न केला आहे. पण ह्या कथेत काही ऐतिहासीक तथ्य असेल, असे वाटत नाही. एकतर भानू व भिल्लम ही नावे भिन्न आहेत. कदाचित् हा भानू मध्यभारतातील झांशीजवळील देवगढ येथील एखादा सामान्य सामंत असावा. कारण ह्या देवगढचे प्राचीन नाव देवगिरी असेच होते.

आपले सामंतपद टाकून देऊन सार्वभौमत्व धारण करणारा भिल्लम हा यादवकुळातील पहिला राजा आहे. त्याने स्वीकारलेल्या 'महाराजाधिराज, परमेश्वर, परमभट्टारक, यादवकुल कमलकलिकाविकासभास्कर', अरिरायउरशल्य, यादवनारायण चक्रवर्ती' ह्या बिरुदावली अन्वर्थक नाहीत, असे कोण म्हणेल ? 'रायजगज्झंप' ह्या त्याच्या बिरुदाचा अर्थ शत्रूंच्या नगराची तटबंदी ओलांडून जाणारा असा होतो. कोकणातील शिलाहारांनाही 'रायजगझंप, त्रिजगज्झंपझंपडाचार्य' अशी बिरूदे लावलेली आढळतात. रायजगझंज्प हे बिरुद कृष्णदेव यादवाच्या कान्हेगाव शिलालेखातही त्याला लावलेले आढळते. रामचंद्रदेव यादवाचे अणजुर येथील शिलाशासनात भिल्लमाला 'अवनीवनितामौलिने-पथ्यरत्न' म्हणून गौरविले आहे.

सिन्नर येथील भिल्लम मठ ही वास्तू भिल्लमानेच बांधली असावी असा तर्क करता येतो. लीळाचरित्रात-श्री चक्रधर या मठात उतरले होते, असा 'भीलमठीये अवस्थानः भीलमठीये आंतु देवतेपूर्वे उत्तराभिमुख आसनः' इथेच महादेवराय यादवाने त्यांची भेट घेण्याचा प्रयत्न केला. 'महादेवोरावो ठाणेया कटकै गेला होताः तो सिंनरा आला : हे नगर बरवे : तरि एथ गोसावी असति' म्हणौनि पाल्हाडांगेयाते पार्हो धाडिले.'[१२] इत्यादि. केशिराजा रत्नमाळा स्तोत्रात लीळेविषयी पुढील श्लोक आला आहे.

एळापुराद्‌गतो राजा प्रजासंस्थामिषेण वै
स्वामिनो दर्शनोत्कंठ्या यथा धनगतः पुमान्
तथा राजा गतो दिव्यं नगरं श्रीनिकेतनम्
ततश्चक्रधरं श्रुत्वा स्वपुरे पौर्वजे मठे ।।

इथे भिल्लमठाला महादेव यादवाच्या पूर्वजांचा मठ असे स्वच्छच म्हटले आहे.

भिल्लमाचा पुत्र जैतुगि प्रथम ह्याचा कडलेवाड शिलालेख शके ११९४ चा (इ. स. ११९२) आहे. तेव्हा यापूर्वी (डिसेंबर ११९२पूर्वी) भिल्लमाचा अंत झाला असावा. पण भिल्लम व जैतुगि प्रथम ह्यांच्या शिलालेखांचा नीटसा मेळ बसत नाही. त्याविषयीचे विवेचन पुढील प्रकरणात पाहावे.

****

१२. डॉ. तुळपुळे शं. गो., लीळाचरित्र पूर्वार्ध भाग १, लीळा ८९.

# जैतुगी प्रथम

१) जैतुगी प्रथम[१] ह्याच्या प्रथम राज्यवर्षाबद्दल बरेच घोटाळे आहेत. त्याचेही सर्व उपलब्ध शिलालेख विजापूर जिल्ह्यातच सापडले आहेत. त्याच्या राज्यकालाचा प्रारंभ कधी झाला व भिल्लम पाचवा ह्याचा राज्यकाल केव्हा संपला हे सांगणे कठीण आहे. त्याचा विजापूर शिलालेख नल संवत्सर पुण्य शुद्ध चतुर्थीचा असून, तो त्याच्या सहाव्या राज्यवर्षाचा आहे, असे म्हटले आहे. ही मिती इंग्रजी गणनेनुसार २५ डिसेंबर ११९५ अशी येईल. अर्थात् जैतुगी प्रथमचे पहिले राज्यवर्ष डिसेंबर ११९१ इ. स. हे येईल. पण आपणांस पुरतेपणे ठाऊक आहे की, भिल्लम पाचवा हा. इ. स. ११९२ पर्यंत तरी राज्यावर होता. (कारण त्याचा हिप्परगी शिलालेख शक १११५, इ. स. ११९२ चा आहे.) अशा अवस्थेत ११९१ ते ११९३ या दोन वर्षांत यादव राज्यावर कोण होते ?

यांचा मेळ घालण्याचे प्रयत्न संशोधकांनी केले आहेत. डॉ. फ्लीट, डॉ. भांडारकर यांनी असे सुचविले आहे की भिल्लम पाचवा हा वृद्ध झाला असता त्याने आपल्या मुलाला प्रशासकीय कामाचा अनुभव मिळावा म्हणून त्याचेवर शासनाचा काही भार टाकला असावा व म्हणूनच पितापुत्रांचे राज्यवर्षांचा परस्पर मेळ बसत नाही व काही शिलालेखांत शासक म्हणून भिल्लमाचे तर काहीत जैतुगीचे नाव येते. याच मताचा अनुवाद डॉ. वर्मा, डॉ. रित्ति व इतर विद्वानांनी केला आहे.

वरवर पाहाता वरील मत कुणासही पटण्यासारखे वाटते. पण थोडा विचार करताच त्यात अनेक विसंगती दिसू लागतात. त्या अशा-

१. भिल्लमाचे बहुसंख्य व जैतुगीचे बहुतेक सर्व शिलालेख हे एकाच विजापूर जिल्ह्यात सापडलेले आहेत. एकाच जिल्ह्यात सापडणाऱ्या एकाच वंशातील पितापुत्रांच्या शिलालेखात काळानिर्देशाचा मेळ नसावा, ही गोष्ट मनाला न पटण्यासारखी आहे.

२. भिल्लमाने जर वृद्धपणी आपल्या राज्याचा भार जैतुगीवर सोपवला असेल तर असे करण्यासाठी त्याला दोन पर्याय मिळू शकतात.

अ. तो जैतुगीची नियुक्ती एखाद्या प्रदेशाचा महामंडलेश्वर म्हणून करील, किंवा

ब. तो जैतुगीला त्या प्रदेशात पूर्ण शासनाधिकार देऊन टाकील. अशा अवस्थेत पहिला पर्याय जर भिल्लमाने स्वीकारला असेल तर जैतुगीचा उल्लेख त्यांच्या सर्व शिलालेखांतून महामंडलेश्वर या पदवीने यावयास पाहिजे. पण जैतुगीचा महामंडलेश्वर असा उल्लेख असलेला एकही शिलालेख उपलब्ध नाही. तेव्हा भिल्लमाने त्याला एखाद्या प्रदेशाचा पूर्ण शासनाधिकारी नेमले असावे हा दुसराच पर्याय उरतो. पण मग त्या अवस्थेत ज्या प्रदेशावर जैतुगी सर्वाधिकारी

---

१. डॉ. श्रीनिवास रित्ति ह्यालाच जैतुगी द्वितीय म्हणतात. (The Seunas p. 90) पण तो त्यांच्या ग्रंथातील मुद्रणदोष असावा, असे वाटते.

म्हणून शासन करतो आहे त्याच प्रदेशात जैतुगीचे शासन चालू असता भिल्लमाचे उल्लेख शिलालेखात शासक म्हणून यावयास नकोत. म्हणजे एकाच प्रदेशात भिल्लमाचेही राज्य व त्याच प्रदेशात त्याच काळात जैतुगीचेही राज्य असा प्रकार व्हावयास नको.

३. शिवाय भारतीय कल्पनेप्रमाणे सार्वभौमसत्ता (नृपतंत्र राज्याचे संबंधात) वाटली जाऊ शकत नाही. राजपुत्राने राज्यातील एखाद्या प्रदेशाच्या प्रशासनाचा भार वाहणे वेगळे व त्याने त्या प्रदेशावर सार्वभौम रितीने राज्य करणे वेगळे.

अशा अवस्थेत भिल्लम पाचवा आणि जैतुगी प्रथम ह्यांच्या राज्यवर्षात हे जो घोटाळे होतात, ह्याचा मेळ कसा लावायचा हा प्रश्न उरतोच. आमच्या मते याची उकल पुढीलप्रमाणे करता येते.

प्राचीन काळी मंदिरास व ब्राह्मणास जी दाने दिली जात, ती एखाद्या गावी राजांच्या सैन्याचा तळ इत्यादि असता तात्पुरती करून दिली जात. पुढे राजा राजधानीला परतल्यानंतर त्या दानाचा पुनर्विचार होऊन ते दानपत्र जीर्ण होऊन नष्ट होण्याची भीती असल्यामुळे ते पुढे केव्हा तरी ताम्रपटावर अथवा शिलापट्टावर उतरविले जात असे. याची असंख्य उदाहरणे आपणास देता येतील. उदाहरणार्थ, लीळाचरित्र एकांकातील ९ क्रमांकाच्या लीळेतील 'वैजाए राणीयां वैजनाथाचे देऊळ करविले : ब्राह्मणा वृत्ती दिधलीया : सारंग पंडिताते बोलाऊ धाडिलें : सारंगपंडित कटका गेले : वृत्ति जाली : काळाक्षेरी वातले : शासनी नांव घालावे तव ज्वरू आला : ' हे वर्णन पहा. इथे दानपत्र प्रथम तात्पुरते दिले व नंतर ते शाश्वत स्वरूपात करून देण्याचा राणीचा विचार होता, असे स्पष्ट दिसते. किंवा सोलापूर जिल्ह्यातील मार्डी येथील शिलालेखांचे उदाहरण पहा. या लेखांचे संपादक श्री. ग. ह. खरे लिहितात-"हा लेख वस्तुतः कोणत्याही एका राज्याच्या कारकिर्दीतील नाही-योगेश्वर देवाची शके ११०२ मध्ये किंवा त्यापूर्वी स्थापना झाल्यापासून ते ११३४ पर्यंत निरनिराळ्या लोकांनी या देवाला जी दाने दिली, त्या सर्वांचे एकत्र लेखन शक ११३४ मध्ये किंवा नंतर केलेले आहे. लेखन एकदम केले गेले आहे, ही गोष्ट येथून तेथून अक्षरांचे वळण एकच आहे, ह्यावरून समजून येईल. अशा तऱ्हेने पूर्वी लेखन चालत असे हे पंढरपूरच्या ८४ च्या लेखावरूनही दिसून येण्यासारखे आहे."[२]

श्रवणबेळगोळ येथील चामुंडराय व गंगराय ह्यांचा शिलालेख[३] किंवा अंबाजोगाई येथील शके ११५०च्या खोलेश्वराच्या लेखावरूनही[४] वरील गोष्ट स्पष्ट होईल.

अशा अवस्थेत प्रत्यक्ष दान दिल्याच्या घटनेनंतर बराच काळ (मार्डी लेखात तर तो बत्तीस

२. खरे ग. ह., दक्षिणच्या मध्ययुगीन इतिहासाची साधने, खंड १ला, पृ. ४७. ३. तुळपुळे शं. गो., प्राचीन मराठी कोरीव लेख, क्रमांक ४. ४. तुळपुळे शं. गो., प्राचीन मराठी कोरीव लेख, प्रस्तावना पृष्ठ ९४.

वर्षांपेक्षा जास्त आहे) उलटून गेल्यानंतर ते दानपत्र शिलापट्टावर लिपीबद्ध केले जात असता त्यात तिथी, वार, तिथीचे स्पर्श, मोक्ष राजांच्या बिरूदावली, त्यांची राज्यवर्षे यात चुका होणे साहजिकच असे. स्वतः जैतुगी प्रथम ह्याच्या नाड (खुर्द) येथील लेखात पिंगल संवत्सर हे त्याचे दुसरे राज्यवर्ष असल्याचे म्हटले आहे. पण हा आकडा २ नसून, तो ७ असावा, असे स्वतः डॉ. रित्ति ह्यांचेच म्हणणे आहे. कारण २ हा अंक गृहीत धरल्यास जैतुगीच्या राज्याचा आरंभकाल इ. स. ११९६ असा होतो.[५]

वरील सर्व विवेचनाचा इत्यर्थ असा की, भिल्लम पाचवा ह्याने आपल्या वृद्धपणी राज्याचा भार जैतुगीवर टाकला असेच गृहीत धरण्याची आवश्यकता नाही. इ. स. ११९२ च्या आसपास जैतुगी हा यादवसत्तेचा अधिकारी झाला. ह्याची इतर नावे जैत्रसिंह किंवा जैत्रपाल अशीही मिळतात. पण सोराटूरच्या भीषण नरसंहारात मारला गेला, तो जैत्रसिंह भिल्लमाचा सेनापती होता व प्रस्तुत जैत्रसिंह किंवा जैतुगी प्रथम हे एक नव्हते हे उघडच आहे.

२. जैतुगी समोर पहिला प्रश्न होता, तो होयसळांच्या सत्तेचा. सोराटूरच्या भीषण युद्धानंतर उभय पक्षांत युद्ध करण्याचे सामर्थ्य राहिले नव्हते, हे निश्चित. या युद्धात यादव सैन्याची अपरिमित हानी झाली. तेव्हा विजापूर-धारवाड या प्रदेशांचे रक्षण करणे ही अगदी महत्त्वाची गोष्ट होती. यामुळे जैतुगीने या प्रदेशावरच आपले लक्ष केंद्रित केल्याचे आपणास दिसते. त्याचे सर्वच शिलालेख याच प्रदेशात सापडले आहेत. त्यावरून या प्रदेशावरील त्याचे स्वामित्व आपणास लक्षात येते. त्याचा एकही शिलालेख अद्याप महाराष्ट्रात सापडलेला नाही. त्याच्या एका शिलालेखांत त्याची राजधानी देवगिरी असल्याचा उल्लेख आहे. पण तो देवगिरी भागात फारसा राहिला नसावा, असे वाटते. लक्कुंडी ह्या महत्त्वाच्या दुर्गासाठी मात्र जैतुगी व वीरबल्लाळदेव द्वितीय ह्यांच्यात झटापटी चालूच राहिल्या असे दिसते. लक्कुंडीजवळील कोलीगुंडा येथील शिलालेखात बल्लाळाने हा दुर्ग जैतुगीकडून जिंकून घेतला, असे वर्णन आहे. तरी पण जैतुगीचा धाक इतका मोठा होता की, बल्लाळाला लक्कुंडी, हुलीगेरे या प्रदेशात सतत तळ ठोकून राहावे लागले.[६] थोडक्यात यादव व होयसळ राज्यांची सीमा कृष्णा मलप्रभा हीच राहिली.

३. भिल्लम पाचवा हा चालुक्य राजसत्तेचा नाश करून आपल्या साम्राज्यस्थापनेची मुहूर्तमेढ रोवीत असताच वारंगलचे काकतीय राजे प्रबळ होऊ लागले होते. चालुक्यांच्या अधःपाताचे वेळीच काकतीयांनीही आपली सार्वभौम सत्ता उद्घोषित केली. या वंशातील रुद्रदेव हा पराक्रमी राजा ही घोषणा करणारा प्रथम शासक होता. त्याचा राज्यकाल इ. स. ११५०-

५. Dr. Shrinivas Ritti, The Seunas, page 91. ६. Dr. Shriniwas Ritti, The Seunas, page 92.

११९६ असा आहे. त्याच्या अनमकोंडा शिलालेखात[७] त्याच्या पराक्रमी कृत्यांचे वर्णन आले आहे. अशा अवस्थेत यादव व काकतीय यांच्यात संघर्ष न होता, तरच नवल. या दोन सत्तेतील युद्ध फार भीषण स्वरूपात लढले गेले असले पाहिजे. पण आपणांस त्याचे पूर्ण विवरण दुर्दैवाने उपलब्ध नाही. तरी या युद्धाची काव्यमय वर्णने सिंघणदेव द्वितीय ह्याच्या काळच्या बहाळ शिलालेखातून, महादेव यादवाच्या काळेगाव ताम्रपटातून व रामचंद्रदेव ह्याच्या पैठण ताम्रपटातून आपणास प्राप्त होतात. हेमाद्रीच्या राजप्रशस्तीतील-

**दीक्षित्वा रणरंगदेवयजने प्रोदस्तशस्त्रस्रुवः**
**श्रोणिभिर्जगतीपतीन्हुतवता येन प्रतापानले**
**तिल्लंगाधिपतेः पशोर्विशसने रौद्रस्य रौद्राकृते**
**कृत्वा पूरुषमेधयज्ञविधिना लब्धस्त्रिलोकीजयः ॥**

या रूपकात्मक श्लोकाचा अर्थ असा की, समररूपी यज्ञात जैतुगीने तिल्लंग देशाचा अधिपती 'रौद्र' ह्याची आहुती दिली. किंवा त्यास ठार मारले.[८] हा ठार मारला गेलेला राजा म्हणजे काकतीय नृपती व रुद्र हाच होय. त्याचा शेवटचा ज्ञात शिलालेख इ. स. ११९६ चा आहे. त्याअर्थी यापूर्वी हे युद्ध झाले असावे. या युद्धात काकतीय नरेश रुद्र हा मारला गेल्यामुळे त्याच्या राज्यात फार दुर्दैवाचे वातावरण निर्माण झाले. काकतीय रुद्राचा सेनापती रेचेर्लरुद्र ह्याच्या पालमपेट शिलालेखात या विनाशाचे प्रत्ययकारी चित्र रेखाटलेले आपणास दिसून येईल. काकतीयांच्या सामंतांनी स्वतंत्र होण्याचा प्रयत्न सुरू केला व काकतीय राज्यलक्ष्मी लुप्त होण्याचाच प्रसंग ओढवला.

रुद्रदेवाच्या मृत्यूनंतरही काकतीयांची दुर्दशा संपली नाही. रुद्रानंतर त्याचा धाकटा भाऊ महादेव हा राज्यावर आला. 'प्रतापचरित्रमु' ह्या तेलुगु ग्रंथातून अशी माहिती मिळते की, त्याने आपल्या थोरल्या भावाच्या वधाचा सूड घेण्यासाठी यादव साम्राज्यावर आक्रमण करून शेवटी देवगिरी दुर्गालाच वेढा घातला. काकतीय नृपतीच्या शिलालेखातूनही महादेवाने देवगिरीला वेढा घातल्याची वर्णने आढळतात. पण याच वेढ्यात जैतुगीने त्याला ठार मारले आणि त्याचा पुत्र गणपती ह्याला बंदी बनविले. रामचंद्रदेव यादवाचे पैठण ताम्रपटात ह्या घटनेचे वर्णन पुढील दोन श्लोकांत केले आहे.

**य संख्ये त्रिकलिंगराजमवधीद् विद्वेवीविमंतिनी**
**नेत्राभःप्रसरतप्रगल्भलहरीनिर्वाणवैरानलः**

---

७. I. A. Vol. XI, page 9. ८. यातील 'रौद्र' या शब्दाचा अर्थ रुद्राचा पुत्र अथवा भाऊ असा घेऊन काही संशोधक काकतीय रुद्राचा पुत्र किंवा धाकटा बंधू महादेव हा युद्धात मारला गेला असावा, असा तर्क करतात पण त्यात तथ्य नाही.

यश्चैतस्य समस्तराज्यमहरन्मत्तेभकुंभस्थली
कूजत्षट्पटपदगीत्वैभवभरं जातस्ततो जैतुगिः ॥
कारागारत्समानीय करुणवरुणालयः
प्रियवद्वास्यमकरोत् क्षितेर्गणपतिं पतिम् ॥

याचाच अर्थ असा की जैतुगीने त्रिकलिंग देशाचा राजा (काकतीय रूद्र) ह्याला ठार मारले व मृदुभाषणी गणपतीची कारागारातून मुक्तता करून त्याची आंध्रसिंहासनावर स्थापना केली.[९]

यावरून गणपतीला पकडून बंदिवासात टाकणारा व नंतर दयार्द्र अंतःकरणाने त्याची सुटका करणारा राजा जैतुगी होता, यात शंका राहात नाही.[१०]

दुर्दैवाच्या या चक्रात काकतीय राज्य असता त्यांचा सेनापती रेचेर्ल रुद्र ह्याने मात्र आत्यंतिक स्वामिनिष्ठेचा परिचय दिला. रुद्र व महादेव ह्यांच्या अंतामुळे गणपती यादवांच्या कारागृहातून सुटून येईपर्यंत त्याने काकतीयांचे राज्य संभाळले. व विद्रोही सामंतांना दडपून टाकले. म्हणून त्याच्या पालमपेट शिलालेखात त्याला काकतीयराज्यधौरेय व काकतीयराज्यसमर्थ ह्या पदव्या लावल्या आहेत. त्या अन्वर्थकच आहेत, यात शंका नाही.

इ. स. ११९८ च्या आसपास गणपती यादवांच्या कारागृहातून सुटला असावा. त्याला बंदी बनवून नंतर त्याची सुटका करून यादवांनी काकतीयांवर निःसंशयपणे प्रभुत्व मिळविले. नाहीतर आंध्र, कलिंग, यांच्या सारख्या दूरच्या प्रदेशावर अधिराज्य स्थापन करणे, यादवांनाही शक्य नव्हते. शिवाय काकतीयांसारख्या पराक्रमी वंशाशी शत्रुत्व असण्यापेक्षा मित्रत्वच असणे श्रेयस्कर असेही यादवांना वाटले असावे.

---

९. सिंघणदेव द्वितीय ह्याच्या वहाळ शिलालेखतही याच आशयाचे वर्णन येते. १०. परंतु गणपतीला बंदीवासात केव्हा घातले गेले व त्यांची सुटका कधी झाली याबद्दल विद्वानांत एकवाक्यता नाही. डॉ. भांडारकर ह्यांचे मते, स्वतः काकतीय रुद्रदेव ह्यानेच आपल्या पुतण्याला-गणपतीला बंदीवासात घातले, असे आहे. पण त्यांनी ह्यासाठी कसलाच पुरावा दिलेला नाही. श्री. दास यांचे मते, गणपती आपल्या चुलत्याच्या-रुद्रदेवाच्या-राज्यकाळतच शासनाचा भार सांभाळत असे. त्यामुळे तो अतिशयच प्रबळ झाला व त्याने शेवटी आपल्या पित्याविरुद्ध-महादेवाविरुद्ध-राज्यावर बसण्याचा प्रयत्न सुरू केला. तेव्हा महादेवाने पकडून त्यास बंदीवासात घातले व तेथून त्याची जैतुगीने सुटका केली. पण हे मत मनाला न पटण्यासारखे आहे. डॉ. वर्मांनी असे दाखवून दिले आहे. की, गणपती कितीही प्रबळ झाला, तरी तो स्वतःच्या जन्मदात्याविरुद्ध विद्रोह करील, हे शक्य वाटत नाही. या पार्श्वभूमीवरून डॉ. रामाराव ह्यांचे मत असे की, रुद्राच्या वधाचा सूड घेण्यासाठी महादेवाने देवगिरीवर आक्रमण केले. समागमे पुत्र गणपतीही आला. युद्धात महादेव रणांगणावर कामास आला व गणपती धरला जाऊन यादवांचा बंदी बनला. डॉक्टरमहाशयांचे हे विवेचन पटण्यासारखे आहे. गणपती देवगिरीच्या युद्धात बंदी झाला असेल अथवा रुद्र व महादेव त्यांच्या मृत्युनंतर काकतीय साम्राज्याची जी दुर्दशा झाली ती सावरता सावरता सीमावर्ती प्रदेशाची पहाणी इत्यादि करीत असता यादव सैन्याचे हाती सापडला असेल. (पहा A. Ramarao, Kakatlyas of Warangal, page 59-60.

यावेळी गुजराथ आणि माळवा या ठिकाणची अशांत राजकीय परिस्थिती जैतुगीच्या पराक्रमाला आव्हान देईल, अशीच होती. इ. स. ११९७ च्या आसपास महंमद घोरी याने गुजराथचा चालुक्य राजा भीम द्वितीय ह्याच्यावर आक्रमण केले. भीमदेवाने अबू पर्वताचे पायथ्याशी महंमद घोरीला अडवायचा प्रयत्न केला. या युद्धात चालुक्यांचा पराक्रमी सेनापती कुमारपाल मारला गेला. भीमदेव मात्र जीव वाचवून निसटून गेला. अनहिलवाडपाटण ही चालुक्य राजधानी तुर्कांच्या हाती सापडली. गुजराथच्या चालुक्य वैभवावर भीषण कुठाराघात झाला.

माळव्याचे परमार हे गुजराथच्या चालुक्यांचे परंपरागत वैरी. ते चालुक्यांच्या या दुर्दशेचा लाभ न घेते तरच नवल. माळव्याचा परमारनृपती सुभटवर्मा याने लगेच लाटच्या सिंह किंवा सिंहडीविरुद्ध सैनिकी अभियान काढले. हा सिंह गुजराथच्या चालुक्यांचा एक लहानसा सामंत होता. परमारांच्या प्रबळ सेनासागरापुढे त्याचे काय चालणार. परमारांनी लाट प्रदेश जिंकून आपल्या राज्याला जोडून टाकला. सिंहाने आता परमारांचे मांडलिकत्व पत्करले.

सुभटवर्मा आता गुजराथच्या चालुक्यांवर चालला. पण भीमदेव द्वितीय हा चालुक्य राजा जसा पराक्रमी तसा राजकारणधुरंधरही होता. मेरूतुंगाच्या प्रबंधचिंतामणीत असा उल्लेख येतो की माळव्याचा राजा सोहडा (सुभटवर्मा) ह्याने अनहिलवाडपाटणचा पूर्ण विध्वंस करण्याचे ठरविले. पण भीमाचे दोन मंत्री सुभटवर्म्याला भेटले व एक गाथा म्हणून त्यांनी मालवनृपतीला या आक्रमणापासून परावृत्त केले.[११]

सुभटवर्मा गुजराथेतील आक्रमणात गुंतला असताच जैतुगीने परमारांविरुद्धच्या आपल्या जुन्या वैराला स्मरून माळव्यावर धाड घातली असावी. यादव सैन्य सेनापती सहदेव दंडनाथ ह्याच्या नेतृत्वाखाली माळव्यात शिरले व त्यांनी मालव (व कदाचित् लाट) प्रदेशातही काही लुटालूट केली असावी. म्हणूनच दंडनायक सहदेव याच्या मानगोलीदेऊर शिलालेखात त्याने मालव, गुर्जर, लाट, पांड्य, चोळ, गौड, पांचाळ, नेपाळ तुरुष्क इत्यादि नृपतींवर विजय मिळविले, असे वर्णन येते.[१२]

यांपैकी मालव, गुर्जर व लाट या प्रदेशातील सत्तांबरोबर यादवांचा संघर्ष झाला असण्याची शक्यता आपण वर पाहिली आहेच. इतर राजांच्या विरुद्धच्या विजयांचे वर्णन अतिशयोक्त व पारंपरीक आहे. प्राचीन काळच्या भाटांची ही पद्धतच होती. ते अमरकोश किंवा मेदिनी कोश ह्यांसारखा एखादा कोश (Lexicograph) हाताशी धरीत व त्यातून जमेल तेवढ्या प्रदेशांची नावे आपल्या आश्रयदात्या राजाने पराभूत केलेल्या राजांच्या नावांच्या मालिकेत जोडून देत.

चोळ सिंहासनावर ह्यावेळी कुलोत्तुंग तिसरा हा प्रबळ पराक्रमी राजा होता. त्याच्याविरुद्ध जैतुगीने सैनिकी अभियान काढले असण्याची शक्यता वाटत नाही. त्याच्या इतर विजयांचेही वर्णन

---

**११. प्रबंधचिंतामणी, पृ. १५४.   १२. E. I. Vol. V, p. 28-31.**

असेच अतिरंजित आहे.

पण जैतुगीदेव हा यादववंशातील एक महत्त्वाचा शासक होता. भिल्लम पाचवा ह्याने कल्याणच्या चालुक्य सत्तेचा नाश करून आपले सार्वभौम साम्राज्य घोषित केले, तर जैतुगीने आपल्या पित्याने मिळविलेले हे साम्राज्य नीट सांभाळून त्यात थोडीशी भरच घातली. होयसळांकडून यादवांचा भीषण पराभव झाल्यावर देखील त्याने किसुकाड, बेलबोळ (रायचूर-गदग-धारवाड प्रदेश) ह्या प्रदेशावरील आपला दरारा कमी होऊ दिला नाही. उलट त्यामुळे होयसळ नृपती बल्लाळदेव द्वितीय ह्याला लक्कुंडिदुर्गाच्या आसपास वास्तव्यासाठी यावे लागे, हे आपण वर पाहिलेच. त्याचा एक अधिकारी सोयिदेव हा लक्कुंडी सोराटूर, गदग भागांवर सतत लक्ष ठेवीत असे व म्हणूनच शिलालेखात त्याचे बिरुद, 'होयसळ दिशापट्ट' असे दिलेले आढळते.[१३] सोराटूरच्या पराभवानंतर वास्तविक नवोदित यादव साम्राज्याच्या नाशाचीच प्रक्रिया सुरू व्हायची, पण जैतुगीने आपल्या बाहुबलाने ती थोपवून धरली.

इतकेच नव्हे तर, काकतीयांच्या वाढत्या सत्तेची कळी उमलण्यापूर्वीच त्याने खुडून टाकली. काकतीयनृपती रूद्रदेव ह्याचा अंत त्याचेच हातून झाला. त्याचा धाकटा महादेव व देवगिरी दुर्गाला वेढा घालुन झुंजत असता आपल्या आवडत्या हत्तिणीच्या गंडस्थळावर मस्तक ठेवून निद्राधीन झाला. तो स्वर्गीय अप्सरांचे वक्षस्थळावरच त्याला जाग आली. असे वर्णन काकतीयांच्याच शिलालेखांतून आढळते.[१४] व ते जैतुगीदेवाच्या विजयाचीच दुदुंभी वाजविणारे आहे. महादेवाचा पुत्र गणपतीदेव ह्याला जैतुगीनें बंदिवासात टाकले व शेवटी त्याच्यावर अनुग्रह करून त्याची मुक्तता केली. गुजराथ-माळव्यातील अस्थिर राजकीय परिस्थितीचा लाभ घेऊन उत्तरेतही यादवसत्तेचा वचक निर्माण केला. भिल्लमाचे अर्जित राज्य त्याने नीट जोपासून वाढविले. ह्यात शंका नाही.

यादव राज्याला आता थोडी स्थिरता प्राप्त झाली होती. यादवांच्या राजसभेत आता विद्वान आणि कलावंतांचा वृंद जमा होऊ लागला. खानदेशातील चाळीसगावजवळील पाटण येथील शिलालेखात एका विद्वान घराण्याची सांगोपांग माहिती आली आहे. हा लेख जैतुगीचा पुत्र महापराक्रमी यादव सम्राट सिंघणदेव द्वितीय ह्याचे राज्यकाळतील असून, त्याची मिती शके ११३२ अशी आहे.[१५] या शिलालेखात सिंघणदेवाचा निकुंभवंशी सामंत सोईदेव व त्याचा पुत्र हेमाडिपंत ह्यांची नावे आली असून त्यांची वंशावळहि दिली आहे. पाटण येथे प्रख्यात ज्योतिषी भास्कराचार्यांचा नातु चंगदेव ह्याने भास्कराचार्यांच्या ग्रंथांच्या अध्ययनासाठी मठ स्थापन केला. या शिलालेखात प्रख्यात ज्योतिषी भास्कराचार्यांचीही वंशावळ दिली आहे. ती अशी-

१३. S. I. I. Vol. XX, Nos. 180-184. १४. E. I. Vol. III, page 101. १५. डॉ. तुळपुळे शां. गों., प्राचीन मराठी कोरीव लेख, क्र. २१ पृ. १०९.

कवीचक्रवर्ती त्रिविक्रम > विद्यापती भास्करभट्ट > सर्वज्ञ गोविंद > प्रभाकर > कवीश्वर महेश्वर > प्रख्यात ज्योतिषी भास्कराचार्य > लक्ष्मीधर > चंगदेव.[१६] यातील भास्कराचार्य प्रथम ह्यास विद्यापती ही पदवी धारचा राजा भोज परमार ह्याने दिली होती. लक्ष्मीधर हा जैतुगीचा सभापंडित असून, त्याला राजसभेत विबुधाग्रणी ही पदवी होती व ही पदवी लक्ष्मीधराला त्याच्या सर्वशास्त्रपारंगतेमुळेच मिळाली होती.[१७] वेदार्थवित्, तार्किकचक्रवर्ती, ह्या त्याच्या इतरही पदव्या होत्या. सारांश जैतुगीदेव प्रथम हा विद्वानांचाहि आश्रयदाता होता. हे स्पष्टच आहे.

भिल्लम पाचवा ह्याच्याप्रमाणेच जैतुगीनेही आपल्या सभोवती विश्वासू सामंताचे एक वलयच निर्माण केले. त्यातील काही नावे अशी-

१. वर आपण लक्कुंडी -सोराटूर भागांवर लक्ष ठेवणाऱ्या सोईदेव सामंताचा उल्लेख केलाच आहे. त्यास 'होयसळदिशापट्ट' ही पदवी होती. याशिवाय कल्याणीच्या चालुक्य सत्तेचे उरलेसुरले अवशेष नष्ट करून त्याने 'चालुक्यराज्यनिर्मूलन' हेही बिरुद धारण केले. तो यादवराज्याचा आधारस्तंभच होता व त्याची 'यादवराज्यसमुद्धरण' ही पदवी त्याला शोभतेही त्याने नंतर सिंघणदेव द्वितीय ह्याचीही सेवा केली. त्याच्या कडलेवाड शिलालेखात त्याच्या राजधानीचे नांव एळमेल (आधुनिक आलमेल तालुका सिंदगी जिल्हा विजापूर) असे दिले आहे.

२. मसयिय साहणि हा जैतुगिचा अधिकारी अंकुलगे ५० या भागावर शासन करीत असे.[१८]

३. जैतुगीच्या हाताखाली तार्दावाडी ह्या महत्त्वाच्या प्रदेशावर शासन करणारा सामंत शंकरदेव हा होता.[१९]

४. केशव ह्या त्याच्या आणखी एक अधिकाऱ्याचे नांव शिलालेखातून प्राप्त होते.

५. पारिससेट्टी ह्या त्याच्या एका सामंताची बिरुदे 'मगरमुरारी' व 'जैत्रपाल देवराज्याभ्युदयकरण' अशी होती.

६. सोईदेव हेमाद्रिदेव ह्या दोन निकुंभवंशी सामंताची नावे पाहिलीच. यातील सोईदेवाने जैतुगीदेव प्रथम व सिंघणदेव द्वितीय ह्या दोहोंचीही सेवा बजावली. हा सोयिदेव आणि क्र. १ मधील 'होयसळदिशापट्ट' हे बिरुद धारण करणारा सोईदेव हे एकच की काय हे सांगता येत नाही.

जैतुगीच्या राणीचे नाव चीलादेवी असे होते. त्याच्यानंतर त्याचा पुत्र सिंघणदेव द्वितीय हा यादव सिंहासनावर बसला.

****

१६. ही वंशावली के. आ. पाध्ये (हेमाद्री उर्फ हेमांडपंत पृ.९१) डॉ. तुळपुळे, प्राचीन मराठी कोरीव लेख, (पृ. १०९), डॉ. वर्मा, (पृ. २५९) ह्या तिघांहि विद्वानांनी चुकीची उद्धृत केली आहे. १७. 'सर्ववेदशास्त्रार्थदक्षोयं इति मत्त्वा' पाटण शिलालेख. १८. Dr. Shrinivas Ritti, The Seunas, p. 95. १९. Ibid.

# सिंघणदेव द्वितीय

१. यादवकुळातील हा सर्वांत पराक्रमी सम्राट जैतुगीदेव प्रथम नंतर राज्यावर आला. त्याच्या दीर्घराज्यकालातील कानडी, मराठी व संस्कृत भाषांतील मिळून जवळजवळ २०० कोरीव लेख उपलब्ध आहेत. (आश्चर्याची गोष्ट अशी की ह्यात हरळाहल्ली व धारवाड हे दोन ताम्रपट असून इतर सर्वच शिलालेख आहेत.) शिवाय हेमाद्रीची राजप्रशस्ती, सोमश्वराची कीर्तिकौमुदी, लेखपंचाशिका इत्यादि ग्रंथातूनही सिंघणाच्या विजयांची वर्णने आपणांस मिळतात. या सर्व साधनांचा अभ्यास करून आपणास सिंघणाच्या शासनकाळाविषयी बरीचशी माहिती मिळविता येते.

**२. सिंघणाचे प्रथम राज्यवर्ष :**

परंतु या सर्व शिलाताम्रशासनातून सिंघणाच्या पहिल्या राज्यवर्षाबद्दल बरेच घोटाळे आहेत. त्याच्या वेगवेगळ्या शिलालेखातून त्याच्या राज्यकालाचे प्रारंभ वर्ष म्हणून वेगवेगळी तेरा वर्षे तरी आपणास प्राप्त होतात. ती अशी-

| | |
|---|---|
| १. हिरेइडगोड व बाडगी येथील शिलालेखांवरून | इ.स.११९८ |
| २. कुमठे, आडकी, पारला, अक्कलकोट, कोकटनुर, देवरबेट्ट, येथील शिलालेखांवरून | इ. स. ११९९ |
| ३. संकानूर, हलकट्ट, विजापूर, बागेहळ्ळी, कंदगल, ताळीकोटी, मुदनूर, संगम सरूर, अक्कलकोट, कुमटगी, लक्कुंडी, बेंनातूर, मारडी येथील शिलालेखांवरून. | इ. स. १२०० |
| ४. इंगलगी, कुमारवाडी येथील शिलालेखांवरून | इ. स. १२०१ |
| ५. मळवल्ली, राणेबेन्नुर येथील शिलालेखांवरून | इ. स. १२०३ |
| ६. अलगूर येथील शिलालेखावरून | इ. स. १२०५ |
| ७. कागिनेली येथील शिलालेखावरून | इ. स. १२०६ |
| ८. उदगत्ती, मल्लुर येथील शिलालेखावरून | इ. स. १२०७ |
| ९. मल्लेहल्ली, हेब्बाळ येथील शिलालेख | इ. स. १२०८ |
| १०. संगुर, कुंदगोल, आलदगेरे, हावेरी, कोल्लुर येथील शिलालेख | इ. स. १२०९ |
| ११. चिक्केरूर, कलकेरी, निलूर, तिळिवल्ली, हिरेकेरूर, मुळगुंद, कुंचुर येथील शिलालेखांवरून | इ. स. १२१० |

१२. बंदलिके, हावेरी कल्लीहळ, नागावी,
देवीहोसूर, गुडिगेरी येथील शिलालेखांवरून इ. स. १२११
१३. हगरिटगे व होसाहळ्ळी येथील शिलालेखांवरून इ. स. १२१३

याप्रमाणे सिंघणाच्या राज्याची विविध प्रारंभवर्षे आपणास प्राप्त होतात. डॉ. श्रीनिवास रित्ति ह्यांनी आपल्या ग्रंथात पृष्ठ १०३-११२ वर सिंघणाच्या अनेक शिलालेखांचे काळ व त्यातून प्राप्त होणारी त्याची विविध राज्यवर्षे ह्याची एक विस्तृत तालिका दिली आहे. पण यावरील त्यांचे विवेचन मात्र बरेचसे अस्पष्ट व अपुरे आहे. त्याचा आपण विचार करू.

३. फ्लीट, भांडारकर, खरे व डॉ. मिराशी इत्यादिकांची मते उद्धृत करून डॉ. वर्मा ह्यांनी सिंघणाच्या राज्यवर्षातील ह्या घोटाळ्याचा उलगडा करण्याचा डॉ. वर्मा ह्यांनी प्रयत्न केला आहे. 'सिंघणाच्या तिथीक्रमात (chronology) जेवढा घोटाळा आहे, तेवढा एकाही प्राचीन भारतीय राजांच्या तिथीक्रमाविषयी नसेल' असे मत प्रदर्शित करून ते पुढीलप्रमाणे आपले विवेचन मांडतात.[१]

१. सिंघणाच्या पुळुंज येथील शिलालेखात त्याच्या नावामागे 'पृथ्वीवल्लभ महाराजाधिराज परमेश्वर' ह्या सार्वभौमत्वसूचक पदव्या असून हा लेख सिद्धार्थी संवत्सर माघ शु. एकादशीचा आहे. सिद्धर्थी संवत्सर शके ११२१ ला येतो. तेव्हा शके ११२१ माघ शु. एकादशी(नोव्हेंबर-डिसेंबर इ. स. १२००) पूर्वी केव्हातरी सिंघण राज्यावर आला असला पाहिजे.

२. त्याच्या मार्डी शिलालेखातील कालनिर्देश 'श्रीशकवर्ष ११३४ चतुस्त्रिंशदुत्तरैका दशशतेसिंघणदेवविजयराज्ये तद्वर्षे आंगिरसंवत्सरे पौषमासि शुक्लपक्षे चतुर्थ्यां शुक्रवारे उत्तरायणसंक्राती' असा आहे. अर्थात् शके ११२१ (११३४-१३=११२१) हेच सिंघणाचे पहिले राज्यवर्ष (अर्थात् इ. स. १२००) येते. इ. स. १२०० मध्ये जैतुगी सत्तेवर होता. तेव्हा सिंघण युवराज राज्यकाराभारात भाग घेत असावा.

३. धारवाड येथील लेखावरून सिंघणाचे पहिले राज्यवर्ष शक ११२९ येथे तर पाटण शिलालेखातून ते शक ११३१ असे येते. अशा रितीने सिंघणाचे प्रथम राज्यवर्षाच्या एकूण तीन तिथ्या प्राप्त होतात. (शक ११२१, ११२९, ११३१.)

४. यानंतर डॉ. वर्मा हे डॉ. मिराशी यांचे मत उद्धृत करतात. ते असे की, शक ११२२ मध्ये सिंघण युवराज होता व पित्याबरोबर शासनात भाग घेत होता. ११२९ मध्ये तो राज्यावर आला. पण त्याला प्रत्यक्ष राज्याभिषेक मात्र शक ११३२ मध्ये झाला असावा. हा राज्याभिषेक त्याने कर्नाटक विजयासारख्या महत्त्वाच्या सैनिकी यशानंतर करून घेतला असावा. (त्याच्या

---

१. **'There are few rulers of ancient Indian history whose chronology is as much confusing as that of Singhana'. (Verma, Yadavas and their times, P. 82)**

डोनी शिलालेखात ह्या विजयाचा उल्लेख आहे.)

५. हे सर्व राज्यवर्षाचे घोटाळे सिंघण युवराज असतानाच त्याचे जैतुगीदेव प्रथम ह्याचेसह राज्यकारभारात भाग घेणे सुरू केले आहे, म्हणून झाले असावेत. कदाचित् शक ११२१ ते ११३१ या दहा वर्षाच्या काळापर्यंत जैतुगी व सिंघण यांचे संयुक्त राज्य असावे, असाही तर्क डॉ. वर्मा करतात व असा प्रकारची पद्धत प्राचीन काळी भारतात सर्वत्र प्रचलित होती असे सांगतात.[२]

६. यादववंशात अशा द्वैराज्याची उदाहरणे होती हे दाखविताना डॉ. वर्मा ह्यांनी अमलानंद सरस्वती ह्याच्या वेदान्तकल्पतरू ह्या ग्रंथातील पुढील श्लोक उद्धृत केले आहेत.

**कीर्त्या यादववंशमुन्नमयति श्रीजैत्रपालदेवात्मजे**
**कृष्णे क्ष्माभृति भूतलं सह महादेवेन संविभ्रति ॥ ६ ॥**
**कृष्णक्षितीशे भुवनैकवीरे**
**भ्राता महादेवनृपेण साकम्**
**पाति क्षितिं प्रागिव धर्मसूनौ ॥**

यावरून कृष्णदेव व महादेव हे दोघे यादव बंधू संयुक्तपणे राज्य करीत होते. असे डॉ. वर्मा ध्वनित करतात.

७. शेवटी डॉ. वर्मा असे लिहितात की, सिंघणाचा जर दोनदा राज्याभिषेक झाला असता, तर तसे उल्लेख शिलालेखात यावयास हवे होते. पण तसे ते सांपडत नाहीत.

डॉ. वर्मा ह्यांनी फ्लीट, भांडारकर, सरकार, मिराशी इत्यदि सर्वांचीच मते उद्धृत केली असल्यामुळे केवळ त्यांचेच मत वर विस्ताराने उद्धृत केले आहे. यातील विसंगती आपणास स्पष्ट दिसू लागतात.

१. त्याच्या प्रतिपादनातील पहिले दोन भाग अतिशय घाईने व पुरेशा माहितीच्या अभावी लिहिले गेलेले दिसतात. आपण मागे पाहिलेच की सिंघणाच्या राज्यकालाचा प्रारंभ म्हणून डॉ. वर्मा म्हणतात त्याप्रमाणे तीन नव्हे, तर तेरा वेगवेगळी वर्षे आपणांस उपलब्ध होतात. त्यातील काही तर इ. स. १२१३-१२१४ इतकी उशिराची आहेत. यावेळी तर जैतुगीदेव प्रथम निश्चितपणे जिवंत नव्हता. अशा अवस्थेत केवळ जैतुगीने आपल्या राज्याचा भार युवराजांवर सोपवला होता. असे समजून वरील वर्षांचे स्पष्टीकरण कसे करायचे.

२. बरे, सिंघणाने राज्यावर आल्यानंतर काही दिवसांनी अधिकृतपणे राज्याभिषेक करून घेतला असे म्हणावे तर डॉ. वर्मा ह्याविषयी स्वतःच साशंक आहेत व असे जर घडले असेल, तर या

२. यासाठी पुरावा म्हणून डॉ. वर्मा यांनी काकतीय वंशाचे व कोणमंडल किंवा कोणसीमा येथील हैहय या सामंत वंशाचे उदाहरण दिले आहे. पण या दोन्ही ठिकाणी नेमके कशा प्रकारचे द्विदल राज्य (द्वैराज्य=Dual Kingship) होते हे मात्र त्यांनी स्पष्ट केले नाही.

घटनांचे निर्देश यादव शिलाताम्रशासनातून का मिळू नाहीत, असे तेच विचारतात. तेव्हा त्यांच्या प्रतिपादनातील तिसऱ्या व चौथ्या भागातही फारसे तथ्य नाही असे दिसते.

३. यादव राजकुमार जरी आपल्या पित्यासह शासनात भाग घेत असले तरी (अशी पद्धती प्राचीन काळी भारतात होती) पित्याप्रमाणेच त्यांचेही उल्लेख सार्वभौम शासक म्हणून येत असत हे कसे सिद्ध होऊ शकेल ? अशोक किंवा सुशीम हे तक्षशिला किंवा विदिशा येथे राजकार्याचा अनुभव घेत असता, त्यांना 'कुमार'च म्हणत. गुप्तवंशातील राजपुत्रांच्या हाताखालील अधिकाऱ्यांच्या मुद्रांवरही 'युवराजभट्टारकपादियकुमारामात्याधिकरणस्य' असाच त्यांच्या कार्यालयाचा उल्लेख आढळतो.[३] तेव्हा राजा वृद्ध असता जरी युवराज शासनयंत्रणेचा प्रमुख असला, तरी त्याचा शिलालेखात उल्लेख युवराज म्हणूनच येईल. पण सार्वभौम पदव्यांसह येणार नाही हे निश्चित.

४. उरता सुरला उल्लेख वेदान्तकल्पतरू या ग्रंथातील कृष्ण व महादेव ह्यांच्या संयुक्त राज्याचा. एक तर या ग्रंथातील उल्लेख समकालीन आहे की मागाहून जोडला गेला आहे. हे प्रथम पाहिले पाहिजे. असा उल्लेख महानुभावीय लीळाचरित्रातही येतो. पण तो वाइदिशकर पाठातील असून उत्तरकालीन आहे.[४]

शिवाय आश्चर्याची गोष्ट अशी की, प्रथम राज्यवर्षाचे घोटाळे आहेत सिंघणाच्या राज्यकालाचे. कृष्णदेवांच्या राज्याचे शेवटचे वर्ष व महादेवाच्या राज्याचे प्रथम ह्यात एखाद्या वर्षाचा काय तो घोटाळा आहे. उलट कृष्णदेव यादवाच्या ममदापूर शिलालेखावरून हे स्पष्ट आहे की, कृष्णाने आपला पुत्र रामचंद्र अल्पवयी असल्यामुळेच महादेवाला फक्त 'युवराज' नेमले. या दोघांचाही सार्वभौम उल्लेख असलेल्या लेखात एखाद्याच वर्षाचा घोटाळा आहे.

५. डॉ. रित्ति ह्यांनी वेगळ्या प्रकारे ह्या प्रश्नाची उकल करण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांच्या मते ११९९-१२०० इ. स. हे पहिले राज्यवर्ष म्हणून देणारे सिंघणाचे लेख उत्तर कर्नाटकात (सोलापूर, विजापूर जिल्ह्यात व काही गुलबर्गा जिल्ह्यात) सांपडतात, तर मलप्रभा नदीच्या दक्षिणेकडील (धारवाड, शिमोगा जिल्ह्यातील) शिलालेखात त्याचे प्रथम राज्यवर्ष उशिराचे १२१०-११ दिलेले आढळते. धारवाड जिल्ह्यातील मुंदरगी तालुक्यातील डोनी येथील शिलालेखात व्यय सवंत्सर ( इ. स. १२२६-२७) हे सिंघणाच्या त्या प्रदेशातील प्रवेशाचे सोळावे वर्ष असे म्हटले आहे. या प्रदेशातील बहुसंख्य शिलालेख इ. स. १२१०-११ हे सिंघणाचे पाहिले राज्यवर्ष देतात.

३. Archaeological Survey of India, 1903-04. ४. '......कान्हरदेवराय दर्शना आला. समागमे महादेवराय धाकुटा होता.' डॉ. देशपांडे य. खु., महानुभावीय मराठी वाङ्मय, पृ. ५ ह्यांचेशी तुळपुळे. लीळाचरित्र, एकांक लीळा ३९ची तुलना करावी.

डॉ. रित्ति ह्यांचे हे प्रतिपादन बरेच तथ्यपूर्ण असले, तरी त्यातून सर्वच प्रश्नांची उकल समाधानकारकरित्या होत नाही. उत्तर कर्नाटकानंतर सिंघणाने दक्षिण कर्नाटकात प्रवेश केला व म्हणून दक्षिण कर्नाटकातील त्याचे लेख त्याचे प्रथम राज्यवर्ष उशिराचे देतात, तर त्याचे पहिले राज्यवर्ष इ. स. १२१३ हे देणाऱ्या उत्तर कर्नाटकातील गुलबर्गा जिल्ह्यातील हगरिटगे ह्या गावी सापडलेल्या शिलालेखाची संगती कशी लावायची व धारवाड जिल्ह्यात होसाहळ्ळी येथे सापडलेल्या व सिंघणाचे पहिले राज्यवर्ष १२१४ इ. स. देणाऱ्या शिलालेखाचे काय करायचे, हा प्रश्न राहतोच.

तस्मात् वरील विद्वानांचे सर्व विवेचन सिंघणाच्या कालक्रमाचा नीट उलगडा करणारे नाही. शेवटी आपण ह्याच निष्कर्षाला येतो की प्राचीन काळी (दानलेख) दानांच्या घटना घडल्यानंतर २-३ दशकांनीही लिहिल्या जात. सर्वच दानशासने राजसभेशी संबंधित असत असेही नाही. पुष्कळदा दाने सामान्य साहुकार-श्रेष्ठी, गावुंड ह्यांचेकडून दिली जात व ती वैयक्तिक स्वरूपाची असत.[५] त्यांची नोंद राजाचे व त्याच्या अधिकाऱ्यांचे कार्यालयात असण्याचे कारण नसे. तेव्हा सामान्य जन आपल्या स्वतःच्या ऐकीव माहितीवर विसंबून लेखात राज्यवर्षाचा उल्लेख करीत व म्हणूनच राजांच्या कालगणनेच्या प्रथम वर्षाविषयी घोटाळे होत. शिवाय काही शिलालेखात शकवर्ष, काहीत राज्यवर्ष तर काहीत दोन्ही एकत्र दिली जात. काहीत शकांक न देता केवळ संवत्सरनाम देऊन काम भागविले जाई.

**सिंघणाचे सैनिकी विजय :**

सिंघणदेव द्वितीय हाच यादव वंशातील सर्वांत पराक्रमी गणला जातो. त्याच्या दीर्घराज्यकालात (इ. स. १२०० ते १२४०) त्याने यादव सत्तेचा अभूतपूर्व असा विस्तार घडवून आणला. उत्तर व दक्षिण भारतातील माळवा व गुजराथ येथील सत्ता एकमेकांशी झगडता झगडता व तुर्कीच्या आक्रमणांना तोंड देता देता क्षीण बल झाल्या होत्या. तर दक्षिण भारतातील यादव सत्तेचा एकमेव प्रतिस्पर्धी असलेल्या होयसळ बल्लाळदेव द्वितीय ह्याचा पराक्रम रवी अस्ताचलाकडे झुकला होता. सिंघणासारखा महत्त्वाकांक्षी सम्राट ह्या संधीचा लाभ न घेता तरच नवल.

**लाट देशावर आक्रमण :**

सिंघणाने प्रथम आपले लक्ष लाट प्रदेशाकडे वळविले. लाट प्रदेशावर ह्यावेळी चाहमान कुळातील सिंह हा राज्यावर होता. गुजरातचे चालुक्य व माळव्याचे परमार ह्यांच्यातील कलहात

५. सिंघणदेवाच्या राज्यकाळातील कंदगल शिलालेख (जैन शिलालेख संग्रह, चतुर्थ भाग, क्र. ३२९) कृष्णदेवाच्या काळातील कलकेरी शिलालेख (तत्रैव क्र. ३३६), त्याच्याच काळातील बालूर शिलालेख (तत्रैव क्रमांक ३३८) ही याची उत्कृष्ट उदाहरणे म्हणून सांगता येतील.

आपले राज्य टिकवून ठेवणेही त्याला अतिशय जड झाले होते. लाट प्रदेशावर सिंघणाने आपला सेनापती सागप्यनायक ह्याला पाठविले.[६] यावेळी माळव्याच्या परमार राजकुलाने शंखाला सैनिकी सहायता पाठविली व चाहमान सल्लक्षणदेव ह्याने यादव सैन्याविरुद्ध शंखाचे बाजूने मोठा पराक्रम गाजविला त्याने सागप्यनायकाला त्यांच्या घोड्यावरून खाली ओढून पाडले. असे वर्णन जयसिंह जयवर्मन ह्याच्या मांधाताताम्रपटात सापडते.[७] यावेळी सिंघणाला फारसे यश मिळालेले दिसत नाही. पण सिंघणाने लगेच आपला कसलेला सेनापती खोलेश्वर व त्याचा पुत्र राम यांना सिंहाविरुद्ध पाठविले. या पितापुत्रांनी लाट देशाची राजधानी भृगुकच्छ किंवा भडोच ही जिंकून घेतली. सिंहडीचा शिरच्छेद केला व भडोच येथे जयस्तंभ रोवला, असे वर्णन खोलेश्वरच्या अंबाजोगाई शिलालेखात केले आहे.[८] अशा रितीने लाट देशातील भृगुकच्छ यानंतर तो माळव्याच्या परमारांकडे वळला. या आक्रमणांचा पुढे सविस्तर विचार केलाच आहे.

**माळव्याचे परमार :**

सिंघणाच्या राज्यकालात माळव्याच्या परमासिंहासनावर सुभटवर्मा, अर्जुनवर्मदिव प्रथम व देवपाल हे शासक क्रमाक्रमाने आले. या तिघांनाही सिंघणाच्या आक्रमणाला तोंड द्यावे लागले. खोलेश्वराच्या आंबे शिलालेखात त्याने परमार नृपती सुभटवर्मा ह्याचा पराभव केला, असा स्पष्ट उल्लेख आहे.[९] सिंघणाने अर्जुनवर्मदिव प्रथम ह्याचा पराभव केल्याचे उल्लेख हेमाद्रीची राजप्रशस्ती (येन क्षोणिभृद्र्जुनोपि बलिना नीतः कथाशेपतां), सिंघणाचे पुळुंज, उद्दरी शिलालेख (अर्जुनमालवीक्षितिपतिमत्त मातंगमददलनषंचानन), रामचंद्रदेवाचे पैठण व पुरुषोत्तमपुरी ताम्रपट (न्यस्तोर्जुनो निर्जितः) या सर्व उल्लेखांवरून अर्जुनवर्मदिव प्रथम ह्याचा सिंघणाने पराभव केला हे स्पष्ट दिसते. सिंघणाच्या आणखी एका शिलालेखात त्याने मालव प्रदेशातील मंडपदुर्ग (मांडवगढ, मांडू) ह्यालाही वेढा घातल्याचे उल्लेख आहेत.

अर्जुनवर्मदिवाचे इ. स. १२१७ नंतरचे शिलालेख सापडत नाहीत. त्यानंतर देवपाल हा

---

६. लाट देशावरील सिंघणाच्या या आक्रमणाचे उल्लेख सोमेश्वरविरचित कीर्त्तिकौमुदी, वालचंद्रदेवकृत वसंतविलास व जयसिंहसूरीकृत हम्मीरमदमर्दन काव्यातही सिंधुराज (सिंहाचा धाकटा भाऊ) ह्याला खोलेश्वराने मारले असा उल्लेख आहे. ७. E. I. Vol. XXXII, p. 39.

८. गुर्ज्जरान्जर्ज्जरीकृत्य संनिकृत्य शिरःक्षणात्

भृगुकच्छाधिपस्याब्धी स्तंभोयेनाधिरापितः ॥

(खरे ग. ह., दक्षिणेच्या मध्ययुगीन इतिहासाची साधने, खंड १, पृ. ७४) किंवा

गूर्ज्जरवर सीहडि शिरःकमलमूलनालोत्पाटनकरः ॥ (तत्रैव, पृ ६४)

९. योडः क्रोढ पयोधे रणभुवि सुभटो मृत्यूकालं त्रिकालं । खरे ग. ह., तत्रैव पृ ६२ (डॉ. वर्मा मात्र सिंघण आणि सुभटवर्मा ह्यांच्यातील युद्धाचा निर्देशही करीत नाहीत.)

माळव्याचा राजा झाला. सिंघणाने त्याच्यावरही आक्रमण करून त्याचाही पराभव केला असावा. कारण खोलेश्वराच्या आंबे शिलालेखात त्याने धाराधिपती देवपालाचा मानभंग केला असे वर्णन आहे.[१०]

सिंघणाने गुजरात माळव्यावर प्रारंभी काही हल्ले केले असावेत. ह्या सर्व आक्रमणाविषयीचे हम्मीरमदमर्दन, कीर्त्तिकौमुदी इत्यादि काव्यग्रंथातील उल्लेख बरेच घोटाळ्याचे आहे. त्या सर्वांची चर्चा सिंघणाच्या गुजरातवरील आक्रमणांच्या संदर्भात केली आहे.

उत्तरेकडील ह्या आक्रमणामुळे उत्तरेत किंचित् दरारा निर्माण होताच सिंघण दक्षिणेकडे वळला असे दिसते. दक्षिणेतील होयसळ हे यादवांचे परंपरागत वैरी, यावेळी होयसळ वंशातील वीरबल्लाळदेव द्वितीय हा पराक्रमी सम्राट राज्यावर होता. सिंघणाने अतिशय काळजीपूर्वक त्याच्या विरुद्ध एक एक पाऊल उचलायला प्रारंभ केला.

**कोल्हापूरचे शिलाहार :**

होयसळांविरुद्ध एकदम फार मोठे सैनिकी अभियान काढण्याआधी सिंघणाने आधी होयसळांच्या सीमेवरील लहान लहान सामंताविरुद्ध सैन्य पाठविले. कोल्हापूरचे शिलाहार पूर्वी कल्याणीच्या चालुक्यांचे सामंत होते.[११] चालुक्य सत्ता दुर्बल होताच ते स्वतंत्र झाले. त्यांनी काही दिवस कलचुरिंचीही अधिसत्ता मान्य केली. पण या वंशातील भोज द्वितीय ह्याने लवकरच आपल्या सार्वभौम साम्राज्याची घोषणा केली असे दिसते. कारण शब्दार्णवचंद्रिका या ग्रंथाच्या पुष्पिकेत त्याच्या नावामागे 'महाराजाधिराज' 'परमेश्वरपरमभट्टारकपश्चिमचक्रवर्ती' अशा पदव्या लावल्या आहेत. सिंघणाच्या सैन्याचे नेतृत्व त्याचा दंडनायक लक्ष्मीदेव[१२] ह्याचेकडे होते.

भोजाने यादव सैन्याचा प्रतिकार करण्याचा बराच निकराचा प्रयत्न केला असावा. कारण यादव सैन्य बरेच दिवस शिलाहारांच्या दुर्ग पर्णालदुर्गाला वेढा घालून बसला होते असे दिसते. म्हणूनच रामचंद्रदेव यादवांचे व पुरुषोत्तमपुरी ताम्रपटात (दुर्गाग्रे विनिबध्य भोजनृपतिः) व हेमाद्रीच्या राजप्रशस्तीत (येनोद्दामभुजेन भोजनृपतिःकारा कुटुंबीकृतः) असे उल्लेख येतात. कदाचित् भोज ह्या प्रचंड विस्ताराच्या डोंगरी दुर्गावर बराच काळपर्यंत अडकून पडला असावा. भोजाचा अंत कशा प्रकारे झाला, हे आपणांस माहीत नाही. त्याचा पुत्र गंडरादित्य द्वितीय याचा

१०. धाराधिपविशदसुमल्लदेवपालमानवनभंजनप्रभंजन ॥ खरे ग. ह., दक्षिणेच्या मध्ययुगीन इतिहासाची साधने, खंड १, पृ. ६४. ११. शिलाहार गंडरादित्य ह्याचा कोल्हापूर ताम्रपट (खरे, तत्रैव पृ. ३९) पहा. चालुक्य विक्रमादित्य सहावा याची पत्नी चंदलादेवी (चंद्रलेखा) ही कोल्हापूरच्या शिलाहार घराण्यातीलच होती. १२. या लक्ष्मीदेवाला महाप्रधान, समस्तसेनापति, अनेकदेशाधिपति, बाहत्तरनियोगाधिपति, नायकनारायण, श्रीमत्प्रतापचक्रवर्ती-सिंघणदेव-दक्षिणभुजदंड, पश्चिमरायभोजदेव दिशापट्ट आदि अनेक बिरुदे लावलेली दिसतात. (Dr. Verma, Yadavas and their times, page 89.)

सातारा ताम्रपट प्रसिद्ध आहे. पण तो राज्यावर आला असे दिसत नाही.

सिंघणाने पन्हाळा कोणत्या वर्षी जिंकला, याविषयी विद्वानांनी बरीच घोटाळ्याची विधाने केली आहेत. कोल्हापूरजवळ खिद्रापूर येथील सिंघणाचा लेख शके ११३६ (इ. स. १२१४-१५) चा आहे. अर्थात् यापूर्वी निदान एखादे वर्ष तरी सिंघणाने शिलाहारनृपतीस हरविले असावे. डॉ. रित्ति ह्या लेखाचा काळ इ. स. १२१३ असा चुकीचा देतात, तर डॉ. मिराशी हा लेख इ. स. १२१८ चा असल्याचे ध्वनित करतात. डॉ. वर्मांनी या लेखाचा काळ इ. स. १२१४ असा योग्य दिला आहे. पण तरी यादवांच्या शिलाहारावरील विजयाचे वर्ष ते इ. स. १२१५ असे का देतात कुणास ठाऊक. सारांश इ. स. १२१३-१४ च्या आसपास यादव सत्ता कोल्हापूर प्रदेशात विजयिनी झाली असावी, असे अनुमान करता येते.

सिंघणदेवाच्या तिळीवल्ली शिलालेखातही त्याला 'पण्णालनिलयप्रबल भोजभूपालव्यालनिद्रावणविहंगराज' अशी विशेषणे लावलेली आहेतच.

**सौंदत्तीचे रट्ट :**

यानंतर सिंघण सौंदत्तीच्या रट्टांकडे वळला. हे रट्टही पूर्वी कल्याणीच्या चालुक्यांचे मांडलिक होते. चालुक्य सत्तेच्या नाशानंतर त्यांनीही स्वतंत्रपणे आपल्या प्रदेशाचे शासन करण्यास प्रारंभ केला. कोल्हापूरच्या शिलाहारांचा प्रदेश ह्या रट्टांच्या प्रदेशाला लागूनच होता. रट्टांच्या प्रदेशातील कुंडीविषय व त्यातील मिरिंज खंपणक (आधुनिक मिरज जिल्हा) हा यादवांनी आधीच जिंकून घेतला होता, हे खिद्रापूर लेखावरून कळतेच. शिलाहारांच्या पराभवानंतर सिंघण त्वरित सौंदत्तीकडे वळला असावा. रट्टांपैकी शेवटचे दोन राजे कार्तवीर्य चतुर्थ व लक्ष्मीदेव द्वितीय ह्यांना महामंडलेश्वर ह्याच पदवीने संबोधिले गेले आहे, ते कदाचित् सिंघणाने त्यांचा पराभव केल्यामुळेच. यापैकी लक्ष्मीदेव द्वितीय ह्याचा सौंदत्ती शिलालेख शके ११५० आषाढ, सूर्यग्रहण, सोमवार ह्या तिथीचा (इ. स. १२२८) आहे.[१३] शिवाय मुनवल्ली (सौंदत्ती जवळच सहा मैलांवर) यादव सिंघणाचा लेख सापडला असून, तो शके ११४५ (इ. स. १२२३) चा आहे.[१४] अर्थात् १२२३ पूर्वीच यादवांनी रट्टांचा पराभव केला असावा असे दिसते. अशा अवस्थेत यादव-रट्ट युद्धाची जी तिथी डॉ. दिनकर देसाई इ. स.१२३३ अशी देतात.[१५] त्यात फारसे स्वारस्य नाही. लक्ष्मीदेव द्वितीयनंतर एकही रट्ट शासकाचे नाव आपणास शिलाताम्रशासनातून मिळत नाही. अर्थात् हा वंश संपला. डॉ. वर्मा मात्र सौदत्तीच्या रट्टाविरूद्धच्या सिंघणाच्या विजयाचा निर्देशसुद्धा करीत नाहीत.

---

**१३. जैन शिलालेख संग्रह, चतुर्थ खंड, क्रमांक ४७०. १४. I. A. Vol. XXIV, Page 8. १५. Dr. Dinkar Desai, Mahamandalevaras under the Chalukyas of Kalyani, page 194-195.**

सौदत्तीच्या रट्टांविरूद्ध विजय मिळवणारा सिंघणाचा पराक्रमी सेनापती बीचण हा होता. त्याच्या हरळाहल्ली शिलालेखात त्याच्या कर्तृत्वाचे वर्णन आले असून, त्यात त्याने संवदत्तीच्या रट्टांचा पाडाव केला, असा स्पष्ट उल्लेख आहे.[१६]

**उत्तर कर्नाटकातील सामंत घराणी :**

सिंघण आता होयसळ राज्याच्या उत्तर सीमेकडे वळला. इथे अनेक लहान लहान सामंत घराणी शासन करीत होती. सिंघणाने या सर्वांचा हळूहळू नाश केला.

**अ. वनवासीचे कदंब :-** वनवासी प्रदेशातच उद्दरी (आधुनिक उद्री) ह्या गावी सिंघणाचा एक महत्त्वपूर्ण शिलालेख उपलब्ध झाला असून, त्यात सिंघणाचा वनवासी प्रांतावरचा अधिकारी मायिदेव दंडनायक ह्याचा उल्लेख आहे. ह्या शिलालेखाची मिती इ. स. १२१७ अशी आहे. त्या वर्षी यापूर्वी सिंघणाने वनवासीच्या कदंबांना परास्त केले असावे.

**ब.** सिंघणाचा पराक्रमी सेनानी बीचण हा यावेळी गदग, लक्ष्मेश्वर, लक्कुंडी हा यादव-होयसळ ह्यांच्यातील प्राचीन रणभूमीचा प्रदेश जिंकून घेण्यात गुंतला होता. गदग, लक्कुंडी या भागात सिंघणाचे शिलालेख सापडले असून, ते इ. स. १२१३-१४-१५ या वर्षांचे आहेत. याचाच अर्थ असा की, होयसळांचा त्यांच्या उत्तर सीमेवरील प्रभाव आता ओसरू लागला होता.

**क.** याचा लाभ घेऊन सिंघणाने एक पाऊल पुढे टाकले. त्याचा आणखी एक अधिकारी मायिदेव पंडित हा पुरिगेरे भागावर इ. स. १२१५च्या आसपास शासन करताना आढळतो.[१७]

**ड.** याच वेळी शिमोगा जिल्ह्यात बेळगुत्ती (प्राचीन बेळगवत्ती) येथे एका सिंद वंशाचे शासन करीत होते. कोल्हापूरच्या शिलाहारांप्रमाणेच हे सिंदही पूर्वी कल्याणीच्या चालुक्यांचे मांडलिक होते. चालुक्यांनंतर त्यांनीही कलचुरिचें आधिपत्य स्वीकारले. कलचुरिंच्या नाशानंतर त्यांनी स्वतंत्र होण्याचा प्रयत्न केला पण होयसळांनी त्यांना सतत आपल्या प्रभावाखाली ठेवले व होयसळ बल्लाळाने अतिशय पराकाष्ठेचा प्रयत्न करून सिंदशासक मल्लिदेव द्वितीय ह्याला इ. स. ११९८ च्या आसपास आपले स्वामित्व मान्य करावयास लावले.[१८] अर्थात् सिंदांनी आपल्यावरील होयसळ सत्तेचे जोखड झुगारून देण्याचा सतत प्रयत्न केला. यादव सत्तेची पावले या प्रांतात वाजताच त्यांनी यादवांचे स्वागत करून त्यांच्याशी मैत्रीचे संबंध निर्माण केले.

यामुळे साहजिकच होयसळांनी सिदांच्या प्रदेशावर आक्रमणे करण्यास प्रारंभ केला. इ. स. १२१६ या वर्षी सिंद आणि होयसळ यांच्या सेना बेलगुत्ती जवळच मादनभावी या गावाजवळ झुंजल्या व त्यात सिंद ईश्वरदेव तृतीय ह्याचा सेनापती चिण्णय्या ह्याने मोठा पराक्रम गाजविला.

---

१६. JBBRAS, Vol. II, p. 264. १७. हा मायिदेव पंडित मायिदेव दंडनायकापेक्षा वेगळा आहे. (Shrinivas Ritti, The Seunas, page 120 & 142, note 38.). १८. तत्रैव, पृष्ठ १२१.

दुसऱ्या वर्षी होयसळ सम्राट वीरबल्लाळदेव द्वितीय हाच बेलगुत्तीवर चालून आला. आता सिंद सेनेचे नेतृत्व ईश्वरदेव तृतीय ह्याचा सामंत बंदणिकेचा शासक बोम्मीदेव ह्याचेकडे होते. बनवासी प्रदेशात तळ ठोकून बसलेल्या यादव सैन्याने सिंदांना यावेळी साहाय्य केले असावे. पण यादव आणि सिंद यांच्यातील मैत्री फार काळ टिकू शकली नाही. सिंद ईश्वरदेवाला जसे होयसळांचे स्वामित्व नको होते तसेच यादवांचेही नको होते. सिंघणाच्या इ. स. १२१९च्या आबलूर शिलालेखात सिंद ईश्वरदेवाने बनवासी प्रांतातील नागरखंड भागातील आबलूरवर आक्रमण केल्याचे वर्णन आहे.[१९] इ. स. १२२१ मध्ये ईश्वरदेवाने बंदणिकेच्या बोम्मीदेवाच्या साहाय्याने पुन्हा बनवासीमधील मुळगुंद (आधुनिक चिन्मुळगुंद तालुका हिरेकेरूर जिल्हा धारवाड) या गावावर आक्रमण केले. पण यातही ईश्वरदेवाला यश मिळाले नाही.

त्याचा पुत्र केशवदेव ह्यानेही यादवांविरुद्ध सतत आक्रमणे केली आणि यादवांचा बनवासी प्रांतातील शासक होन्नबोम्मीसेट्टी याला परास्त करण्याचा प्रयास केला. केशवदेवाचा पुत्र बीरदेवरस व बनवासी प्रांताचा यादव अधिकारी लखनपाल यांच्यात एक झुंज बेळगुत्तीजवळ हट्टीबुर येथे झाली तर बीरदेवरस व यादवांचा सेनापती श्रीधर दंडनायक ह्यांच्यातील युद्ध तुंगा व भद्रा या नद्यांचे संगमावर कूडली या गावी लढले गेले.[२०] यादव व सिंद ह्यांच्यातील हे वैर निदान १२४७ इ. स. पर्यंत तरी धुमसत होतेच.[२१]

उत्तर कर्नाटकातील धारवाड व शिमोगा या भागांवर सिंघण आपले वर्चस्व निर्माण करीत असता, वीरबल्लाळदेव द्वितीय हा होयसळनृपती मात्र दक्षिणेतील पांड्य व चोळ यांच्यातील संघर्षाचा लाभ घेण्यात गुंतला होता. चोळ सिंहासनावर यावेळी कुलोत्तुंग तृतीय हा दुर्बळ शासक होता. साहजिकच त्याच्या शेजारी नांदत असलेल्या मारवर्मन सुंदर पांड्य ह्याने चोळ प्रदेशावर आक्रमण करून उरैयुर व तंजोर ह्या नगरांचा विध्वंस केला.[२२] अशा वेळी चोळ राजाने होयसळांकडे साहाय्याची याचना केली. होयसळ बल्लाळ चोळांच्या साहाय्याला धावून गेला व त्याने कुलोत्तुंगाला त्याचे राज्य परत मिळवून दिले. त्याच्या 'चोळराज्यप्रतिष्ठापनाचार्य' व 'पांड्यगजकेसरी' ह्या पदव्या अन्वर्थकच आहेत. अशा रीतीने होयसळ पांड्य-चोळ संघर्षात गुंतले असता आपल्या उत्तरेकडील सीमेकडे दुर्लक्ष झाले असणे स्वाभाविक आहे. याचा सिंघणाने उपयोग करून होयसळ राज्यावर अनेक आक्रमणे केली. म्हणूनच्या त्याच्या व त्याच्या वंशजांचे

---

१९. E. I. Vol. V, page 262. २०. प्राचीन कानडी भाषेत 'कूडल' या शब्दाचा अर्थच संगम असा होतो. २१. Dr. Shrinivas Ritti, The Seunas, page 124. २२. त्याच्या 'शोणडुवळंगीयरूळीय' ह्या बिरुदाचा अर्थच चोळ देशाचा विध्वंस करणारा असा आहे. (The struggle for Empire, page 256)

शिलाताम्रशासनातून बल्लाळाच्या पराभवाचे अनेक उल्लेख येतात[२३] धारवाड-गदग-लक्कुंडी या प्रदेशात सिंघणाचे शिलालेख इ. स. १२१३ पासूनच सापडू लागतात. उद्दरे शिलालेखात सामंत म्हणून दसबंध दंडनायक ह्याचे नांव येते.

यादव आणि होयसळ ह्यांच्यातील पहिले मोठे युद्ध इ. स. १२१३च्या आसपास झाले असावे. यादवांचे सेनापती विक्रमादित्य व पावुस हे दोघेही या युद्धात मारले गेले.

होयसळ बल्लाळ द्वितीयनंतर नरसिंह द्वितीय हा राज्यावर आला. बल्लाळाप्रमाणेच त्यानेही आपले लक्ष पांड्य-चोळ संघर्षाकडेच केंद्रित केले व चोळ राजराज तृतीय ह्याला मारवर्मन सुंदर पांड्याविरुद्ध साहाय्य केले. त्याचा सेनापती अमृतदंडनायक याने यादव सैन्याशी नेरीलगे ह्या ठिकाणी मोठी लढाई दिली. नरसिंहाचा दुसरा सेनापती अद्दयद हरिहर यांनेही यादव सैन्याला अडविण्याचा प्रयत्न केला.

नरसिंहाचा उत्तराधिकारी सोमेश्वर ह्यानेही यादवांना किसुकाडबेलवोळ ह्या प्रदेशातून घालवून लावण्याचा प्रयत्न केला. पण सिंघणाच्या पराक्रमापुढे त्याचे काहीच चालले नाही. त्याच्याही शिलालेखांतून त्याच्या यादवांशी झालेल्या युद्धांचे निर्देश येतात.[२४]

**लाट आणि गुजराथवरील आक्रमणे :**

मागे आपण सिंघणाच्या गुजरातवरील आक्रमणाचा वृत्तांत पाहिलाच आहे. त्या आक्रमणात लाट देशाचा राजा सिंह व त्याचा पुतण्या सिंधुराज हे मारले गेले असावेत, ही शक्यताही आपण पाहिली. त्यांच्यानंतर संग्रामसिंह (शंख) हा गुजरातचा राजा झाला. गुजरातचा राजा (भोळा भीम) हा दुर्बळ असल्यामुळे त्याचा मंत्री लवणप्रसाद व त्याचा पुत्र वीसलदेव ह्यांनी शासनावर संपूर्ण वर्चस्व मिळविले होते. अशा अवस्थेत सिंघणाचा पराक्रमी सेनापती खोलेश्वर पुन्हा गुजराथवर चालून गेला असे दिसते. यावेळचे हे यादव आक्रमण फार भयानक स्वरूपाचे होते. त्याचे पडसाद आपणांस जयसिंहसूरीच्या कीर्त्तिकौमुदी ह्या काव्यात उमटलेले दिसतात. यादवांच्या सैन्याने मार्गात भयंकर जाळपोळ व लुटालूट करून गुजरातच्या जनतेत फारच आतंक निर्माण केला. लोकांनी नवीन घरे बांधणे सोडले. ते धान्यादि वस्तूंचा संग्रह करिनात. आपआपली घरे सोडून गाड्या भरून पळून जाऊ लागले. त्यामुळे गाड्यांना मोठा भाव आला. जसजसे यादव सैन्य जवळ

---

**२३.'बल्लाळक्षितिपालपालितभुवां सर्वापहारश्च यः' राजप्रशस्ती, 'परिजनसहितो होसलः पल्वलांभ' खोलेश्वराचा अंबाजोगाई शिलालेख, 'बल्लाळो विजितः' रामचंद्रदेवाचे पैठण व पुरुषोत्तमपुरी ताम्रपट व हरळाहळ्ळी, तिळीवल्ली इत्यादि ठिकाणचे कानडी शिलालेख पहा. २४. एका कानडी शिलालेखात त्याला 'सेऊणोर्वीपालबालार्ण बदावानल' असे म्हटले आहे. (जैन शिलालेख संग्रह, प्रथम भाग क्र. ४४९).**

येऊ लागले, तसतसे गुजराथी लोक प्राणभयाने दूरदूर पळू लागले.[२५]

लवणप्रसाद व वीसलदेवाने यादवांना तोंड देण्याची तर सिद्धता केली, पण 'गंडस्योपरि पीटिका' या न्यायाने याच वेळी मारवाड देशातील चार राजांनी लवणप्रसाद संकटात आहे, असे पाहून त्याच्यावर सैन्य पाठवायची सिद्धता केली. कीर्तिकौमुदी असे सांगते की, एवढ्या संकटातही लवणप्रसाद बावरला नाही. उलट यादव सैन्यच अचानक नर्मदेच्या तीरावर थांबून राहिले व लवणप्रसाद मरुस्थलच्या राजांचा समाचार घेण्यास उत्तरेकडे वळला. सिंघणाने त्याचा पाठलाग केला नाही. कीर्तिकौमुदी सांगते, 'सिंह आपला मार्ग सोडून गेला तरी, तरी हरिणे त्या मार्गाने जाण्यास धजावत नाहीत.'[२६] कीतिकौमुदीतील हे वर्णन उघडच अतिरंजित व लवणप्रसादची बाजू सावरण्यासाठी कृत्रिम रचून लिहिलेले दिसते. सिंघणाच्या प्रबल सैन्यापुढे पड खाऊन लवणप्रसाद मारवाडी राजांचा समाचार घेण्यासाठी गेला हेच खरे. त्यासाठी त्याने सिंघणाला द्रव्य आदि देऊन तह केला असावा, असे दिसते. प्रबळ शत्रूशी नमते घेऊन दुर्बळांना आधी शासन करावे, हा राजनीतीचा नियमच आहे. लवणप्रसादाने सिंघणाशी तह केला असावा, असे समजण्यास दुसराही एक आधार आहे. लेखपद्धती किंवा लेखपंचाशिका हा एका अज्ञात लेखकाचा ग्रंथ असून त्यात व्यवहारातील अनेक प्रकारच्या लेखपत्रादिकांचे लेखन कसे करावे ह्याची उदाहरणे दिली आहेत. त्यातील संधिपत्राचे (तह, Treaty ) उदाहरण असे-

यमलपत्र संवत १२८८ वर्षे वैशाख शुदी १५ सोमेद्देह । श्रीमद्विजयकटके महाराजाधिराज श्रीसिंहणदेवस्य महामंडलेश्वरराणक श्रीलवणप्रसादस्य च । संराजकुलश्रीसिंहणदेवेन महामंडलेश्वर राणकश्रीलवणप्रसादेन पूर्वरुढ्यात्मीय २ देशेषु रहणीयं । केनापि कस्यापि भूमिर्न आक्रमणीया ॥ इत्यादि यावरून सिंघणदेव व लवणप्रसाद यांच्यात तह झाल्याचे स्पष्टच दिसते.[२७]

याच लेखपद्धतीत एका दासीच्या विक्रीविषयीचाही एक लेख आहे. वीरधवल (वीसलेदेवाचा पुत्र) याने महाराष्ट्रावर आक्रमण करून ही मुलगी पळवून आणली, तिच्या विक्रीसंबंधी हे पत्र आहे. अर्थात् यादव व गुजराथचे वाघेला यांच्यातील[२८] लहान मोठ्या झुंजी सतत

---

२५. अवधीरितधान्यसंचयानां बहुमानां शकटेषु मानवानाम्
विपदामुदयेहि दुर्निवारः शरणं चक्रभृदेव देवभाजाम् ॥ ४-४५ इत्यादि वर्णन पहा.

२६. वलितेपिचुलुक्यपार्थिवेस्मित्र कृतं यदुभिः पुरः प्रयाणम्
हरिणैरनुगम्यते न मार्गो हरिणा तत्क्षणमाश्रितोज्झितोपि ॥ ४-६३ ॥.

२७. यांच्यातील संवत १२८८ (इ.स. १२३१) ही तिथी शब्दशः घेण्याचे कारण नाही. कारण या ग्रंथातील सर्वच लेखपत्रांवर हीच तिथी दिलेली आहे. २८. लवणप्रसादाने लवकरच चालुक्यांचे स्वामित्व झुगारून दिले व तो स्वतंत्र झाला.

चालू होत्या असे दिसते.

आता उरला प्रश्न तो लाट देशाच्या शंखाचा, त्याच्या राज्यातील खंबायतचे बंदर वीरधवलने आपला मंत्री वस्तुपाल यास देऊन टाकले. साहजिकच शंख वाघेल्याविरुद्ध सिंघणास मिळला. त्यांना धारचा परमारनृपती देवपालहि सामील झाला. या तिघांच्या संयुक्त सैन्याचा लाट-गुजराथ देशाला मोठा धाक पडला. 'हम्मीरमर्दन' या नाटकातून अशी माहिती मिळते की, वस्तुपालाने मोठ्या युक्तीने या संघात फूट पाडली व त्यामुळे निराश होऊन सिंघण दक्षिणेत निघून गेला.

खोलेश्वर या पराक्रमी सेनापतीवरच गुजराथवरील या आक्रमणांचा सर्व भार होता. त्याचा पुत्र राम हाही आपल्या पित्याबरोबर या आक्रमणात भाग घेत होता व अशाच एखाद्या युद्धात तो मारला गेला असावा. त्याची बहीण लक्ष्मी (खोलेश्वराची कन्या) हिने अंबाजोगाई येथे त्याच्या स्मरणार्थ 'राम नारायण' नावाचे मोठे मंदिर बांधले व त्याच्या पराक्रमाची प्रशस्ती गाणारा लेख त्यावर कोरला.[२९]

खोलेश्वरसारख्या शूर सेनापतीच्या अविश्रांत परिश्रमाने व त्याच्या पुत्राच्या बलिदानामुळे गुजराथवर सिंघणाचा दबदबा निर्माण झाला हे खरे, पण नर्मदेच्या पलीकडे त्याला काही प्रदेश मिळाला असावा असे मला वाटत नाही. कारण यादवांचा एकही लेख नर्मदेच्या उत्तरेला अजूनपर्यंत सापडला नाही.

**वरंगलचे काकतीय :**

काकतीयनृपती महादेव ह्याला जैतुगीदेव प्रथम ह्याने ठार मारले व गणपतीला बंदीवासात टाकले. नंतर त्याची सुटका करून त्याला वरंगलच्या सिंहासनावर बसविले इत्यादि इतिहास आपण मागे पाहिलाच. यामुळे गणपती यादवांशी वैर धरून होताच. त्याने कदाचित यादवांच्या प्रदेशावर काही आक्रमणे केली असावीत. पण त्याचे व सिंघणाचे मोठे निर्णायक युद्ध झाले असावे असे वाटत नाही.[३०] सिद्धेश्वरचरितमु या तेलुगु काव्यग्रंथात गणपतीने सिंघणाचा पराभव केला व सिंघणाने आपली कन्या रुद्राम्मा गणपतीला देऊन त्यांच्याशी सख्य जोडले. इत्यादि वर्णन आहे. पण ते अगदीच निराधार आहे. कारण रुद्राम्मा ही सिंघणाची नव्हे तर गणपतीचीच कन्या होती.

**सिंघणाचे इतर विजय :**

**अ. भंभागिरीचा राजा लक्ष्मीधर :** याचे नांव हेमाद्रीच्या राजप्रशस्तीत रंभागिरीकेसरी लक्ष्मीधर व खोलेश्वराच्या आंबे शिलालेखात आभीरनृपती लक्ष्मीदेव असे येते. ज्याअर्थी त्याला

---

**२९. अंबाजोगाई येथे गावाच्या उत्तरेस जे मंदिर 'खोलेश्वराचा मठ' म्हणून ओळखले जाते, तेच हे रामनारायणाचे मंदिर होय. ३०. काकतीयांचा सेनापती सामंतभोज ह्याच्या एकाम्रनाथ शिलालेखात त्याने यादवांचा पराभव केल्याचा उल्लेख आहे, तर सिंघणाचा एक शिलालेख आंध्र राज्यात नलगोंडा जिल्ह्यात एलेश्वरम् ह्या ठिकाणी सापडला आहे.**

आभीर म्हटले आहे. त्याअर्थी तो खानदेशातील (आभीर-अहिर) भामेरचा राजा असावा, असा डॉ. मिराशींचा तर्क आहे. पण याचा एक शिलालेख नंदुरबार येथे सापडला आहे.

**ब. कक्कल :** याच्याही पराभवाचा उल्लेख रामचंद्रदेवाचे पैठण आणि पुरुषोत्तमपुरी ताम्रपटातून येतो. उद्दरी येथील शिलालेखावरून हा दक्षिण कर्नाटकातील वराट प्रदेशाचा अधिपती असावा असे दिसते.

क. रट्टनति करुवेम, नागण, नायक काशीचा रामपाल, बाणखेटीचा हेमाडी, चाहंदा येथील परमारभोज व जज्जल्ल ह्यांच्या पराभवाचे उल्लेख खोलेश्वराच्या आंबे शिलालेखात आहेत. यापैकी चाहंदा म्हणजेच आधुनिक चांदा. या भागात परमार वंशाची एक शाखा नांदत होती, हे जगद्देव परमार (सम्राट भोज-परमाराचा पुतण्या) ह्याच्या जयनद शिलालेखावरून व भांदक येथील नागनाथ मंदिरातील शिलालेखांवरून स्पष्ट आहे. त्यातीलच हा भोज लहानसा राजा असावा. या भोज परमारांची नाणीही सापडली आहेत. इतर राजांचा नीटसा शोध लागत नाही. सिंघणाच्या इतर शिलालेखांतून त्याने नेपाळ, चोळ, केरळ, काश्मीर इत्यादि प्रदेशांवर विजय मिळविण्याची वर्णने ती अतिरंजित व काल्पनिक समजावीत.

**सिंघणाचे सामंत व सेनापती :**

सिंघणाच्या यशाचे खरे शिल्पकार म्हणजे त्याचे विश्वासू सामंत आणि पराक्रमी सेनापती. सिंघणाचा प्रख्यात सेनापती खोलेश्वर हा विदर्भातील राहणारा मुद्गल गोत्री ब्राह्मण होता. त्याच्या अंबाजोगाई येथील शिलालेखात त्याच्या पितृकुळाची वंशावळ भाईदेव-स्वामीदेव-त्रिविक्रम अशी व मातृकुळाची वंशावळ गोविंद-वासुदेव-निंबदेव-चंद्रा अशी दिली आहे. त्रिविक्रम हा खोलेश्वराचा पिता व चंद्रा ही त्याची माता. हा त्रिविक्रम उदुंबरपंक्तिक या अग्रहाराचा प्रमुख होता असे दिसते.[३१] सिंघणाने खोलेश्वराला अंबाजोगाई व आसपासच्या प्रदेशांवर प्रमुख म्हणून नेमले होते. म्हणूनच अंबाजोगाईचे उल्लेख लीळाचरित्रातून 'खोलनायकाचे आंबे' असे येतात. तेथील जगळदेव व विंझदेव या अधिकाऱ्यांची नावेही लीळाचरित्रात दिली आहेत.[३२] पण त्यांचे उल्लेख यादवांच्या लेखात इतरत्र सापडत नाहीत.

अंबाजोगाई येथे खोलेश्वराचे एकूण चार शिलालेख आहेत. त्यापैकी पहिला लेख, मायामोचन तीर्थाच्या जवळ एका मंदिराच्या भिंतीवर लावलेला आहे. दुसरा लेख, पूर्वी

३१. हा उदुंबरपंक्तिक गाव म्हणजेच वऱ्हाडातील जिल्ह्याचे ठिकाण उमरावती असे काही संशोधक मानतात, तर ते यवतमाळ जिल्ह्यातील राणेउमरावती गांव असावे, असा डॉ. य. खु. देशपांडे यांचा तर्क आहे. पण अंबाजोगाईजवळच उमरोती नावाचे लहानसे खेडे आहे. त्याचाहि विचार या संदर्भात झाला पाहिजे. ३२. तैं जगळदेवो वींझदेओ अधिकार्ये । डॉ. तुळपुळे शं. गो., लीळाचरीत्र एकांक, लीळा. क्र. १२.

सकलेश्वराच्या मंदिरात होता. तो श्री. खरे यांना बन्सीलाल मारवाड्याच्या मळ्यात एका घराच्या भिंतीला टेकून ठेवलेला आढळला. (सध्या अंबाजोगाईला योगेश्वरी विद्यालयाच्या अंगणात एक शिलालेख पडलेला दिसतो तोच हा असावा) तिसरा लेख, चौबारा नावाच्या देवळात पश्चिमेकडील भिंतीत बसविला आहे. तर चौथा शिलालेख, खोलेश्वराची कन्या लक्ष्मी हिचा असून, तो रामनारायणाचे मंदिरात (खोलेश्वराच्या मठात) आहे. या चारही शिलालेखांतून सम्राट सिंघणदेव, सेनापती खोलेश्वर त्याचा पुत्र राम ह्यांच्या पराक्रमाची व अंबाजोगाई नगराच्या सौंदर्याची वर्णने आली आहेत.

सकलेश्वर मंदिरातील शिलालेखात सिंघणाने तेलंग, गुर्जर या देशाच्या राजांचा पराभव केला. केशिला केश धरून ओढले, होयसळांचा पराभव केला. सुभटास मारले अशा वर्णनानंतर खोलेश्वराच्या गुजराथ, चाहंदा (चांदा) येथील राजांवर विजय, देवपाल, नागणा, नायक, हेमाडी, लक्ष्मीदेव इत्यादि राजांचा पराभव इत्यादि पराक्रमी कृत्यांचे उल्लेख आहेत.

खोलेश्वराने अचलपुरात मोठे सुंदर व शोभिवंत विष्णू मंदिर बांधले.[३३] खोल्लपूर येथे अग्रहार बसविला. हा गांव अमरावती जिल्ह्यात दर्यापूरजवळ खोलापूर या नावाने विद्यमान असून ५०-६० वर्षांपूर्वी तेथे ब्राह्मण वस्ती बरीच होती. वरदातटात (वऱ्हाडात, वरदातटात>वरआतट>वराड>वऱ्हाड) सत्रे, प्रपा, (पाणपोया) बांधल्या व मांजरा नदीच्या तीरावर (वंजरा नदी) अग्रहार बसविला.[३४] वऱ्हाडात वाराणसी येथे अग्रहार बसविला.[३५]

क्रमांक दोनच्या लेखात खोलेश्वराने सकलेश्वराच्या विशेष भोगासाठी जी दाने दिली, ती तत्कालीन मराठी भाषेत दिली आहेत. चौथारा मंदिरातील लेखात आम्रपूर नगरातील उद्याने, मोठमोठाले वाडे, तेथील केदार, अंबर माणिक्य, व सकलेश यांची गगनचुंबी मंदिरे, तेथे अविरत वाहणारा शुद्ध व स्वच्छ वायू यांचे मनोहारी वर्णन श्लोक क्रमांक ५ ते १२ मध्ये आले आहे.

रामचंद्रदेवांचे एकनाथ संशोधन मंदिर ताम्रपटावरून कृष्णदेवाच्या पत्नीचे नाव लक्ष्मी होते, असा तर्क करता येतो.[३६] ही कृष्णदेवाची पत्नी म्हणजे खोलेश्वराची कन्या लक्ष्मीच तर नसावी ना ? प्राचीन काळी भारतात असे आंतरजातीय विवाह होत असत. प्रख्यात कवी राजशेखर हा श्रेष्ठ अशा ब्राह्मण कुळात जन्मला होता, तरी त्याची पत्नी अवन्तीसुंदरी ही चाहमान किंवा चौहान या

---

**३३. हे सध्या गावाच्या बाहेर पडक्या अवस्थेत असून येथील अद्वितीय सुंदर मूर्ती तळघरात ठेवलेली आहे. अचलपुरात त्यास सुंदरनारायणाचे मंदीर म्हणतात. ३४. आम्रदेशे तथा चक्रे योग्रहारं महापुरं । विदुपामाश्रयं रम्यं वंजरातटे ॥ लेख क्रमांक २, श्लोक २१. ३५ या वाराणसीचा शोध श्री. खरे यांना लागला नाही. विदर्भात उमरावती जिल्ह्यात वाराणसी गांव आहे. प्रसिद्ध लेखिका तारा वनारसे या मूळ त्याच गावच्या असेहि कळते. ३६. जयति जगति राम काम कोवावतीर्णः पुनरपि यदुवंशे कृष्णलक्ष्मीतनुजः ।**

क्षत्रिय कुळातील होती. सिंघण व खोलेश्वर यांचे संबंध लक्षात घेता अशा प्रकारचा विवाह घडून येणे अशक्य दिसत नाही. पण सबळ पुराव्याचे अभावी निश्चित विधान करणे कठीण आहे. आम्ही एक शक्यता दर्शविली इतकेच.

या खोलेश्वराचा एक शिलालेख विदर्भात पिंजर या गावीही सापडला आहे. खोलेश्वराने धारूर देशातही गणपती, सकलेश्वर इत्यादि देवतांची मंदिरे बांधली. या शिलालेखातून खोलेश्वराची प्रशस्ती लिहिणाऱ्या कवींची नावे त्रिलोचन (चौबारा शिलालेख) व वाग्देवताभट्ट (लक्ष्मी हिचा शिलालेख) अशी आली आहेत.

खोलेश्वराप्रमाणेच दक्षिणेत सिंघणाच्या राज्याचा विस्तार करणारा पराक्रमी सेनापती म्हणजे बीचण किंवा बीचिराज हा होय. हा धर्मानि जैन होता. व तो स्वतःला जैनजिनचूडामणि असे म्हणवून घेत असे. त्याची कन्या राजलदेवी हिने पुरिकेरे नगरातील विजयजिनालयासाठी दिलेल्या दानाचा लेख पुरिकेरे (लक्ष्मेश्वर) येथे आहे. तिच्या गुरूचे नाव पद्मसेन मुनि असे होते. शिलालेखात तिचे वर्णन 'जिनेंद्र चंद्रपादपद्ममहाव्रते' असे केले गेले आहे. लेखाची तिथी ज्येष्ठ अमावस्या शक ११६९ प्लवंग संवत्सर अशी आहे.[३७] या लेखात बीचणाची वंशावळ खालीलप्रमाणे दिली आहे.




बीचणाचा आणखी एक शिलालेख विजापूर जिल्ह्यात कलकेरी येथे सापडला असून त्यात भाद्रपद शु. ४ शक ११६७ या तिथीला महाप्रधान मल्लदेव, बीचण व पायिसेट ह्यांनी निर्माण केलेल्या अनंततीर्थंकर मंदिराला दिल्या गेलेल्या दानांचा उल्लेख आहे. यांचे गुरू कमलसेन मुनि होते.[३८]

हरळाहळ्ळी ताम्रपटात बीचणाच्या पराक्रमाचे वर्णन आहे. व त्याने सौंदत्तीचे रट्ट आणि बनवासीचे कदंबाचा पराभव केला. द्वारसमुद्राचा नाश केला इत्यादि वर्णन आहे.

बीचण जैन असला तरी वैदिक देवतांच्या मंदिरासही त्याने सढळ हाताने मदत केली. हरळाहळ्ळीजवळच (करजगी तालुका धारवाड जिल्हा) वाराही नदी तुंगभद्रेला मिळते. बीचणाने

३७. जैन शिलालेख संग्रह, चतुर्थ भाग, क्रमांक ३२९. ३८. तत्रैव, क्रमांक ३३०.

या संगमावर आपला पिता चिक्कदेव ह्याचे श्राद्ध करून रतिग्राम हा गाव येथील शिवालयास दान दिला. या ठिकाणचा ग्रामाधिकारी रामगौंड व महामंडलेश्वर जोईदेव ह्यांचीही नावे ताम्रपटात येतात. त्याचा जावई मल्लिसेट्टी हाही बेलबोळ प्रदेशावर सिंघणाचा सामंत म्हणून शासन करीत होताच.

दक्षिणेतील सिंघणाचा आणखी एक सामंत म्हणजेच आर्य मल्लिसेट्टी हा अर्थातच वर उल्लेखिलेल्या मल्लिसेट्टीपेक्षा वेगळा आहे. त्याची वंशावळ अशी




या मल्लिसेट्टीची पदवी 'कोंकणचकवर्ती' अशी होती. त्याने होयसळ नरसिंह द्वितीय ह्याचेशी दोन हात करून त्याचे चौदा हत्ती जिंकून आणले असे वर्णन त्याच्या रट्टिहळ्ळी शिलालेखात आहे. त्याचा पुत्र होन्नबोम्मीसेट्टी ह्याला 'सिंघणदेव दक्षिणभुजदंड' (सिंघणाचा उजवा हातच) अशी पदवी होती. यानेच सिंद केशवदेवाचा पराभव केला हे आपण मागे पाहिलेच.

या घराण्याचे शासन बनवासी १२००० या प्रांतावर होते. होन्नबोम्मीसेट्टी हा परमशिवभक्त होता.[३९]

सिंघणाच्या कोलार शिलालेखात एका वंकुब राऊत नावाच्या शासकाचे नाव असून, तो बेलवोळ ३००, हुलिगेरे ३०० व बनवासी १२००० वर शासन करताना दिसतो. कदाचित् आर्य मल्लिसेट्टीच्या आधी तोच बनवासीचा शासक असावा.

लक्ष्मीदेव दंडनायकाचा उल्लेख मागे आलाच आहे. त्याने गोव्याचे कदंब व कोल्हापूरच्या शिलाहारांविरुद्धच्या युद्धात भाग घेतला. तो सिंघणाचा हस्तिसाधनिक किंवा हस्तिसेनेचा प्रमुख होता. प्रख्यात संगीतज्ञ शार्ङ्ग्‌देव व त्याचा पिता सोड्ढल हेही सिंघणाच्या हाताखाली हस्तिसेनेचे अधिकारी होते.

बनवासी प्रदेशावर शासन करणारा आणखी एक अधिकारी मायिदेव पंडित हा होय. तार्द्दवाडी १००० या भागावर भागुबाई नावाची एक स्त्री शासन करताना दिसते. तिचा पुत्र वेसुगी व पति देवगणनायक हे तिला साहाय्य करीत.

३९. Dr. Shrinivas Ritti, The Seunas, Page 137.

सहदेव दंडनाथ ह्याचा उल्लेख मनकानी शिलालेखात येतो. याचे कुळ काश्मीरातील होते व तो व त्याचा चुलत भाऊ तिक्करस ह्या दोघांनीही सिंघणाचे हाताखाली तार्द्दवाडी १००० या प्रांतावर शासन केले. सहदेवाच्या पित्याचे नाव श्रीधर आईचे नाव लक्ष्मी व पत्नीचे नाव माकलदेवी असे होते.

याशिवाय दंडनायक नागरस कनंबदे ३०० वर, जगदल पुरुषोत्तमदेव हा बोरगल ६००० वर, जोगदल सोमनायक सिंदवाडीवर हे सिंघणाचे अधिकारी म्हणून शासन करताना दिसतात. हेमय्य नायक, हरदेव-महादेव हे बंधू (प्रकाशेवेल शिलालेख) मायिदेव (वाफळे शिलालेख) एल्लण पंडित (सिल्लोड शिलालेख) हे सिंघणाचे आणखी काही अधिकारी.

सिंघण हा यादव वंशातील सर्वांत पराक्रमी राजा. त्याचा जन्म पर्णक्षेत्र (खानदेशातील पालखेड) ह्या ठिकाणच्या नारसिंही देवीच्या कृपाप्रसादाने झाला होता असे वर्णन कृष्णदेव यादवाचे तासगाव ताम्रपटात आढळते. हीच यादवांची कुलदेवता होती.

सिंघणदेव जसा शूर व पराक्रमी होता, तसाच तो विद्वानांचाही मोठा आश्रयदाता होता, असे दिसते. प्रख्यात गणिती चंगदेव व अनंतदेव हे त्याच्या राजसभेतील दैवज्ञ होते. सिंघणाच्या सामंत निकुंभ सोइदेव व हेमाडिदेव ह्यांच्या साहाय्याने त्यांनी खानदेशात चाळीसगावजवळ पाटण येथे भास्कराचार्यांच्या ग्रंथाचे अध्ययन करण्यासाठी मठ स्थापन केला, अनंतदेवाने वराहमिहीराचे बृहत्-जातकावर टीका लिहिली.

संगीतज्ञ शार्ङ्गदेव हा तर सिंघणाच्या गजसेनेचा प्रमुख. त्याच्या संगीत रत्नाकर ग्रंथाची निर्मितीच सिंघणाच्या राजसभेत झाली. हा ग्रंथ संगीताच्या इतिहासात अनन्यसाधारण महत्त्वाचा आहे. स्वतः सिंघणाने ह्या ग्रंथावर टीका लिहिली होती असे सांगतात. सिंघणाने एका विशिष्ट सुगंधी चूर्णाचाही (बुक्क्याचा) शोध लावला होता, अशी माहिती 'गंधसार' ह्या ग्रंथावरील 'गंधवाद' ह्या मराठी टीकेवरून मिळते.[४०] हा सिंघणदेव मोठा खवैय्या असून अन्नपचनासाठी त्याला 'क्रव्यादरस'नावाचे एक औषध भैरवानंद नावाच्या वैद्याने दिले व सिंघणाने त्याला त्याबद्दल आठ गांवे दिली.[४१]

सिंघणदेव द्वितीय यादव वंशातील सर्वात शूर व पराक्रमी राजा होता. याच्याच राज्यकाळात यादवसत्तेचा अभूतपूर्व असा विस्तार झाला. खानदेश हा तर यादवांचे सत्तेखाली प्रारंभापासूनच होता. विदर्भात सिंघणाचा एक शिलालेख अमडापूर या गावी सापडला आहे. पश्चिम महाराष्ट्रात कोल्हापूरपर्यंत त्याच्या साम्राज्याचा विस्तार होता. दक्षिणेत त्याचे शिलालेख थेट रायचूर, बेल्लारी,

---

४०. यो बुका सिंघणे निपायो । राजवस्य करू मे हुगवापो ॥ Dr. Gode. P. K., Studies in Indian Literary History, Vol. 1, Page. 305. ४१. सिंघणक्षोणिपालाय भूरिभोज्यप्रिये रसम्। दत्तवान् भैरवानंदो भूपोग्रामाष्टकं ददौ ॥-कायस्थ चामुंडाची रससंकेतकलिका (Ibid)

शिमोगा जिल्ह्यांपर्यंत सापडले आहेत. त्याच्या 'पृथ्वीवल्लभ, श्रीवल्लभ, महाराजाधिराजपरमेश्वर, विष्णुवंशोद्भवयादवकुलकमलकलिकाविकासभास्कर, प्रौढप्रतापचक्रवर्ती' या पदव्या त्यांच्या पराक्रमाला साजेशाच आहेत. कृष्णदेव हा त्याचा पौत्र पण सामान्य लोक त्यालाही 'सिंघणाचा कान्हु' म्हणूनच ओळखीत असत मार्कंडी (जि. यवतमाळ) येथील एका अपूर्ण लेखात तर कृष्णदेवाचा उल्लेख 'कान्हो पुरुषोत्तमाचा । सिंघणरायाचा पनतो ।' असाच येतो. यादव साम्राज्याची बलिष्ठ पायावर उभारणी करणारा म्हणून त्याचे नाव इतिहासात अमरच राहील.

त्याच्या राणीचे नाव जेतादेवी असे होते. त्याचा पुत्र जैतुगी द्वितीय हा अल्पवयातच कालवश झाला, असे दिसते. कारण सिंघणाच्या मागून त्याचा पौत्र कृष्णदेव हाच राज्यावर आला. ह्या दितीय जैतुगीविषयी फारशी माहिती उपलब्ध होत नाही. रामचंद्राचे पैठण, पुरुषोत्तमपुरी, एकनाथ संशोधन मंदिर ताम्रपट व नेऊरगांव शिलालेख ह्यातून त्याच्या रूपसौंदर्याचे वर्णन करणारा श्लोक येतो. तो असा -

**तत्पुत्रो जैत्रपालः कुलकुमुदविधुर्वीरलक्ष्मीप्रसादः**
**प्रासादो रूपसंपत्सुषमितसुषमा कंदकंदर्पदर्प :**
**यः कर्णः कि दधीचिः किमु किमुत शिबिः किं न जीमूतवाहः**
**सत्त्वोद्रेकैकसीमा पुनरभवदिति व्यक्ततर्कैर्व्यतर्कि ॥**[४२]

अशाच आशयाचे वर्णन हेमाद्रीच्या राजप्रशस्तीतही येते. या द्वितीय जैतुगीचा एकही शिलालेख अद्याप उपलब्ध झालेला नाही. यादवकालीन साहित्यातही त्याचे उल्लेख सापडत नाहीत.

कृष्णदेव यादवाच्या अर्जुनवाडा शिलालेखात असा स्पष्ट उल्लेख आहे की, कृष्णदेव सिंघणाच्या थोरल्या पुत्राचा थोरला मुलगा होता. याचा अर्थ असा की, सिंघणाला व जैतुगीला बरेच मुलगे असावेत. काकतीयांच्या काही शिलालेखांतून सिंघणाचा पुत्र, शार्ङ्गपाणिदेव हा काकतीयांच्या सेवेत असल्याचे उल्लेख येतात. अर्थात् सिंघणानंतर यादवांची वंशावळी आता अशी मांडता येईल-




या शार्ङ्गपाणिदेवाचे नाव हेमाद्रीच्या राजप्रशस्तीत किंवा यादवांच्या लेखातही येत नाही. यावरून डॉ. वर्मा असा तर्क करतात की, कृष्णदेव व शार्ङ्गपाणिदेवाचा पराभव होऊन तो यादवांचे वैरी काकतीय यांचे आश्रयास गेला असावा. पण असा संघर्षच गृहीत धरण्याचे फारसे

४२. I. A. Vol. XIV, p. 314.

कारण दिसत नाही. प्राचीन काळी राजकुमार आपला स्वतंत्र भाग्योदय साधण्यासाठी इतर राजांच्या हाताखाली सेवावृत्ती स्वीकारीतही असत. भोज परमार याचा पुतण्या जगद्देव परमार हा अद्वितीय वीर पुरूष परमार व चालुक्य कुलात भीषण वैर असताही कल्याणीचे चालुक्य वंशातील विक्रमादित्य सहावा (परमर्दिदेव) ह्यांचेकडे चाकरीसाठी राहिला. त्यांचे शिलालेखही मराठवाड्यात राणी सावरगांव, विदर्भात डोंगरगढ, जयनद इत्यादि ठिकाणी सापडले आहेत. तसाच हा शार्ङ्गपाणिदेव काकतीयांकडे गेलेला दिसतो. त्यासाठी त्यांच्यात व कृष्णदेवात भांडण झाले, असेच गृहीत धरण्याची फारशी आवश्यकता नाही.

साहजिकच सिंघणानंतर कृष्णदेव हाच यादव सिंहासनावर आला.

****

# कृष्णदेव

कृष्णदेव यादवाच्या बेहट्टीताम्रपटातील कालोल्लेख खालीलप्रमाणे आहे.

'पंचसप्तत्याधिकशतोत्तरसहस्रके शकवर्षे वर्तमाने स्वस्तिश्रीमद्यादवनारायण भुजबळप्रौढप्रतापचक्रवर्ती श्रीकन्हरदेव वर्षेषु सप्तमे प्रमादी संवत्सरे चैत्रमासे कृष्णपक्षे अमावस्यां सोमवारे'

यावरून ११७५ हे त्याच्या राज्यकालाचे सातवे वर्ष होते हे स्पष्ट आहे. आम्ही संपादित केलेल्या त्याच्या मानूर शिलालेखातही त्याच्या राज्यवर्षाचा उल्लेख-

'स्वस्ति श्री सकु ११७० कीलक संवछरे। स्वस्ति श्री महामंडलेश्वर। जाधवकुलटीलकु श्रीकान्हरदेॐ। तेयाचे द्वितीय वरुष।'

असाच दिला आहे.[१] अर्थात शक ११६८-६९ हे वर्ष (इ. स. १२४७-४८) हे कृष्णदेवाचे पहिले राज्यवर्ष ठरते. सिंघणाने दीर्घकाळपर्यंत राज्य केले. तेव्हा कृष्णदेव हा त्याच्या राज्यकालातच राज्याची कामे पाहू लागला असावा असे दिसते.[२] मानूर शिलालेखातील त्याची महामंडलेश्वर ही पदवीही हीच शक्यता सुचविते.

कृष्णदेवाच्या सिंघणाकडून एक विशाल राज्य वंशपरंपरेने प्राप्त झाले होते. अर्थात् त्याच्या स्वतःच्या पराक्रमास त्यामुळे फारसा वाव राहिला नव्हता. तरीही आपल्या राज्यकालात जेवढ्या संधी चालून आल्या, त्यांचा लाभ घेऊन कृष्णदेवाने यादव साम्राज्यात भरच घातली.

**कृष्णदेवाचे सैनिकी विजयः**

कृष्णदेव सत्तेवर आला तेव्हा माळव्याच्या परमार सत्तेची दुर्दशा झालेली होती. इ. स. १२३४-३५ मध्ये अल्तमश सुलतान ह्याने माळव्यांवर आक्रमण केले व उज्जयिनी मंदिराचा नाश केला. त्याचे हे आक्रमण इतक्या भीषण स्वरूपाचे होते की, सर वोल्स्ले हेग या इतिहासकाराचा तर अल्तमशाने संपूर्ण माळवा जिंकून घेतला असा ग्रह झाला. माळव्याचा दुर्बल परमार सम्राट देवपाल हा या आक्रमणाचा प्रतिकार करू शकला नाही. यामुळे माळव्यातील परमारांच्या सत्तेला प्राणांतिक धक्का बसला ह्यात मात्र संशय नाही. देवपालानंतर जैतुगीदेव हा परमार सिंहासनावर आला. पण परमारांची पडती बाजू सावरण्यास तोही असमर्थच होता. उत्तर भारतातील हिंदू सत्तेला

**१. मानूर शिलालेखाच्या विस्तृत विवेचनासाठी प्रतिष्ठान, डिसेंबर १९७० व डिसेंबर १९७१ हे अंक पहा. २. कृष्णदेवाच्या चिक्कमागडी शिलालेखातील कालोल्लेख 'स्वस्ति श्रीमतु यादवनारानणभुजबळप्रतापचक्रवर्ति श्रीकन्दारदेवेन ११ नेय नळसंवत्सर.' असा आहे. नळसंवत्सर शके ११७८ ला येतो. तेव्हा शके ११६७ (इ.स.१२४५-४६) हे कन्हरदेवाचे पहिले राज्यवर्ष येऊ शकेल. यादवशिलाताम्रशासनात कालगणनेचे घोटाळे नेहमीच होतात. त्याचे विवेचन मागे पृष्ठ ७४, ७५, ७६, ८५ व ८६ वर पहावे.**

खग्रास ग्रहणाचे वेध लागले होते. अशा वेळेस यादव परमारास सहाय्य करते तर परमारांची बाजू सावरली गेली असती व यादव राज्यावर पुढील १-२ पिढ्यातच इस्लामी आक्रमणाचे संकट कोसळले नसते. कृष्णदेवाच्या शके ११७२ च्या ममदापूर शिलालेखात त्याच्या मालव विजयाचे स्पष्ट उल्लेख आहेत. त्याअर्थी शक ११७२ (इ. स. १२७०) पूर्वी त्याने मालव राज्यावर आक्रमण केले असावे, असे दिसते.

उत्तरेत यादवांशी स्पर्धा करणारी दुसरी सत्ता म्हणजे गुजराथचे वाघेला राजे. हेमाद्रीने राजप्रशस्तीत कृष्णदेवाच्या वाघेला वीसलदेवाच्याविरुद्ध आक्रमणाचा स्पष्टपणे उल्लेख केला आहे. तो असा-

**येनाकारि विशालवीसलचमूसंहारकालानले ।**
**हेलोन्मूलितमूलराजसमरे निर्वीरमुर्वीतलं ॥**

यावरून कृष्णदेवाने वीसलदेवाच्या विशाल सैन्याचा पराभव केला असे दिसते.[३]

दक्षिणेत यादवांचे परंपरागत वैरी म्हणजे द्वारसमुद्रचे होयसळ यांनी यादवांविरुद्ध गुजराथच्या वीसलदेवाशी सख्य जोडले. साहजिकच कृष्णदेवाने होयसळांविरूद्ध सैन्य पाठविले. बीचणाचा नातू चामुंडराय (चौंडरस ) ह्याच्या नेतृत्वाखाली यादव सैन्य होयसळ प्रदेशात शिरले असे दिसते. कारण त्याच्या बेंडिगेरे ताम्रपटात त्याला 'होयसळ-चक्रवर्ती-सोमेश्वर -मदनिर्वारिण' अशी पदवी लावली आहे. होयसळ राज्यावर यावेळी पांड्यांनीही आक्रमण केले. जटावर्मन सुंदर पांड्य हा पांड्य कुळातील सर्वात पराक्रमी राजा. त्याने होयसळांच्या प्रदेशावर आक्रमण करून त्यांची दक्षिणेतील उपराजधानी कन्नानूर-कोप्पम (श्रीरंगपट्टमच्या उत्तरेस पाच मैल. पांड्यांविरुद्ध चोळांना मदत करण्यासाठी सोमेश्वराने ह्या ठिकाणी आपली उपराजधानी ठेवून त्या गावाचे नवीन नाव विक्रमपूर असे ठेवले होते.) ही जिंकून घेतली. साहजिकच सोमेश्वराला कन्नानूर सोडून पळ काढावा लागला. यावेळी होयसळांबरोबर यादवही पांड्यांविरुद्ध लढले असे जे. श्री. आयंगार ह्यांनी ध्वनित केले ते मात्र चूक आहे.[४] पांड्य आणि यादव ह्यांच्यात संघर्ष होण्याचे काहीच कारण नव्हते. उलट होयसळांच्या अडचणीचा लाभ घेऊन यादवांनी होयसळांच्या राज्याचा बराच प्रदेश जिंकून घेतला असावा. कारण कृष्णदेवाचे शिलालेख अगदी चित्तलदुर्ग जिल्ह्यापर्यंत सापडतात.

यादवांचे दुसरे शत्रू म्हणजे वरंगलचे काकतीय. पण त्यांच्याशी कृष्णदेवाचे युद्ध झाल्याचे

**३. त्याच्या मालव व गुजरात विजयाची अतिशय काव्यमय वर्णने त्याच्या बेहट्टी व बेंडिगेरे येथील ताम्रपटात येतात. रामचंद्रदेवाचे पैठण ताम्रपटातील 'रे रे गुर्जर जर्जर व्रज रजो राजिं भराजीवनं रे रे मालव मालवं त्यज भज त्वं चोल चोलांचलम् ।' या श्लोकार्धातही कृष्णदेवाच्या मालव व गुर्जर प्रदेशावरील आक्रमणाचे संकेत आहेत. ४. Struggle for Empire, page 232, डॉ. वर्मा यांनी असे स्पष्टपणे दाखवून दिले आहे की, यादव व चोळ ह्यांच्यात संघर्ष झाला असण्याची फारशी शक्यता नाही. (The Yadavas and their times, Page 116-120).**

दिसत नाही.

यादव रामचंद्रदेवाचे पुरुषोत्तमपुरी ताम्रपटात कोणा कामपाल राजाचे नांव आहे.[५] या कामपालचा पराभव करून कृष्णदेवाने गोकुळाला आनंदित केले असे वर्णन आहे. कृष्णदेव यादवाचे तासगांव ताम्रपटात त्याचे मांडलिक चंद्र व केशव यांनी गोपकपालक नावाच्या राजावर विजय मिळविल्याचे वर्णन आहे. या दोहोंची सांगड घालून हा कामपाल कोणी आभीर राजा असावा. असा डॉ. मिराशी तर्क करितात. पण या तर्कांना काहीच आधार नाही. मूळ पुरुषोत्तमपुरी ताम्रपटातील श्लोक असा -

**यः कामपालः प्रसरच्चरित्रः**
**स्वयंवरायातविशाललक्ष्मीः**
**उल्लासयन् गोकुलमादरेण**
**कृष्णत्वमुच्चैः प्रकटीचकार ॥ ७ ॥**

या श्लोकाचा सरळ अर्थ असा की, कृष्णदेव यादवाने कामपालाप्रमाणेच (पौराणिक श्रीकृष्णाप्रमाणे) आपले पराक्रम व्यक्त केले. स्वयंवरातून लक्ष्मी (स्त्री, वैभव) प्राप्त केले.[६] गोकुळात (स्वतःच्या गोत्रकुळात)[७] आनंदाचे वातावरण व उल्हास निर्माण केला व अशा तऱ्हेने कृष्णत्त्व प्रकट केले. (पौराणिक श्रीकृष्णाशी आपले साम्य प्रकट केले)

अर्थात इथे कोणी कामपाल नावाचा राजा होता व त्याचा पराभव करून कृष्णदेवाने गोकुळात आनंद निर्माण केला असा अर्थ गृहीत धरण्यास फारसा वाव नाही, ही गोष्ट स्पष्टच आहे.

गोपकपालक राजा हा खानदेशातील आभीरनृपती असावा असा तर्क डॉ. मिराशी करतात. पण त्यास काही आधार नाही. ग. ह. खरे गोपक> गोअक>गोवा असा अर्थ घेऊन गोपकपालक म्हणजे गोव्याचा कदंब राजा असा अर्थ घेतात. तर डॉ. वर्मा मोराएस यांचे मत उद्धृत करून गोव्याचा कदंब शिवचित्त षष्ठदेव तृतीय व त्याचा जावई (डॉ. वर्मा ह्यांचे म्हणण्याप्रमाणे मेहुणा नव्हे) रट्ट कामदेव यांनी मिळून यादवांविरुद्ध युद्ध पुकारले व यादवांनी त्यांना पराभूत केले असे लिहितात व हा रट्ट कामदेव म्हणजेच पुरुषोत्तमपुरी ताम्रपटात उल्लेखिलेला कामदेव असे

**५. कामपाल म्हणजे बलदेव (अमरकोश स्वर्गवर्ग क्र. ४६ पहा) पण प्राचीन काळी कृष्ण व बलराम यांच्यात अभेद समजला जाई व कदाचित् बलरामाचीनांवे कृष्णासाठीही वापरली जात. उदाहरणार्थ, 'केशवःधृत हलधररूप जयजगदीशहरे।' ही जयदेवाची अष्टपदी पहा. येथे श्रीकृष्णासाठी हलधर हे नाव वापरले आहे, तसाच प्रकार कामपाल या नावाचे बाबतीत झालेला दिसतो. ६. अमृतमंथनानंतर लक्ष्मीने विष्णूला माळ घातली, हा संदर्भ येथे अभिप्रेत दिसतो. येथेही कृष्णदेव यादवाच्या पत्नीचे नाव लक्ष्मी होते, असा ध्वनी निघतोच. ७. प्राचीन शिलाताम्रशासनात असले श्लेष मुद्दाम ओढून ताणून आणले जात असत.**

म्हणतात. पण मूळ पुरुषोत्तमपुरी ताम्रपटात कामपाल नावाचा कुणी राजाही नाही व त्याच्या पराभवाची वार्ताही नाही. ('यः कामपालः प्रसरच्चरित्रैः याचा अर्थ कामपालाचा पराभव केला असा कसा होऊ शकेल ?) तस्मात् कृष्णदेवाने गोव्याच्या कदंबावर आक्रमण केले या म्हणण्यास मुळीच आधार नाही.

मग हा गोपकपालक राजा कोण ? आमच्या मते हा अमरावती जिल्ह्यातील गाविलगढ या दुर्गाचा अधिपती असावा. गाविलगढच्या आसपास गवळी वंशाचे राज्य होते असे स्थानिक परंपरा अजूनही सांगते. गोपक> गोवअ> गोवल>गावल>गाविल असा अपभ्रंश शक्य आहे. शिवाय सिंघणाचे काळापासून विदर्भात यादवसत्तेचा जम हळूहळू बसत होता. सिंघणाचा एक शिलालेख बुलढाणा जिल्ह्यात आमडापूर येथे सापडला आहे. कृष्णदेव यादवाचा शके ११७७चा लेख अमरावती जिल्ह्यात नांदगांव खंडेश्वर येथे आहे. तर दुसरा चांदा जिल्ह्यात मार्कंडी येथे आहे. अर्थात कृष्णदेवाने पूर्व विदर्भ हळूहळू जिंकण्यास सुरुवात केली होती असे दिसते. त्यातच त्याने अमरावती जिल्ह्यातील गाविलगढ या दुर्गम व महत्त्वाच्या दुर्गांवर आक्रमण केले असावे. या ठिकाणच्या अधिकाऱ्यांसच गोपकपालक म्हणत असावेत, असा तर्क संभवतो.

तस्मात् गोपकपालक व कामपाल यांची जोड घालणे कृष्णदेवास गोव्याच्या कदंबांविरुद्ध पाठविणे वगैरे गोष्टींची आवश्यकता नाही.

कृष्णदेवाने कौशल, चोळ इत्यादि राजांवरही आक्रमण केल्याचे उल्लेख आहेत. पण ते अतिशयोक्त स्वरूपाचे असून त्याकडे ध्यान देण्याची आवश्यकता नाही.

कृष्णदेवाच्या या वंशाचे शिल्पकार त्याचें सामंत आणि अधिकारी होते. त्यातील सर्वात महत्त्वाचा सामंत म्हणजे बीचणाचा नातू चौडीसेट्टी (चौडरस किंवा चामुंडराय) हा होय. त्याचा बेंडिगेरे ताम्रपट प्रसिद्ध असून त्यात त्याच्या पदव्या 'सर्वाधिकारी' व रायदंडनाथ अशा दिलेल्या आहेत. होयसळाविरुद्ध यादव आक्रमणाचा तोच प्रमुख होता असे दिसते. त्याची वंशावळ आता अशी मांडता येईल.




कृष्णदेवाच्या तासगाव ताम्रपटात त्याचे दोन सामंत चंद्र व केशव ह्यांच्या पराक्रमाचे वर्णन

आले आहे व त्यांनी अनुक्रमे कोंकणाधिपती व गोपकपालक यांचा पराभव केला, असे म्हटले आहे. त्यांची वंशावळ अशी-




याशिवाय महाप्रधान व सर्वाधिकारी ह्या पदव्या धारण करणारा जोगमराऊत हा कृष्णदेवाचा सिंदवाडी भागावरील शासक होता. तर तार्दावाडीच्या शासक महादेव राणेय हा होता. सूक्तीमुक्तावलीकार जल्हण हा कृष्णदेवाच्या हस्तिसेनेचा प्रमुख होता. त्याची वंशावळ अशी-




सूक्तीमुक्तावली हा संस्कृत कवींच्या सुभाषितांचा संग्रह असून, त्याच्या प्रस्तावना खंडात जल्हणाच्या पराक्रमाचे वर्णन आहे.

आम्ही प्रकाशित केलेल्या मानूर शिलालेखात (जिल्हा बीड) त्याच्या 'मायिराऊत' या देशाधिपतींचा उल्लेख असून, ह्या मायिराऊताच्याही हाताखालील 'भीवु थोराथ' ह्याने स्वतःच्या मातेचे स्मरणार्थ मानूर येथे देवालय बांधले असा उल्लेख आहे. हा शिलालेख ११७० कीलक संवत्सराचा आहे.

कृष्णदेवाचा काळ वाङ्मयाच्या दृष्टीनेही महत्त्वाचा ठरला. अमलांनंद सरस्वती यांनी वाचस्पती मिश्रांच्या 'भामती' या ग्रंथावरील आपली 'वेदान्त कल्पतरू' ही टीका कृष्णदेवाचे काळातच लिहिली, असा या ग्रंथाच्या पुष्पिकेत स्पष्ट उल्लेख आहे.[९]

स्वतः कृष्णदेव हाही परमधार्मिक होता. त्याने अनेक यज्ञ करून धार्मिक कृत्यांना उत्तेजन दिले व त्यामुळे 'धर्म' पुन्हा तरुण झाला, असे वर्णन हेमाद्रीच्या राजप्रशस्तीत आहे.[१०]

**८. हा जल्हणपंडित सूक्तिमुक्तावलीकर्त्या जल्हणापेक्षा वेगळा आहे. ९. भ्राता महादेवनृपेण साकं । पाति क्षितिं प्रागिव धर्मसुनौ ॥ कृता मया यः प्रवरः प्रबंधः । प्रगल्भ वाचस्पती भाववेदी ॥. १०. येनानेक महाफलक्रतुकृता संवर्ध्यमानोनिशं । क्षीणः कालवशात्पुनस्तरूणतां धर्मोपि संप्रापितः ॥ राजप्रशस्ती ४६ ॥.**

महानुभाव वाङ्मयातही कृष्णदेवाचे उल्लेख येतात. एकदा तो लोणार येथे गेला असता तेथील गुरुवाने सांगितले, 'पुरुषु एकु भैरवी असती' यावर कृष्णदेवाने तारातीर्थावर श्रीचक्रधरांचे दर्शन घेतले. 'हड्डपाते वाखारी मागितली : तीया आसूचे पूजा दर्सन केलेः' पण चक्रधर ती सोन्याची नाणी घेईनात. तेव्हा कृष्णदेवाचे लोक म्हणाले, 'देवव्हो : घेया : घेयाः सींगुणाचा कान्हु प्रसन्न जाला' तेव्हा रागावून कृष्णदेवच म्हणाला, 'सरा रे : ऐसे काइ म्हणत असा रे : कान्हु तो तुम्हासि कीं : यासि काइ कान्हु :' यावरून साधु सत्पुरुषांशी कृष्णदेव कसा नम्रतेने वागत असे ते दिसते. चक्रधरांना अर्पण केलेले द्रव्य त्याने परतही घेतले नाही. त्या द्रव्याचा उपयोग करून त्याने कुमारेश्वर या मंदिराची पौळी (पाळी, देवळाचा प्राकार, तट) बांधली.[११]

यामुळेच चक्रधरांचे मनात कृष्णदेवाबद्दल आपुलकीची भावना होती. पुढे वेरूळला असता, 'एकुदीस : राजधर्माचिया गोष्टी निगालीआ : माहादेओ राजा राज्यधर्मे जाणे : कान्हरदेवो आस्तिक : कान्हरदेवो आस्तिक : रामदेवो नीपरवस :' असे उद्गार स्वामींनी काढले.[१२]

यावरूनही कृष्णदेवाबद्दल सामान्य जनांच्या मनात काय भावना होती, ते आपणांस कळते. त्याने आपले पैतृक राज्य नीट सांभाळून त्याचा विस्तार केला. धर्माने व न्यायनीतीने राज्य चालविले.

****

---

**११. डॉ. शं. गो. तुळपुळे, लीळाचरित्र, एकांक लीळा क्र. ३९. १२. तत्रैव, पूर्वार्ध, भाग पहिला, लीळा क्र. ८२.**

# महादेव

कृष्णदेवाचा पुत्र रामचंद्र हा कृष्णाच्या मृत्यूसमयीही अल्पवयीच होता असे वाटते. उलट कृष्ण व महादेव ह्या दोघा भावांच्या वयात फारसे अंतर नव्हते. म्हणून दोघांनी परस्पर सहकार्याने यादव साम्राज्याची धुरा वाहिली असे दिसते. हेमाद्रीच्या राजप्रशस्तीत सिंघणानंतर कृष्ण व महादेव यांचा एकत्रच उल्लेख असून त्यांना रामलक्ष्मणांची अन्वर्थक उपमा दिली आहे.[१] अमलानंद सरस्वतीच्या वेदान्तकल्पतरू ह्या ग्रंथातही कृष्ण व महादेव हे दोघे मिळून राज्य चालवीत होते असा निर्देश आहे.[२] महानुभावीय ग्रंथ लीळा चरित्राच्या वाईदेशकर पाठातूनही कृष्ण व महादेव हे संयुक्तपणे शासन करीत होते असा ध्वनी निघतो.[३] शके ११७७ च्या निडोनी शिलालेखात 'कन्हारदेव महादेवविजयराज्यं उत्तरोत्तरं देवगिरीय गेय्युमिरे' असा स्पष्टच उल्लेख आहे.

यावरून कृष्ण व महादेव ह्या दोघांचेही देवगिरीवर संयुक्त राज्य होते असा कुणाचाही ग्रह होणे स्वाभाविक आहे. पण तशी शक्यता गृहीत धरताना काही अडचणी समोर येतात.

१) त्यातील पहिली अडचण अशी की, जर अशा प्रकारचे द्वैराज्य (Dual kingship) यादव राज्यात असते, तर शके ११७७ पासून पुढील सर्व यादव लेखात शासक म्हणून कृष्ण व महादेव या दोघांचीही नावे यावयास हवीत पण तशी ती येत नाहीत.

२) निडोनीचा हा शिलालेख कृष्ण व महादेव यांची नावे एकत्र देणारा असा एकटाच आहे व तोही सुदूर कर्नाटकात सापडला आहे. महाराष्ट्रात कृष्णदेवाचे किमान दहा तरी शिलालेख सापडले आहेत. त्यातील एकातही कृष्ण व महादेव यांच्यात संयुक्त राज्याचा उल्लेख नाही व कृष्णदेवाच्या उण्यापुऱ्या साठ शिलालेखातही संयुक्त राज्याचा उल्लेख करणारा हा एकच शिलालेख आहे.

३) याचाच अर्थ असा की, कृष्ण व महादेव यांच्या वयात फारसे अंतर नसल्यामुळे महादेव शासकीय कामात कृष्णाला साहाय्य करीत असावा व त्यामुळे जनसामान्यात त्यांचे संयुक्त शासन आहे. अशी समजूत रूढ झाली असावी.

४) अमलानंद सरस्वतीच्या वेदान्तकल्पतरू या ग्रंथाच्या पुष्पिकेतून इतकाच ध्वनी निघू शकेल की, कृष्णदेव सम्राट होता व महादेव त्याला राज्यकार्यात साहाय्य करीत होता. हाच अर्थ डॉ. रित्ति ह्यांनीही स्वीकारला आहे व तो योग्यच आहे. अर्थात कृष्ण व महादेव यांचे संयुक्त शासन

---

**१. धर्मार्थाविव तौ साक्षात्पालयन्तौ वसुंधराम्।**
**विलोक्य लोकं सस्मार राजानौ रामलक्ष्मणौ॥ राजप्रशस्ती(ब)श्लोक १०**
**२. कृष्णे क्ष्माभृति भूतलं सह महादेवेन् संबिभ्रति॥ ३. 'कान्हरदेयराय दर्शना आला : समागमे महादेवराय धाकुटा होता.' डॉ. य. खु. देशपांडे, महानुभावीय मराठी वाङ्मय, पृष्ठ ५.**

गृहीत धरण्याची फारशी आवश्यकता नाही.[४]

महादेवाचा काळेगांव ताम्रपट हा अतिशय महत्त्वाचा असून त्याची तिथी २९ ऑगस्ट १२६१ इ. स. अशी आहे व हे दानपत्र महादेवाने आपल्या राज्याभिषेकसमयी (आत्मनःपट्टबंधसमये) दिले आहे. त्याचे पहिले राज्यवर्ष शक ११८० (इ. स. १२५९) पासून देणारेही लेख आहेत. असे घोटाळे यादव शिलाताम्रशासनात नेहमीच होतात.

स्वतः महादेवाचे शिलालेख, रामचंद्रदेवाचे लेख व हेमाद्रीची राजप्रशस्ती यातून महादेवाच्या पराक्रमाची वर्णने आपणांस उपलब्ध होतात. हेमाद्री हा महादेवाच्या हाताखालीच श्रीकरणाधिप (Accountant General) असल्यामुळे आपल्या स्वामीची स्तुती त्याने मुक्तकंठाने गायली आहे. मोठ्या राजप्रशस्तीत हेमाद्री लिहितो-

**तल्लिंगक्षितिपालतूलनिचयप्रक्षेपझंझानिलो**
**गर्जद्गुर्जरगर्वपर्वभिदादंभोलिदोर्विक्रम**
**हेलोन्मूलितकौंकणक्षितिपतिः कर्णाटलाटोद्भट-**
**क्षोणीपालविडंबनः स हि ममहादेवः कथं वर्ण्यते ॥४८॥**
**यो भोजदेवान्नृपतेः प्रतापी जग्राह वाहं मदमन्दसत्त्वः**
**सार्धंजनन्या सह जीवितेन सोमेश्वररस्यापि जहार राज्यं ॥४९॥**
**यदीयगन्धद्विपगण्डपालीनिष्ठ्यूतदानांबुतरंगिणीषु**
**सोमः समुद्रप्लवपेशलोऽपि ममज्ज सैन्ये सह कुंकुणेशः ॥५०॥**

तर लहान्या राजप्रशस्तीत हेमाद्रीने आणखी दोन श्लोकांत महादेवाचे पराक्रम वर्णिले आहेत ते असे

**अथो शिशुस्त्रीशरणागतानां**
**हन्ता महादेवनृपो न जातु**
**इत्थं विनिश्चित्य ततो तिभीतैः**
**आंध्रे पुरंध्री निहिता नृपत्वे ॥१४॥**
**अत एव हि मालवेश्वरः शिशुमेव स्वपदे न्यवेशयत्**
**स्वयमाशु विहाय संपदः कपटंनैव चिरं तपस्यति ॥१५॥**

या श्लोकाचा अर्थ असा की, महादेवाच्या पराक्रमाच्या झंझावातासमोर तेलंग राज्यरुपी गवताचा भारा उडून गेला. त्याने आपल्या पराक्रमरुपी वज्राने गुर्जर राजाचा पर्वतप्राय गर्व भग्न केला, त्याने भोजदेवाचा पराभव केला व कोंकण राजा समुद्र तरण्यात पटाईत असूनही समुद्रात बुडून मेला.

---

**४. या विवेचनाचे पार्श्वभूमीवर महादेवाने कृष्ण जिवंत असतानाच सार्वभौमत्वसूचक बिरुदे धारण केली, पण यादव राज्यावर त्याचा अधिकार मात्र शके ११८४ च्या त्याच्या राज्याभिषेकानंतर सुरू झाला, हे डॉ. वर्मांचे मत चिंत्य वाटते.**

महादेव स्त्री व लहान मुले यावर शस्त्र धरीत नाही, हे जाणून आंध्रांनी एका स्त्रीला राज्यावर बसविले, तर मालव राजा एका मुलाला राज्यपद देऊन स्वतः संपत्ती सोडून जंगलात गेला.

हे वर्णन जरी काव्यमय व अतिशयोक्त असले तरी त्यातून महादेवाच्या शत्रूंचा पत्ता लागतो.

१. मालव देशाचा राजा
२. गुजराथचा वीसलदेव वाघेला
३. कोंकणचा अधिपती सोमेश्वर
४. वरंगलची काकतीय राणी रुद्रांबा
५. भोजनृपती

१. मालव देशाचे परमार व यादव यांच्यातील वैर परंपरागत होते. कृष्णदेवाने जैतुगीदेव परमाराच्या दुर्बलतेचा लाभ घेऊन त्याच्यावर आक्रमण केल्याचे आपण मागे पाहिलेच.[५] पण माळव्याच्या परमाराच्या दुर्दैवाचे दशावतार अजूनही पूर्ण झालेले नव्हते. मुस्लीम सुलतानांची सतत आक्रमणे माळव्यावर चालूच होती, त्यातच गुजराथचे वाघेला आणि रणथंभोरचे चाहमान यांनीही माळव्यांवर आक्रमणे करावयास प्रारंभ केला. शक ११९२ (इ. स. १२७०) च्या आसपास तर माळवा गृहयुद्धाने पूर्णपणे ग्रासला गेला होता. अशा अवस्थेत काही काळपर्यंत एखाद्या अल्पवयी राजपुत्राच्या नावाने शासन चालले असल्यास नवल नाही. हेमाद्रीचे वर्णन अशाच एखाद्या घटनेला उद्देशून असावे.[६]

गुजराथच्या वीसलदेवाविरुद्ध महादेवाच्या आक्रमणाची वर्णने त्याच्या स्वतःच्या काळेगांव ताम्रपटात, संगूर शिलालेखात व रामचंद्रदेवाचे पैठण ताम्रपटात सापडतात.[७]

पश्चिम महाराष्ट्रात यादवांची सत्ता सिंघणाचे काळापासूनच कोल्हापूर पर्यंत पोचली होती, हे आपण मागे पाहिलेच. पण कोंकणावर अजूनही शिलाहारांचे (उत्तर कोंकणचे शिलाहार) यांचे स्वतंत्र राज्य होते. त्यांची राजधानी स्थानक (आधुनिक ठाणे) असल्यामुळे त्यांना ठाण्याचे शिलाहार म्हणतात. महादेवाने शिलाहार सोमेश्वराविरुद्ध मोठी सेना पाठविली. सोमेश्वराने या

---

५. डॉ वर्मा मात्र कृष्णदेवाने जयवर्मन द्वितीय, अर्जुनवर्म द्वितीय, भोज द्वितीय, व जयसिंह चतुर्थ ह्या चार मालव राजांचा पराभव केला असे म्हणतात, ते अतिशय चूक आहे. यातील शेवटचे तीन राजे कृष्णदेवाचे मुळीच समकालीन नव्हते. (The Yadavas & their times, page 134). ६. डॉ. रित्ति यांचे मत असे की, हा अल्पवयी राजपुत्र म्हणजेच माळव्याच्या परमार घराण्याचा उपान्त्य राजा भोज द्वितीय असावा, हे चूक आहे. कारण तो महादेवाच्या कधी समकालीन नव्हता.

७. तस्यानुजो निजभुजार्पितभूमिभारः
स्वच्छंदधारमुदितोरगसार्वभौम ः
यो वीसलं समरकौतुकिनं सुराणां
अग्रे समूलविभवं दलयांचकार ॥ १९ ॥ पैठण ताम्रपट

युद्धात आपले नौदलही उपयोगात आणलेले दिसते. ठाणे जिल्ह्यात बोरिवली रेल्वे स्टेशनजवळ काही वीरगळ (युद्धात मरण पावलेल्या वीरांची स्मारके)डॉ. कझेन्सला आढळले. यात काही वीर नौदल युद्धात भाग घेताना दाखवले आहेत. याच ठिकाणी यादव-शिलाहार यांचे युद्ध होऊन त्यात धारातीर्थी पडलेल्या शिलाहार सैनिकांची ही स्मारके आहेत. असे डॉ. कझेन्सचे मत आहे.

हे युद्ध कधी झाले असावे ? लीळाचरित्राच्या पूर्वार्धात श्रीचक्रधर सिंनर येथे असता, 'महादेवो राओ ठाणेया कटकै गेला होता : तो सिंनरा आला :' असा उल्लेख आहे. 'कटकै' म्हणजे कशाकरिता ? रत्नमाळास्तोत्र ही लीळाचरित्रावरील संस्कृत रचना. ती सांगते-

**एलापुराद्‌गतो राजा प्रजासंस्थामिषेण वै**
**स्वामिनो दर्शनोत्कंठ्यो यथा धनगतः पुमान्**
**तथा राजा गतो दिव्यं नगरं श्रीनिकेतनं**
**तत श्चक्रधरे श्रुत्वा स्वपुरे पौर्वजे मठे ॥**

म्हणजे महादेव राजा ठाण्याकडे प्रजेच्या सुखसोयीच्या दृष्टीने फिरतीवर गेला होता. शके ११८९-९० (इ.स. १२६७-६८) च्या सिंहस्थानंतर स्वामींच्या आयुष्याचा पूवार्धकाल सुरू होतो. अर्थात् यापूर्वी ठाणे भागावर महादेवाचे आधिपत्य पूर्णपणे प्रस्थापित झाले होते असे दिसते. शक ११८८-८९च्या आसपास महादेवाने कोंकण जिंकले असावे असे दिसते. डॉ. हसमुख धीरजलाल सांकलिया व डॉ. आदिनाथ नेमिचंद उपाध्ये या दोघा विद्वानांनी शके ११८८ चा एक शिलालेख संपादिला आहे.[८] यात एका जैतुगीदेवाचे नाव असून त्याची बिरुदे महाराजधिराज, कौंकणचक्रवर्ती व रायपितामह अशी दिली आहेत. या शिलाहार घराण्याच्या परंपरागत पदव्या आहेत. त्या अर्थी हा जैतुगीदेव सोमेश्वरानंतर कोंकणचा राजा झाला असे दिसते. पण जैतुगी या नावावरून तो यादव वंशातील वाटतो. प्राचीन काळी आजाचे नाव नातवाला ठेवण्याची पद्धत होती. तेव्हा हा जैतुगी महादेवाचाच पुत्र दिसतो. तेव्हा यादवांची वंशावळ आता अशी मांडता येईल -




८. E.I. Vol. XXVI, page 127-30.

महादेवाने कोंकण जिंकल्यानंतर शासक म्हणून त्यास तिकडे पाठविले असावे व उपर्युल्लेखित शिलालेखात सोमेश्वर शिलाहाराच्या सर्वच्या सर्व पदव्या त्याच्या नावामागे लावल्या गेल्या असाव्यात. अर्थात शके ११८८ पूर्वी महादेवाने ठाणे जिंकले हे नक्की.

वरंगलचे काकतीय हेही यादवांचे परंपरागत शत्रूच. यावेळी काकतीय सिंहासनावर गणपतीची कन्या रुद्रांबा ही होती. हेमाद्रीने महादेवाच्या आंध्र राज्यावरील आक्रमणांचे केलेले वर्णन वर उद्‌धृत केलेच आहे. महादेवाने तेलिंगाधिपतीचा पराभव करून त्याचे गजदल व पंचमहावाद्ये हरण केली असेही हेमाद्री सांगतो.[९] एकाम्रनाथाच्या प्रतापचरित्रमु ह्या ग्रंथात महादेवाने वरंगललाच वेढा घातला, रुद्रांबाने त्याचा पराभव करून त्याचा देवगिरीपर्यंत पाठलाग करून त्याच्याकडून एक कोटी सुवर्णनाणी खंडणी म्हणून घेतली. इत्यादि विपर्यास्त व अतिरंजित वर्णन आहे.[१०] ज्या प्रतापचरित्रमुच्या कर्त्याला रुद्रांबा कुणाची कन्या होती, हेही नीट माहीत नाही. त्यावर विश्वास ठेवणे कठीण वाटते.

महादेवाच्या संगूर शिलालेखात त्याला 'तेलंगरायशीर्षकमलमूलोत्पाटन' पदवी लावली आहे. वास्तविक ही जैतुगी प्रथम ह्याची पदवी. ती सर्वच यादव राजांनी वंशपरंपरा वापरली असे दिसते.

आता उरले होयसळ हेमाद्रीच्या राजप्रशस्तीत महादेवाने होयसळ राजांची अवस्था हास्यास्पद करून टाकली असे वर्णन आहे तर होयसळांच्या शिलालेखातून नित्याप्रमाणे यादवांच्या पराभवाचे उल्लेख आहेत. होयसळनृपती नरसिंह आता वृद्ध झाला होता. त्याचे पुत्र सोमेश्वर व रामनाथ आपसात भांडत होते. होयसळ राज्य अस्ताचलाकडे झुकू लागले होते. अशा अवस्थेत महादेवाने होयसळांचा पराभव केला असणे शक्य आहे.

महादेवाने पराभूत केलेल्या भोज नावाच्या राजाचा मात्र नीटसा शोध लागत नाही.

याप्रमाणे महादेवाने आपल्या साम्राज्याच्या चारही दिशांवर सैनिकी अभियाने काढून आपल्या साम्राज्याचा विस्तारच केला.

त्याचे हाताखालील सामंत पराक्रमी व विश्वासू होते. त्यापैकी देवराज ह्याची वंशावळ

---

९. वाहानामपि यस्यवैरीविषयेप्यातन्वतां धन्विनां
-आतिल्लिंगनृपांगणादनुदिनं बाह्यादिलीलाभवत्
यस्तत्थैव रणे जहार करिणस्तत्पंचशब्दादिकान्
यस्तत्याज वधूवधादुपतस्तद्भूभुजं रुद्रमाम् ॥ ५२ ॥

१०. कृष्णा जिल्ह्यात काही यादव नाणी सापडली आहेत. ती या रुद्राम्माला यादवांकडून मिळालेल्या खंडणीपैकीच असावीत असाही हास्यास्पद तर्क काही संशोधकांनी लढविला आहे. नाणे हे नेहमी उपयोगात येणारी वस्तू कुठल्याही ठिकाणी व्यापारी, प्रवासी, तीर्थयात्रेकरू यांचेबरोबर जाऊ शकते, एवढे भान तरी ठेवावयास हवे. डॉ. रित्ति एका कुठल्याही आगापिछा नसलेल्या शिलालेखाचा आधार देऊन रुद्रांबेने महादेवाचा पराभव केला असावा, असे विधान करतात त्यात काही फारसे तथ्य नाही.

अशी."[११]

चावुंडरस > अमितरस > देवराज

ह्या देवराजाने सोन्नलिंगे (आधुनिक सोलापूर) येथे सिद्धरामेश्वराचे दर्शन घेऊन चंगूर गांव येथील देवालयास दिला.

कूच दंडेश किंवा कूचि हा त्याचा अधिकारी धर्माने जैन होता. त्याचा बेतुरू शिलालेख शके ११९२ प्रजापती संवत्सराचा आहे. तो महासेन मुनींचे शिष्य पद्मसेन मुनी यांचा शिष्य होता. तो सिंहदेव व मल्लांबिका यांचा पुत्र होता. त्याची पत्नी लक्ष्मीदेवी स्वर्गस्थ झाल्यावर त्याने तिचे स्मरणार्थ लक्ष्मी जिनालय नावाचे मंदिर बांधले व हुणिसेयहल्ली हे गाव त्यास दान दिले. बारा होन घेऊन पूजा करणारा एक उपाध्यायही मंदिरास लावून दिला. त्याचा भाऊ चट्ट व पुत्र वोणदेव होता.[१२]

महादेवाच्या आणखी काही लेखातून महादेवाचा सर्वाधिकारी व महाप्रधान तिप्परस, बोम्मरस, विठ्ठरस इत्यादींची नांवे येतात.[१३]

स्वतः महादेव मोठा रसिक व गुणीजनांचा आदर करणारा होता, असे दिसते. लीळचरित्रातील उल्लेखावरून त्याला जुआ > द्यूत > सारीपाट खेळण्याचे व्यसन होते असे दिसते. म्हणून लोक त्यास 'जुआरी राओ महादेव' असे म्हणत असत. पैठणच्या माईता हरी नावाच्या एका रसिकाने चक्रधरांजवळ 'सारी खेळों आम्हींची जाणो : सारी खेळतां सारी जुवारुं महादेवोरावो जींतला :' अशी प्रौढी मारली होती.[१४]

महादेवाला शिकारीचेही मोठे व्यसन असावे. वेरुळजवळ कान्हारळा नावाच्या तलावाकाठी मोठे रान त्याने शिकारीसाठी राखीव ठेवले होते.[१५] लीळाचरित्रावरून त्याच्या पत्नीचे नाव वैजायी असे होते व तिने पैठणला एक शिवालय बांधून त्याचे नांव वैजनाथ असे ठेविले.[१६] महादेवरायाला श्रीचक्रधरांच्या दर्शनाची मोठी इच्छा होती. तो सिंनरला गेला असता आपला सेवक पाल्हाडांगिया याला स्वामींना शोधण्यासाठी पाठवला. स्वामी वेरुळला असताही तो दर्शनासाठी तीन वेळा निघाला पण अपशकुनांमुळे राहिला. त्याचा राऊत शालिवाहन हा स्वामींचा भक्त

११. महादेवाच्या काळतील संगूर शिलालेख. १२. बेतुरु शिलालेख, जैन शिलालेख संग्रह तृतीय, भाग क्रमांक ५११. (या कूचिराजाने महादेवानंतर रामचंद्रदेवाचीहि सेवा केली.) १३. पंढरपूर येथील आसोर्याम इष्टीच्या लेखात त्याचा आणखी मांडलिक सितवाडक कुळातील भानु ह्याचे नांव येते, पण ते अस्पष्ट आहे. १४. लीळचरित्र, उत्तरार्ध भाग २, लीळा क्र. ३०५. १५. 'ते महादेवी राये तें रान राखीले होते' लीळाचरित्र, पूर्वार्ध भाग १, लीळा क्र. ५५. १६. तत्रैव लीळा. क्र. ९ व उत्तरार्ध भाग २, लीळा क्र. २८८.

होता. स्वामींनी त्यास हठयोग समजावून सांगितला.

श्रीचक्रधरांचे महादेवाबद्दल अनुकूल मत होते. 'महादेओ राज्यधर्म जाणे' असे त्यांनी एकदा बोलून दाखविले. तर दुसऱ्या एकाच वेळी 'महादेओ पात्र : एथीचेया दर्शना एईल : राज्य संपादिल : आपण सेवक होऊन वर्तेल :' असा विश्वास व्यक्त केला.[१७]

हेमाद्री व बोपदेव हे प्रख्यात पंडित महादेवाच्याच राजसभेत होते. त्यांचा विचार एका स्वतंत्र प्रकरणात केला आहे.

रामचंद्रदेवाचा पहिला उपलब्ध लेख म्हणजे पैठण ताम्रपट असून तो शके ११९३ चा आहे. अर्थात् ११९२ हे महादेवाचे शेवटचे वर्ष ठरते. अर्थात् महादेवाचा राज्यकाल शक ११८२ ते ११९२ (इ. स. १२६१-१२७०) असा ठरतो.

****

१७. लीळाचरित्र, पूर्वार्ध, लीळा क्र. ८२ व ८५.

# आमणदेव

महादेवानंतर त्याचा पुत्र आमणदेव हा यादव सिंहासनावर बसला. पण कृष्णदेवाचा पुत्र रामचंद्र हा स्वस्थ बसणे शक्यच नव्हते. त्याने आमणदेवाला पदच्युत करून आपले राज्य परत मिळविले. या घटनेचे पडसाद लीळाचरित्रातही उमटलेले दिसतात. ही घटना घडली तेव्हा चक्रधरांचे वास्तव्य पैठणजवळ सविता नागनाथ (आधुनिक सेवता.) या गावी होते. स्वामींनी इंद्रभटास तेल आणण्यासाठी गावात पाठविले.[१] ते तेल घेऊन आल्यावर स्वामींनी विचारले 'इंद्रेया गावांतु वार्ता काइ' तेव्हा इंद्रभट्ट उत्तरले 'जी : जी : कांही नाही.' तेव्हा चक्रधरांनी त्यास सांगितले 'वार्ता कैसी नाही : राज्यांतर जाले : रामदेओ रावो रार्जी बैसला : आमणदेओ खाली उतरीला : देवगिरी पालटीली : हा नव्हे लोकु पळतु असे : जा : वार्ता शोधा : तुमचे गावी सोइरि असती : आणि : वार्ता कैसी नेणा :' इत्यादि.[२]

याचा अर्थ असा की रामचंद्रदेवाने देवगिरीदुर्गावर अचानक आक्रमण करून तो जिंकून घेतला असावा. यामुळे अनेक लोक घायाळ झाले ते पळत सेवत्यापर्यंत आले. त्यांचे खटारे चक्रधरांनी इंद्रभटास दाखविले.

रामचंद्रदेवाच्या पैठण, एकनाथ संशोधन मंदिर व पुरुषोत्तमपुरी ह्या ताम्रपटातही या घटनेचे वर्णन करणारे श्लोक आहेत ते असे-

पैठण ताम्रपट :

तस्मादभूदामणभूमिपालः
समस्तमाहेश्वरमौलिरत्नः
आलिख्यतोच्चैः खुरलेखनीभिः
यद्वाजिभिर्दिक्षुजयप्रशस्तीः ॥ २० ॥
प्रसह्य तस्मादपहृत्य भुंक्ते
कृष्णात्मजः स्वामवनिं स रामः ।

---

१. केशिराजव्यासांच्या रत्नमाळास्तोत्रात या लीळेबद्दलचा श्लोक पुढीलप्रमाणे आहे. - ततः स भिच्छः समुपेत्य सायं। विप्रप्रयुक्तं समुपेत्य तैलं। समागतं ग्रामजनैरिं प्रप्रच्छ राज्यांतरजातवार्ताम्।

२. हिराइसा पाटात 'आमणदेयाचे डोळे काढिले : हे नव्हे घायाळे एते असति : म्हणौनि खाटारे दाखविले.' इतके वर्णन जास्त आहे, तर वाईदेशकर पाटात 'हातिसेहाणि मारिला : पाटसेहाणि भेदिला, नरसिंहदेओ पळाला' इतके विवरण जास्त आहे. याचा अर्थ असा की, रामचंद्राने आमणदेवाच्या हस्तिसेनेचा मुख्य (हातिसेहाणि) मारले व त्याच्या प्रधानमंत्र्यास (पाटसेहाणि) मारले याचे भाषांतर डॉ. वर्मा ह्यांनी 'सिंहाने हत्ती मारिला व सिंहाने पाठ मोडली' असे केले आहे. ते त्यांचा प्राचीन मराठी भाषेशी परिचय नसल्यामुळे असावे.

यातून आमणदेव हा परम शिवभक्त होता व रामचंद्राने बळाने त्याजपासून आपले पैतृक राज्य हिसकावून घेतले इतकाच ध्वनी निघतो, पैठण ताम्रपट ११९३ शकेचा म्हणजे रामचंद्राच्या अगदी पहिल्या राज्यवर्षाचा आहे. अर्थात् आपण आमणदेवास पदच्युत करून आपले पैतृक राज्य आपण परत मिळविले हे सांगण्यास रामचंद्रदेव तेव्हाही कचरत नव्हताच हे स्पष्ट होते व ते योग्यही आहे. कारण कृष्णदेव थोरला भाऊ असल्यामुळे महादेवामागून राज्यावर रामचंद्राचाच खरा अधिकार होता. महादेवाने आपला पुत्र राज्यावर बसविल्यामुळे रामचंद्राचा अधिकार हिरावून घेतला गेला व तो त्याने परत मिळविला इतकेच.

**पुरुषोत्तमपुरी ताम्रपट :** [३]

**आरुह्य वैरिक्षितिपालमौलि-**
**-निः श्रेणिभिर्देवगिरिं गरिष्ठं**
**प्रसह्य तस्मादपहृत्य भुंक्ते**
**कृष्णात्मजः स्वामवनिं स रामः ॥ १३ ॥**

इथे वैऱ्यांच्या मस्तकांची नसेनी (निश्रेणी = शिडी) करून रामचंद्र दुर्लंघ्य देवगिरीपर्वत चढून गेला व त्याने आमणदेवापासून आपले राज्य हिसकावून घेतले असा अर्थ आहे.

**एकनाथ संशोधन मंदिर व पुरुषोत्तमपुरी ताम्रपट :**

या दोन ताम्रपटांतून रामचंद्रदेवाने देवगिरीदुर्ग कसा जिंकून घेतला याचे वर्णन करणारा एक श्लोक येतो. तो असा-

**आदौ देवगिरिप्रवेशनमथो नृत्तप्रकारेक्षणं**
**पश्चात्स्वैरपदातिमेलनमथालंकारविक्षेपणम्**
**अन्विष्ठार्थविरोधिदूरकरणं तस्माद्वसासादनं**
**श्रीरामेण कृतं ततस्तत इतः श्लोकोऽस्य लोकोत्तरः ।**

पुरुषोत्तमपुरी ताम्रपटांचे संपादक डॉ. मिराशी ह्यांनी ह्या श्लोकातील पहिली ओळ 'आदौ देवगिरीप्रवेशनमथो नृत्त : प्रकारेक्षणं' अशी वाचून खालीलप्रमाणे अर्थ केला. 'रामचंद्राने नाचे लोकांचा वेश घेतलेल्या आपल्या काही सैनिकांसह देवगिरी दुर्गात प्रवेश केला, नंतर त्याने आपणास अनुकूल असलेले लोक जमवून शत्रूचे सैनिक नाच पाहाण्यात दंग झाले असताना त्याच्यावर हल्ला केला. त्याचे सैनिकही आपला घेतलेला वेश टाकून देऊन त्या गर्दीत मिसळले व त्यांनी शत्रूंच्या लोकांस कंठस्नान घातले. अशा रितीने रामचंद्राने राज्य प्राप्त करून घेतले :' इत्यादि. [४]

---

**३. या ताम्रपटात श्लोक ११ व १२ मध्ये आमणदेवाच्या गुणांची स्तुती गायली आहे.**
**४. संशोधनमुक्तावली, सर ४ था, पृष्ठ १५३.**

पण एकनाथ संशोधन मंदिर ताम्रपटाचे संपादक श्री. शिराळकर यांनी ही ओळ

आदौ देवगिरी प्रवेशनमथो वृत्तप्रकारेक्षणं अशी वाचली तर त्यामुळे डॉ. मिराशींच्या रामचंद्राने नाचे लोकांचा वेश घेऊन दुर्गात प्रवेश करणे ह्या कल्पनेला अर्थच राहात नाही.

हा श्लोक श्लेषाचे उत्कृष्ट उदाहरण असून त्यातून दोन अर्थ निघू शकतात. ते असे.[५]

| वाच्यार्थ | ध्वन्यर्थ |
| --- | --- |
| रामचंद्राने देवगिरी किल्ल्यात प्रवेश केला नंतर हेरांनी आणलेल्या वृत्ताचे निरीक्षण केले. नंतर पायदळ सैनिक जमवले. त्यांना अलंकारादिकांची लाच दिली. नंतर आपल्या विरोधकांना दूर केले व शेवटी दुर्ग जिंकला. म्हणून त्यांची कीर्ती (श्लोक) लोकोत्तर झाली. | आधी संस्कृत भाषेत प्रवेश केला. (आदौ देवगिरी प्रवेशनम्) नंतर वृत्तांचे प्रकार पाहिले. (वृत्तप्रकारे क्षणं) नंतर काव्यपदे एकत्र केली. (पदातिमेलनं) त्यात अलंकार योजना केली. (अलंकारविक्षेपणं) नंतर अनर्थकारी काव्यपदे दूर केली. (अन्विष्ठार्थविरोधि दूरीकरणं) नंतर श्लोकात रस निर्माण झाला. पश्चाद्रर सारसादनं) म्हणून हा श्लोक लोकोत्तर झाला. |

मिराशी यांनी या अर्थावर एकूण तीन आक्षेप घेतले आहेत ते असे-[६]

१. हेरांनी आणलेले वृत्त ऐकायचे असते पाहावयाचे नसते म्हणून वृत्तप्रकारेक्षणं (ईक्षण = पाहाणे) या शब्दांचा उपयोग अनुचित होईल.

२. आधी देवगिरी दुर्गात प्रवेश व मग हेरांचे वृत्त समजणे हा प्रकार घोड्यापुढे गाडी असा उलटा होईल.

३. राजद्रोही लोकांना अलंकार गुप्तपणे द्यावयाचे असतात फेकून नव्हे (अलंकार विक्षेपणं) असे आक्षेप ह्या अर्थावर संभवतात म्हणून डॉ. मिराशी शिराळकरांचा अर्थ त्याज्य मानतात. पण आमच्या मते शिराळकरांचाच अर्थ योग्य आहे. शिराळकरांचे अर्थात थोडा बदल करून जर असा अर्थ घेतला की रामचंद्राने देवगिरी दुर्गाचे आवारात प्रवेश केला (आदौ देवगिरी प्रवेशनम्) मग त्याने दुर्गाच्या प्राकाराचे (तटबंदीचे) निरीक्षण केले मोक्याच्या जागा हेरल्या (वृत्त प्र (प्रा) कारेक्षणं.)[७] आता डॉ. मिराशींचे पहिले दोन आक्षेप निरर्थक ठरतात.

अर्थात रामचंद्रदेवाने गुप्तरूपाने दुर्गात प्रवेश करून आमणास पदच्यूत केले हाच अर्थ संभवतो. त्यासाठी त्याने नाचे लोकांचा वेश घेतला वगैरे कल्पना करण्यात स्वारस्य नाही.

रामचंद्राच्या या कृत्यामुळे त्याला अनेकांनी दोष दिला आहे. पण त्याने आपले पैतुक राज्य

---

५. भारतीय इतिहास आणि संस्कृती, एप्रिल १९७०, पृष्ठ ४८-४९. ६. तत्रैव. जुलै १९७०, पृष्ठ १०. ७. प्राकारो वरणो सालः प्राचीनो प्रान्ततः वृत्ति । अमरकोश पुरवर्ग १९९ ॥ ताम्रपटाच्या कवीने 'प्राकार' बद्दल 'प्रकार' असा शब्द योजून ओढून ताणून श्लेष साधला आहे. कोण हा श्लेषांचा मोरोपंती हव्यास ! मध्ययुगात काव्यातील सौंदर्यापेक्षा पांडित्यालाच जास्त महत्त्व येऊ लागले होते. त्याचा हा पुरावाच होय.

परत घेतले यात त्याचा काय दोष ? त्याने आमणदेवाचे डोळे काढले, नरसिंहदेवास पळविले, इतरास मारिले ह्या कल्पना लीळाचरित्रातील हिराइसा, वाइंदेशकर, इत्यादि उशिराच्या पाठातील आहेत. त्या अफवा किंवा बाजारगप्पा आहेत हे निश्चित. तसे उल्लेख मूळ पिढीपाठात नाहीत. नंतर हा भाग कोणीतरी या कथेत घातला इतकेच. त्यामुळे रामचंद्रास क्रूर वगैरे म्हणणे योग्य नाही. तसे म्हणणे त्याच्यावर अन्याय करणारे होईल. त्याने स्वपराक्रमाने आपले पैतृक राज्य मिळविले इतकेच. तसा युद्धाचा प्रसंग तर छत्रपती शिवाजी महाराज व एकोजी राजे ह्या सावत्र भावातही आला होता म्हणून आपण महाराजांस दोष देत नाही. रामचंद्रास दोष द्यावयाचाच असेल तर तो त्याने मुसलमानांकडून दारुण पराभव स्वीकारल्याबद्दल अवश्य द्यावा. पण या राज्यांतराच्या घटनेत तो पूर्णपणे निर्दोषी आहे असेच म्हणावे लागेल.

****

# रामचंद्रदेव

रामचंद्राचा पहिला उपलब्ध लेख म्हणजे पैठण ताम्रपट असून तो बुधवार माघ शुद्ध द्वादशी प्रजापती संवत्सर शके ११९३ चा आहे. अर्थात शक ११९३ (इ. स. १२७१) पूर्वी रामचंद्रदेव सत्तेवर आला असला पाहिजे. पण नेहमीप्रमाणे यादव शिलालेखात त्यांच्या प्रथम राज्यवर्षाविषयी एकमत नाही. काहीत त्याचे पहिले राज्यवर्ष शक ११८८ (इ. स. १२६९) तर काहीत शक ११९७ (इ. स. १२७५) तर एका शिलालेखात तर ते शक १२२९ (इ. स. १३०७) इतक्या उशिराचे सुद्धा गृहीत धरले गेल्याचे दिसून येते. अर्थात् आपण इतकेच म्हणू शकतो की तो शक ११९३ च्या सुमारास आमणदेवास पदच्युत करून राज्यावर आला असावा. त्याच्या राज्याभिषेकाची निश्चित तिथी आपणांस माहीत नाही.[१]

आमणदेवाला पदच्युत करून रामचंद्र राज्यावर आल्यामुळे लोकमत त्याच्या बरेच विरुद्ध असावे. त्यामुळे त्याने लोकप्रियता संपादन करण्यासाठी ब्राह्मणांचा नव्या वृत्ति (इनाम) देऊन. अग्रहार करूनच राज्यकालाचा प्रारंभ केलेला दिसतो. लीळाचरित्राचा उत्तरार्धकाळ शके ११९३ नंतरच (आमणदेवाच्या पदच्युतीनंतर) प्रारंभ होतो हे सर्वश्रुत आहेच. उत्तरार्धाच्या अगदी प्रारंभीच (लीळा, क्र. ६) ब्राह्मणांस नवीन अग्रहारे व वृत्ती दिल्याचा उल्लेख आहे तो असा.

'नवी अघ्रें : ब्राह्मणांसि नवीया वृत्ती विधलिया : मा : चणेचि पिकति'

यावरूनही रामचंद्राने राज्यावर आल्याबरोबर ब्राह्मणांना अग्रहार करून दिले असे दिसते. त्याच्या राज्यकालातील अगदी पहिल्याच वर्षाचा उपर्युक्त पैठण ताम्रपट हा याच नवीन अग्रहारांपैकी एकाचा लेख दिसतो.

रामचंद्राच्या कालातील संस्कृत, मराठी व कानडी धरून १२५ च्यावर लेख उपलब्ध आहेत त्यातून त्याच्या सैनिकी विजयांची कल्पना आपणांस येऊ शकते. त्याच्या पैठण व पुरुषोत्तमपुरी ताम्रपटात त्याच्या सैनिकी विजयांचे विस्तृत वर्णन आलेले आहे. त्यातून त्याने-

---

१. एकनाथ संशोधन मंदिर ताम्रपटातील एका श्लोकाचा अर्थ लावताना श्री. शिराळकर यांनी रामचंद्र शिवरात्रीच्या दिवशी राज्यावर बसला असे सुचित केले आहे. पण त्यात अर्थ नाही. मूळ ताम्रपटातील श्लोक असा -

राम : सोम इति द्विराजमधुना राजात्र रामोऽधुना
नः स्थानात्र परोदयात्र समयाद्रामेऽल्पता तेजसः
सोमे सा शिवरात्रिरात्मनि कलाशेषे तिथी तापसे
रामे राजनि राजति प्रतिजनं सर्वा शिवा रात्रयः

यात रामचंद्राची सोमाशी (चंद्राशी) तुलना असून चंद्राची एकच कला शेष राहिली असता शिवरात्र होते तर राम राजा असता सर्वच रात्री शिवरात्री (शुभरात्री) आहेत असा ध्वनी आहे त्यात रामचंद्र शिवरात्रीस राज्यावर बसला असण्याची सुतराम शक्यता नाही.

१) डाहल देशाच्या राजाचा क्षणात पराभव केला.
२) अर्जुननृपतीचा पराभव केला.
३) भांडागार येथील राजास हरविले.
४) वज्राकर येथील राज्य उलथून टाकले.
५) गोपनृपतींचा पाडाव केला.
६) माहिम, संगम, खेट व पल्ली येथील राजांचा पराभव केला.
७) वाराणसी म्लेंच्छांच्या हातून सोडवून तेथे सुवर्णमय विष्णुमंदिर बांधले.
८) होयसळ राजांचा पराभव केला.

यापैकी डाहलनृपतीच्याविषयी आपणांस काहीच माहिती नाही. कारण इ. स. १२१०-११ नंतर डाहल देशातील (चेदि. त्रिपुरी-जबलपूरच्या आसपासचा भाग) कलचुरिनृपतींचे लेख सापडलेले नाहीत. तेव्हा रामचंद्राने कोणत्या डाहलनृपतींचा पराभव केला ते निश्चित सांगता येणार नाही.

अर्जुन ह्या नावाचे दोन राजे रामचंद्राला समकालीन होते. पहिला माळव्याचा परमार राजा अर्जुनवर्मदिव द्वितीय, व दुसरा गुजराथचा वाघेला राजा अर्जुन. यांपैकी कोणत्या अर्जुनाचा रामचंद्राने पराभव केला. ते सांगता येणे कठीण आहे. वाघेला नृपतीच्या विजयार्क नावाच्या सेनापतीने यादव सैन्याशी युद्ध केल्याचे उल्लेख त्यांच्या लेखात आहेत. अर्थात् रामचंद्राचे आक्रमण वाघेला अर्जुनाविरुद्ध असावे असे वाटते. पण रामचंद्राच्या शके ११९४ च्या ठाणे ताम्रपटात व शके ११९८ च्या उद्दरी शिलालेखात त्याच्या मालव विजयाचे स्पष्ट उल्लेख आहेत.[२] अशा अवस्थेत निश्चित मत देणे अर्थातच कठीण आहे.

भांडागार म्हणजे पूर्व विदर्भातील भंडारा हे जिल्ह्याचे ठिकाण येथील एखाद्या लहान सामंताचा रामचंद्राने पराभव केला असावा. वज्राकर म्हणजे चांदा जिल्ह्याच्या गडचिरोली तहसिलातील वैरागढ हे गाव. येथे एक मोठा दुर्ग असून, प्राचीन काळी येथे हिऱ्याच्या खाणी होत्या व म्हणूनच त्यास वज्रगृह (वज्र = हिरा) असे नाव पडले व त्याचा अपभ्रंश वज्रघर > वजिरघर वईरघर > वईरागड > वैरागढ असा झाला. येथील हिऱ्यांचे खाणीचे उल्लेख ऐन-इ-अकबरी व बुऱ्हान-इ-मासिर या मुस्लीम ग्रंथातूनही आले आहेत.[३]

गोपनृपती हा बहुधा गाविलगढचा राजा असावा. कारण कृष्णदेवाचे काळापासून यादवांनी

२. मालवप्रदीपशमनप्रलयानिलः। (ठाणे-ओवळे ताम्रपट). त्याच्या एकनाथ संशोधन मंदिर ताम्रपटातही 'रामेण कार्मुकं भंक्त्वा महादेवस्य नंदनं। प्राप्ता जनकजा लक्ष्मीः निर्जितोऽर्जुनकीर्तिदः॥ या श्लोकात त्याच्या अर्जुनावरच्या विजयाचे वर्णन आहे.

३. या गावचा प्राचीनतम उल्लेख खारवेलच्या हाथीगुंफा शिलालेखात वजिरघर असा आहे, तर पद्मगुप्ताच्या नवसाहसांकचरितात तो वज्रांकर असा आहे.

पूर्वोत्तर (ईशान्य) विदर्भ जिंकण्यास सुरुवात केली होती. तेव्हा रामचंद्रानेही त्यात भर घातली असावी.

माहिम म्हणजेच मुंबईजवळचे बंदर माहिम. खेट म्हणजे रत्नागिरी जिल्ह्यातील खेड, संगम म्हणजे कोंकणातील संगमेश्वर येथील स्थानिक सामंतांचा रामचंद्राने पराभव केला.

पण पल्ली गावाविषयी मात्र डॉ. मिराशी, डॉ. वर्मा व डॉ. रित्ति या सर्वच विद्वानांनी मौन धारण केले आहे. आमच्या मते पल्लीगाव म्हणजे सातान्याजवळील पाल (नेताजी पालकरांचे राहते गाव) अथवा रत्नागिरी जिल्ह्यातील पालवणी हे गाव (जसवंतराव पालवणीकरांच्या जहागिरीचे गाव) असावे.

वाराणसी म्लेंच्छाच्या हातून सोडवून तेथे रामचंद्राने शार्ङ्गधराचे सुवर्णमय मंदिर बांधले असा अर्थ डॉ. मिराशी ह्यांनी केला आहे खरा पण तसा अर्थ करण्यास मुळ ताम्रपटात फारसा आधार नाही. पुरुषोत्तमपुरी ताम्रपटांतील मूळ श्लोक असा -

**यः शुल्कसंकेतलिपिं व्यलोपयत्**
**सर्वाग्रहारेषु करान् वारयत्**
**वाराणसीं म्लेंच्छगणाद् व्यमोचयत्**
**हिरण्मयं शार्ङ्गधरालयं व्यधात् ॥ १८॥**

यात वाराणसी म्लेंच्छप्रभावापासून मुक्त करणे व सुवर्णमय विष्णू मंदिर निर्माण करणे ह्या दोन गोष्टी अगदी वेगळ्या आहेत. यातून वाराणसी येथेच रामचंद्राने सुवर्णमंदिर बांधले असा ध्वनी डॉ. मिराशी कसा काढतात, कोण जाणे.

बरे ही वाराणसी कोणती ? डॉ. मिराशी म्हणतात की ही वाराणसी म्हणजे प्रसिद्ध तीर्थक्षेत्र बनारस अथवा काशी. सन १२८५-९० या काळात बल्बनच्या मृत्युनंतर व जलालुदीन खलजी सत्तेवर येईपर्यंतच्या अराजकाच्या काळात रामचंद्राची ही स्वारी झाली असावी असेही ते लिहितात. पण त्याला फारसा आधार नाही. वाराणसी म्हणजेच बनारसच असे गृहीत धरण्याची आवश्यकता नाही. विदर्भात वाराणसी नावाचा गाव असून तो सिंघणाचा सेनापती खोलेश्वर ह्याचा पिता त्रिविक्रम ह्याला अग्रहार म्हणून मिळाला होता. हे आपण मागे पाहिलेच. अल्लाउद्दीनने देवगिरीवर जी स्वारी केली ती विदर्भाच्याच मार्गानेच. तेव्हा विदर्भात मुस्लीम सैन्याच्या काही तुकड्या राहिल्याही असतील. रामचंद्राने त्यांना हाकून लावून वाराणसी हा प्राचीन अग्रहार पुनरुज्जीवित केला असेल.

विजापूर (कर्नाटक) ह्याचेच प्राचीन दक्षिण द्वारावती असून ते यादवांच्या विजापूर येथील सर्वच शिलालेखांतून येते. मलिक करीमुद्दीन ह्याच्या शके १२४२ च्या लेखातही विजापूरचे नाव दक्षिणवाराणसी असेच येते. कदाचित् रामचंद्रदेवाने येथील मुस्लीम आक्रमणांना हाकून लावले असेल.

राहता राहिला प्रश्न सुवर्णमय शार्ङ्गधर मंदिर बांधण्याचा. हे शार्ङ्गधर मंदिर रामचंद्रदेवाने पुरुषोत्तमपुरी येथेच बांधले असावे. कारण पुरुषोत्तमपुरी जवळच केशवपुरी (आधुनिक केसापुरी) येथे शार्ङ्गधराची एक अत्यंत नयनमनोहर मूर्ती एका उद्ध्वस्त मंदिराचे तळघरात आहे. तिला लोक चुकून केशवराज म्हणतात.

पण रामचंद्राचा सर्वांत मोठा पराक्रम म्हणजे त्याचे होयसळांविरुद्धचे आक्रमण. भिल्लम पाचवा ह्याने आपल्या सार्वभौमत्वाची घोषणा केली, तेव्हा-पासून (शक १११२, इ. स. ११९०) यादव व होयसळ यांच्यातील वैराग्नी सतत धुमसतच होता. भिल्लम, जैतुगी प्रथम, सिंघण द्वितीय, कृष्ण व महादेव या सर्वच यादव राजांनी आपआपल्या शक्तीनुसार होयसळांवर आक्रमणे केलीच. पण रामचंद्राने या प्रश्नाचा पूर्ण सोक्षमोक्ष लावायचा ठरविले असे दिसते. त्याने या युद्धासाठी प्रचंड सिद्धता केली. सालुव तिक्कम, वनदेवरस, जोयनायक, हरपालदेव, तिप्परस या अतिपराक्रमी सेनापतींना त्याने होयसळांविरुद्ध पाठविले. यावेळी यादवांनी होयसळांविरुद्ध अगदी निकराचा हल्ला चढविला. यादव सैन्य होयसळांचा प्रदेश तुडवीत अगदी त्यांची राजधानी द्वारसमुद्रपर्यंत पोचले व द्वारसमुद्रपासून अगदी चार मैल अंतरावरच्या बेलवाडी या गावी त्यांनी सैन्याचा तळ ठोकला. होयसळांनीही यादवांविरुद्ध प्राणपणाने झुंज दिली. चिक्ककेतेय दंडनायकाचा पुत्र अंकेयनायक, गुल्लनायक, नंजेय हे यादवांशी लढताना मारले गेले. तर यादववीर जोयिदेव व वनदेवरस हेही कामास आले. यादव सैन्याला दुम्मी (चितळदुर्ग जिल्हा) या गावापर्यंत माघार घ्यावी लागली.[४]

यादवाच्या आणि होयसळांच्या शिलालेखातून या युद्धाची अगदी परस्पर विरोधी वर्णने येतात. होयसळ शिलालेखातील वर्णने वाचली, तर यादवांचाच फार मोठा पराभव झाला असावा असे वाटते. पण सालुव तिक्कम याच्या हरिहर येथील शिलालेखांत त्याने द्वारसमुद्र जिंकून पुष्कळ लूट आणून हरिहर येथे लक्ष्मीनारायणाचे मंदिर बांधून ते यादवनृपती महादेव ह्याच्या स्मृतीस अर्पण केले असे वर्णन आहे. ते कसेही असो, यादव सैन्य द्वारसमुद्रपर्यंत पोचले, ही एकच गोष्ट होयसळांची दुर्दशा दाखविण्यास पुरेशी आहे. यानंतर सोराब, शिमोगा, सागर या कर्नाटकातील जिल्ह्यांपर्यंत यादवांचे शासन रूढ झाले, यात शंका नाही. यानंतर इ. स. १२८३, १२८७ व १२९१ या वर्षीही रामचंद्राने होयसळांविरुद्ध सैन्य पाठविलेच. अशाच एका युद्धात मागे उल्लेखिलेल्या दंडेश कूचिराज ह्या जैन सामंताचा पुत्र वोणदेव हा यादवांच्या बाजूने लढताना ठार झाला.

४. सोराब, चितळदुर्ग व हासन जिल्ह्यांत या युद्धात मृत झालेल्या वीरांच्या स्मारकशिला (वीरगळ=वीरकल्लु, कानडी-कल्लु=दगड) सापडल्या असून, हे भीषण युद्ध इ. स. १२७६च्या मे, जून महिन्यात झाले, असे त्यावरील लेख सांगतात.

यादव-होयसळ ह्याच्यातील शंभर वर्षे चाललेल्या संघर्षाचे हे अखेरचे प्रकरण होय. शंभर वर्षे ह्या दोन्ही राज्यसत्ता सतत परस्परांविरुद्ध झुंजल्या व त्यांनी आपलेच सामर्थ्य खच्ची करून घेतले. या शेवटच्या युद्धात अगणित यादव व होयसळ वीर मृत्यूमुखी पडले. दोन्ही राज्यांची लढण्याची शक्ती अतिक्षीण झाली. (Fighting Power) दोन सिंह परस्परांशी झुंजुन मरणोन्मुख होऊन पडावेत आणि गिधाडांचे फावावे तसे मुसलमानांचे फावले. नंतरच्या मुस्लीम आक्रमणाच्या काळात ही दोन्ही राज्ये नेटाने उभी राहून मुसलमानांना तोंड देऊ शकली नाहीत ती यामुळेच. वास्तविक आपसातील परंपरागत वैर मिटवून ह्या दोन्ही सत्तांनी मुस्लीम आक्रमणाच्या संकटाचा गंभीरपणे विचार करावयास हवा होता. पण राजकीय दूरदृष्टीचा अभाव, क्षुद्र हेवादाव्यांसाठी प्राणपणे झुंजण्याचा जास्तीचा उत्साह, आपले खरे वैरी ओळखण्याची पात्रता नसणे या दुर्गुणांमुळे यादव व होयसळ यांनी आपला नाश ओढून आणला. आजही सीमावादाचे नसते भूत उभे करून दोन्ही प्रांत ह्याच वृत्तीला खतपाणी घालीत आहेत. एकमेकांविरुद्ध 'संघ' स्थापन करीत आहेत. काळ महान न्यायाधीश आहे. त्याच्या न्यायालयात क्षुल्लक चुकांनाही भयानक शासन होतेच होते. एवढा धडा जरी आपण यादव इतिहासापासून शिकलो, तर आमच्या परिश्रमाचे सार्थक झाले असे आम्ही समजू. इतिहास हा ज्ञानाचा प्रकाश आहे असे महान विजेता नेपोलियन म्हणाला ते याच अर्थाने होता. असो.

रामचंद्राचे हाताखालीही अनेक पराक्रमी सामंत व अधिकारी होते. त्यापैकी काहींची नांवे अशी-

१) सालुव, तिक्कम. होयसळांविरुद्ध विजयी मोहीम काढणारा हा सामंत हरिहर, धारवाड गदग या भागांवर शासन करीत होता. द्वारसमुद्र जिंकून आल्यावर त्याने हरिहर येथे महादेवराय यादवाच्या स्मरणार्थ लक्ष्मीनारायण मंदिर बांधून त्यावर सोन्याचा कळस बसविला. त्याचा प्रधान केशवपंडित होता.

२) पुरुषोत्तम पंडित हा त्याचा मंत्री अतिशय विद्वान होता. त्याची वंशावळ अशी-

भानुसुरी > अल्हदेव > विनायक > सांवलदेव > पुरुषोत्तम पंडित. या सांवलदेवाने माधवसूरीची नात अक्वांबिका हिच्याशी विवाह केला. त्याच्या गुणाने आकृष्ट होऊन रामचंद्राने त्याला आपला फूलबडुआ (पुष्परचनाध्यक्ष) नेमले. त्याने अतिशय शिस्तीने यादवांचा कार्यभार वाहिला.

३) राघव ह्या मंत्र्याचे नाव रामचंद्रदेवाच्या रामटेक येथील लक्ष्मण मंदिरातील शिलालेखात आहे. त्याच्या पित्याचे नांव वायिनायक असे होते. हा राघव रामचंद्राचा अतिशय विश्वासू असून, तो रामचंद्राच्या शयनागाराचा प्रमुख होता. मुस्लीम आक्रमणात यादव राज्य नष्ट होत असता ते वाचवायचा त्याने आटोकाट प्रयत्न केला. त्याचे वर्णन पुढे दिलेच आहे.

४) धारवाड जिल्ह्यात डंबळ येथे जिनालय बांधणारा सालुब वीर चावुण्ड व त्याचा धाकटा बंधू सप्तरस हेही यादव रामचंद्राचे सामंत होते. त्यांनी बांधलेल्या मंदिराचे नांव नगरजिनालय होते. या लेखाची तिथी पौष शु. २ शक १२११ अशी आहे.[५]

५) त्याच्या आणखी एक जैन सामंताचे नांव भैरवरस दंडनायक होते. त्याने मन्त्रेरमोसलेवाड जिनालय बांधले.[६]

६) बेतुरु शिलालेखात जैन सामंत कूचिराज व त्याचा पुत्र वीणदेव ह्यांचे उल्लेख आहेत.[७]

७) आणखी एक जैन सामंत दंडेश माधव ह्यांचे नांव तवनिधी येथील लेखात येते.[८]

८) कृष्णदेवाची राणी (रामदेवाची माता) बहुधा जैन होती. तिच्या आज्ञेने तडकोड (जि. धारवाड) येथे एक जिनालय मायिदेव ह्याने बांधले.[९] पण दुर्दैवाने तिचे नाव लेखात दिले नाही.

९) याशिवाय रामचंद्राच्या खालील अधिकाऱ्यांच्या सामंतांची नांवे त्याच्या शिलाताम्रशासनातून मिळतात.

महाप्रधान व सर्वाधिकारी कळचूर्य कन्नरदेव (लक्ष्मेश्वर शिलालेख), महामंडलेश्वर भीमदेव, तिप्परस, महाप्रधान परशुराम बनवासी (१२०००चा शासक,) सोयिदेव (एडेनाडूचा शासक), महाप्रधान दामोदरनायक (धारवाड शिलालेख), हाथिसाधनिक भावकदेव (उन्हकदेव शिलालेख), कोंकण अधिकारी कान्हरदेव (कालवार शिलालेख), जाईदेव (अक्षी शिलालेख), माणदेशाचा अधिकारी जोईदेव, त्याचा दुय्यम ब्रह्मदेवराणा व ब्रह्मदेवांचा भाऊ बाईदेव (वेळापूर शिलालेख), राणा रामदेव (आगासन शिलालेख), नवसारी सूरत भागांवरील अधिकारी कण्देव (नवसारी शिलालेख), इत्यादि अनेक नावे सापडतात.

अशा रितीने रामदेवाचे राज्य म्हणजे यादव वंशाच्या अत्युच्च वैभवाचा काळ. यादवांना आता कोणीही शत्रू नव्हता. नवसारी सूरतपासून नागपूर रामटेक-भंडाऱ्यापर्यंत व नर्मदेपासून सुदूर दक्षिणेत कावेरीच्या उत्तर तीरापर्यंत (तेलंगण वगळता) यादवांचा सुवर्णगरुडध्वज फडकत होता. होयसळांसारख्या भीषण पराक्रमी शत्रूच्या राजधानीपर्यंत यादव सेना पोचल्या होत्या. होयसळांना अपमानाने मान खाली घालावी लागली होती. यादवसत्तेचा रवी अगदी मध्यान्हावर होता.

साहित्याचे दृष्टीनेही हा काळ अतिशय उत्कर्षाचा ठरला. श्री ज्ञानदेवांनी भगवद्गीतेवरील आपली टीका भावार्थदीपिका अथवा ज्ञानेश्वरी शके १२१२ मध्ये नेवासे येथे महालया (म्हाळसा) मंदिरात पूर्ण केली, त्यांनी रामचंद्राच्या राज्यकाळाचा उल्लेख

तेथ इंदुवंशुविलासु । जो सकळकलानिवासु ।

---

५. जैन शिलालेख संग्रह, चतुर्थ भाग, क्र. ३५५. ६. तत्रैव क्र. ३५६. ७. तत्रैव, तृतीय भाग, क्र. ५११. ८. तत्रैव, क्र. ५४०. ९. तत्रैव, चतुर्थ भाग, क्र. ३५२-३५३.

न्यायाते पोखीत क्षितीशु । श्रीरामचंद्रु ॥ १८-१७८३ ।

रामचंद्रदेवाचा अल्लाउद्दीनकडून पराभव झाला असता व त्याने चक्रधरांसारख्या ईश्वरी अवताराचा छळ केला असताहि श्रीज्ञानेश्वरांनी रामचंद्रदेवाचा असा गौरव का करावा असा आक्षेप काही महाराष्ट्रीय विद्वान घेतात.[१०] पण त्यात स्वारस्य नाही. अल्लाउद्दीनाचे आक्रमण ज्ञानेश्वरी पूर्ण झाल्यावर ४-५ वर्षांनी झाले. रामचंद्रदेवाने चक्रधरांचा छळ केला याही गोष्टीत फारसे तथ्य नाही. महानुभावीय लीळाचरित्रातून श्रीचक्रधरांच्या शेवटच्या प्रकरणाविषयी ज्या लीळा येतात. (डॉ. तुळपुळे, लीळाचरित्र, उत्तरार्ध भाग २, परिशिष्ट क्र. १ पहा) त्या विश्वासार्ह वाटत नाहीत. त्यातील चक्रधर स्वामींच्या प्रयाणानंतर नगरात घडलेल्या अरिष्टांचे वर्णन सांकेतिक अतएव त्याज्य वाटते. श्रीचक्रधरांचा छळ रामचंद्रदेवाने हेमाडपंतांच्या सांगण्यावरून केला व शेवटी चक्रधरांच्या प्रयाणानंतर पश्चात्ताप होऊन रामचंद्रदेवाने हेमाडपंताला ठार मारले वगैरे तर शुद्ध बनावट कथा आहेत. श्रीचक्रधरांचे प्रयाण झाले शके ११९६ मध्ये. त्यांच्यामागून हेमाडपंत निदान नऊ वर्षे तरी जिवंत होता. पुणे जिल्ह्यात पूर येथे सापडलेल्या शके १२०७ च्या लेखात त्याचा स्पष्ट उल्लेख आहे. तेव्हा चक्रधरांच्या प्रयाणानंतर नऊ वर्षे थांबून नंतर पश्चात्ताप होऊन राजा हेमाडपंतास शासन करील, हे संभवत नाही.[११] अर्थात् महानुभाव वाङ्मयातील ह्या पुराव्यावरून रामचंद्रदेवास दोष देणे फारसे योग्य नाही. लीळाचरित्र पूर्वार्धातही श्रीचक्रधरांनी रामदेवाविषयी 'रामदेवो निपरवस' असे उद्‌गार काढले आहेत. ती लीळा अतिशय त्रुटीत अतएव संशयास्पद वाटते. लीळाचरीत्रात काही लीळा मागून घुसडून दिल्या आहेत. हे 'विठलवीरू कथन' ह्या लीळेवरून स्पष्ट आहे. ही लीळा उत्तरार्धात क्र ४११ वी लीळा म्हणून येते व तीत पंढरपूरचा विठ्ठल हा देव नसून ते एका दरोडेखोराचे स्मारक आहे. असा विठ्ठलाचा उपहासगर्भ उल्लेख आहे. पण ही लीळा रत्नमाळास्तोत्रात नाही. (श्रीचक्रधर विठ्ठलाची निंदा करतील हे संभवतही नाही.) तेव्हा लीळाचरित्रातील काही लीळा प्रक्षिप्त आहेत हे निश्चित. तशाच स्वरूपाची ही 'महादेवो राजप्रशंसा' (पूर्वार्ध क्र. ८२) लीळा आहे ती मुळात अशी-

एकु दीस : राज्यधर्माच्या गोष्टी निगालीया : 'माहादेओ राजा राज्यधर्म जाणे : कान्हरदेवो आस्तिक : रामदेवो निपरवस'

इतकी संक्षिप्त व त्रुटित ही लीळा आहे की 'सर्वज्ञे ह्मणितले' हे नेहमीचे शब्दही नाहीत. शिवाय ही विनाकारण शेरेमारी श्रीचक्रधर स्वामींच्या मुखी का घातली आहे हेही समजत नाही. अर्थात् ह्या लीळेवर विसंबून राहून रामचंद्रदेवास व्यर्थ दोष देणे योग्य नाही.

नामदेव व जनाबाई हे भगवद्‌भक्त श्रीज्ञानेश्वरांचे समकालीन व त्यांचे जिवलग

---

१०. डॉ. कोलते, महानुभाव वर्ष २, अंक ८, पृ. १८. ११. याविषयीचे विस्तृत विवेचन डॉ. मिराशी ह्यांच्या 'हेमाद्रीचा अंतकाल' (संशोधनमुक्तावली, सर २ रा, पृ. १३९-१४६) ह्या लेखात पहा.

असल्यामुळे त्यांची साहित्यनिर्मितीही रामचंद्रदेवाच्याच काळात घडली असे म्हणावे लागेल. चांगा वटेश्वराचा 'तत्त्वसार' हा ग्रंथ, विसोबा खेचरांचे ग्रंथ हेही याच काळात निर्माण झाले.

पंढरपूरच्या विठ्ठल मंदिराला रामचंद्रदेवाचे काळात शेकडो लोकांनी दाने देऊन त्या मंदिराला उर्जित अवस्था आणली. ही दाने शके ११९५ ते ११९९ या काळात दिली गेली व दाने देणाऱ्यांत महाराष्ट्रातील अगदी कानाकोपऱ्यांतील भक्तांचा समावेश आहे. विदर्भ, खानदेश, मराठवाडा, कोंकण, कर्नाटक इत्यादि भागांतून आलेल्या भक्तांनी 'फागनिपुर श्रीविठ्ठलदेवरायासि तिसासिति फुलेंदांडे आचंद्रार्क चालावेआ नानाभक्तमालिआ दत्तपैकाचा विवरू' म्हणजे विठ्ठलाच्या पूजेसाठी आचंद्रार्क फुलांचे हार मिळावे, यासाठी दिलेल्या पैशाचे विवरण या लेखात कोरले आहे. यात विठ्ठलाला दान देणाऱ्या भक्तात यादव राजा रामचंद्रदेव ह्याचेही नाव आहे. ते असे-

'श्री जादवनारायणप्रौढप्रतापचक्रवर्ति श्रीरामचंद्रदेवराए दान वाहीले.' इत्यादि.

यावरून रामचंद्रदेव पंढरपूरच्या विठ्ठलाचा निस्सीम भक्त होता असे दिसते. (कदाचित यामुळेच त्याच्यावर महानुभाव पंथाचा राग असावा.)

प्रख्यात महानुभाव कवी नरेंद्र व त्यांचे बंधू नृसिंह व साल कवी हेही रामचंद्राच्याच राजसभेत होते. नृसिंह कवीने नलोपाख्यान व साल कवीने रामायण ह्या प्राकृत रचना करून रामदेवासमोर वाचल्या. तेव्हा नरेंद्रास आवेश येऊन त्याने 'रुक्मिणीसैंवर' हा ग्रंथ मराठीत रचून रामचंद्रदेवास वाचून दाखविला, तो इतका अप्रतिम होता की, राजा म्हणाला, 'या ग्रंथाचा अभगु मजसी देयावा : मी जितकीया ओवीया, तितुके सोनटके आणि चौथरिया आसु ओवाळणी घालीन' म्हणजे ह्या ग्रंथाचा कर्ता म्हणून माझे नाव घालावे मी त्याबद्दल प्रत्येक ओवीमागे सोन्याची नाणी देईन. पण नरेंद्र बाणेदारपणे उत्तरला, 'ना राजे हो : आमुचेया कवीकुळासि बोलु लागैल :' अर्थात आमच्या नावास कलंक लागेल. शेवटी नरेंद्र ग्रंथ घेऊन पळून गेला. अशी आख्यायिका 'स्मृतीस्थळ' (स्मृती ११३) या ग्रंथात येते.

महानुभावीय ग्रंथ लीळाचरित्र, गोविंदप्रभूचरित्र, महदंबा या कवयित्रीचे धवळे, नरेंद्र कवीचे रुक्मिणीसैंवर, भास्करभट्ट बोरीकर उपाख्य कवीश्वर दास यांचा ग्रंथ शिशुपाल वध ह्याही ग्रंथाच्या रचना रामचंद्रदेवाचेच काळात झाल्या, हे स्पष्ट आहे.

****

# हेमाद्री आणि बोपदेव

हेमाद्रीपंडित अथवा हेमाडपंत हा प्रख्यात पुरुष यादवांच्या राजसभेत होता. त्याच्याविषयी अनेक दंतकथा व आख्यायिका महाराष्ट्रात प्रचलित आहेत. तो पूर्वजन्मी शिवभक्त राक्षस होता, त्याने एका रात्रीत एक लक्ष शिवमंदिरे बांधली. चुन्याशिवाय दगडांचे निरनिराळे आकार लाकडाच्या तुकड्याप्रमाणे एकमेकात फसवून मंदिरे बांधण्याची पद्धत (हेमांडपंती देवळे) त्याने शोधून काढली, मोडी लिपी तयार केली. सिलोनहून बाजरी हे धान्य महाराष्ट्रात आणले, इत्यादि अनेक दंतकथा महाराष्ट्रात त्याच्याबद्दल सांगितल्या जातात. पण त्या विश्वासार्ह नाहीत.

**हेमाडपंत कानडी होते काय ?**

त्याचे नांव हेमाद्री किंवा हेमाडपंत हेच मुळी प्रथमदर्शनी चमत्कारिक वाटते. हेमाद्री सोन्याचा पर्वत (हेम=सोने, अद्रि=पर्वत) असा अर्थ जरी घेतला, तरी हे नांव कर्णमधुर वाटत नाहीच. कर्नाटकातील काही राजकुलात पेरमाडि, पेर्माडि अशी राजांची नावे येतात.(उदाहरणार्थ, कलचुरि पेर्माडिदेव ह्याचा मंगळवेढे शिलालेख पहा) पेरमडि हा कानडी शब्द असून तो पेर=मोठा व मडि=टाचा (विशेषतः हिम्मडि=टाचा) हे दोन शब्द मिळून बनला असावा. अर्थात् त्याचा अर्थ मोठ्या टाचांचा अथवा मोठ्या पायांचा असा होईल. कानडीत 'प' चा 'ह' होतो. हे आपण मागे पहिल्या प्रकरणात पाहिलेच. तेव्हा पेरमडिपासून किंवा हिम्माडिपासून हेम्माडि हे नाव सिद्ध होऊ शकेल व त्याचा अर्थ मोठ्या पायाचा माणूस असा होईल. या शब्दाचे संस्कृत रूपान्तर (संस्कृतीकरण Urbanisation) हेमाद्री असे होईल. असे विवेचन श्री. शं. बां. जोशी इत्यादि कानडी संशोधक करीत असतात. पण मुळात हेम्माडि हे नाव 'मोठ्या पायाचा' हा अर्थ घेऊन कुणी आपल्या मुलास वगैरे ठेवील हेही शक्य वाटत नाही. शिवाय 'हेम्माडि' या कानडी शब्दाचे 'हेमाद्री' हे रूप आहे की, 'हेमाद्री' या संस्कृत शब्दाचा 'हेम्माडि' हा कानडी अपभ्रंश आहे, हे तरी कसे ठरविणार ? सारांश, हेमाद्री वा हेमाडपंत हे नाव कानडीच असावे, असे निश्चयाने म्हणता येणार नाही. विदर्भातील बारशीटाकळी येथील शके १०९८ च्या शिलालेखात हेमाद्रीदेव नामक एका अज्ञात वंशातील राजाचे नाव येते, तर सिंघणाच्या वेळच्या शके ११३२ च्या सुमाराच्या पाटण शिलालेखात यादवांच्या निकुंभ ह्या मांडलिक घराण्याचे वर्णन असून या घराण्याची वंशावळ कृष्णराज > इंद्रराज > गोवन > सोईदेव > हेमाद्रीदेव अशी दिली आहे. म्हणजे विदर्भ-खानदेशात हेमाद्री वा हेमाडि हे नाव प्राचीन काळापासून प्रचलित होते, हे स्पष्ट दिसते. अर्थात् हेमाद्री हे नाव कानडी आहे, असे म्हणण्याला फार बलवत्तर पुरावा आहे असे नाही, तेव्हा केवळ नावावरून हेमाडिपंत हा कानडी होता, हे गृहीत धरणे फारसे बरोबर नाही.

**हेमाडपंत आणि गोवे :**

१) गोव्यात 'हेमाड बारशे' नावाचा एक विभाग (महाल) असून उगे नावाच्या गावात

हेमाडदेवाचे म्हणून एक देवालय दाखवितात. त्यात एका शिवलिंगावर एका मुकुटधारी व्यक्तीची आकृती, तिच्यावर छत्र धरणारा सेवक व बाजूला एक ठेंगणा सेवक (Dwarf) कोरलेला आहे. यालाच लोक हेमाडदेव म्हणतात. पण यावरून यादवांचा श्रीकरणधिप पंडित हेमाडपंत हा गोमंतकीय ठरत नाही. गोव्याच्या कदंब घराण्यात जयकेशि दुसरा ह्याचा पुत्र शिवचित हेमाडि हा राजा झाला. त्याचे सोन्याचे नाणे उपलब्ध असून त्यावर 'श्रीसप्तकोटीश्वरलब्धवरसिवचित वीरहेमाडिदेवर मलवर मारि' असा लेख आहे. उगे गावातील शिवालय त्यानेच बांधून लिंगावर आपली आकृती कोरली असावी. म्हणूनच ह्या आकृतीवर राजछत्र व बाजूला सेवक दाखविला आहे. अशी पद्धत प्राचीन काळी होती. दाते लोक आपल्या आकृती दानविषयावर कोरीत असत. (सागर येथील कलचुरिनृपती शंकरगणाचा शिलालेख पहा. यांवर राजपुरुषांच्या आकृती कोरल्या आहेत) तेव्हा शिवलिंगावरील ही आकृती कदंब शिवचित्त हेमाडिदेव ह्याची आहे.

पंढरपूर येथील चौऱ्यांशीच्या शिलालेखात 'सोडवीकार हेमाडि पंडिती' असा उल्लेख स्तंभ १ ला, ओळ ३० मध्ये येतो. यातील 'सोडवीकार' या आडनावाची धाटणी गोमंतकीय आहे, असे कविवर्य बा. भ. बोरकर म्हणतात. गोव्यात आडनावासाठी 'कार' शब्द जोडला जातो, जसे 'गोयंकार' इत्यादि. तर महाराष्ट्रात 'कर' जोडले जाते असा कविवर्यांचा युक्तिवाद आहे. पण 'कार' प्रत्यय जोडून आडनावे-विदर्भ-मराठवाड्यातही सिद्ध होत असत, हे चौऱ्यांशीच्याच शिलालेखाचा अभ्यास केल्यास सहज दिसेल. उदाहरणार्थ, पुढील नावे पहा-

| | | |
|---|---|---|
| स्तंभ १-ओळ २५ | आंबेकारा दोढं पंडितु | आंबे येथील दोढ पंडितु |
| स्तंभ १- ओळ ३४ | आंबेकारे क्रिष्ठदेवे | आंबे येथील कृष्णदेवाने |
| स्तंभ ७- ओळ ३६-३७ | दोरवठेकारी लाटिदेवे | दोरवठे येथील लाटिदेवाने |

आता 'कार' प्रत्ययाने सिद्ध होणारी नावे केवळ गोव्यातच प्रचलित होती, असे म्हणता येणार नाही. तस्मात् हेमाडिपंत गोव्याचा ठरू शकत नाही.

**हेमाद्रीचे वंशवृत्त :**

परिशेषखंड ह्या चतुर्वर्गचिंतामणीच्या शेवटच्या भागात हेमाद्रीने आपली वंशावळ वामन > वासुदेव > कामदेव > हेमाद्री अशी दिली आहे. त्याच्या ग्रंथांवरील टीकांतून तो वरदा नदीचे तीरावरील वेदपद या गावाचा राहाणारा होता असे म्हटले आहे. ह्या वेदपद गावाचा शोध लागला नाही. त्याचा पिता कामराज हा मात्र कटक-देवगिरीलाच राहात असे. कारण हेमाद्रीचा मित्र बोपदेव ह्याने आपला ग्रंथ 'हरिलीला' हा कटक येथे कामराज ह्याचे घरात बसूनच पूर्ण केला, असा उल्लेख हरिलीलेचा टीकाकार मधुसूदन सरस्वती ह्याने केला आहे.[1] यावरून हेमाद्रीचा पिता

१. हरिलीलाविवेकोयं कामराजस्य वेश्मनि ।
कटकैरचयांकार तुष्ट्यै हेमाद्रिणांसताम् ॥

कामराज मोठा प्रतिष्ठित व विद्वान् असावा असे वाटते.

**हेमाद्रीचे राजकीय कर्तृत्व :**

हेमाद्री हा कृष्णदेव यादवाचे काळापासून यादवांच्या सेवेत होता. कृष्ण महादेव व रामचंद्रदेव ह्या तीन राजांच्या हाताखाली त्याने वेगवेगळ्या पदांवर काम केले. रामचंद्रदेवाच्या ठाणे-ओवळे ताम्रपटात त्यानें भंडारा-नागपूरकडचा भाग झाडीमंडळ जिंकून यादवांच्या राज्यास जोडला असा उल्लेख आहे तो असा-

'समस्तहस्तिपकाध्यक्षोनिजगुणसुभगभावुकेसमस्तकरणाधिपत्यमंगीकुर्वाणेनिर्जितझाडी मंडलेमंत्रीचूडामणौगुणरत्नरोहणाद्रौ हेमाद्रो।'

यावरून तो यादवांचा मंत्री, करणाधिप (अर्थ वा लेखा खात्याचा प्रमुख) हस्तिसेनेचा प्रमुख इत्यादि पदांवर काम करीत होता, असे दिसते. त्याने झाडीमंडळ जिंकल्यानंतर आजचा संयुक्त महाराष्ट्र म्हणविला जाणारा संपूर्ण मराठी प्रदेश यादव सत्तेखाली आला. रामचंद्रदेवाच्या पूर (जि. पुणे), उन्हकदेव (जि. नांदेड) येथील शिलालेखांतून हेमाद्रीचे उल्लेख एकलकारणाधिप व हस्तिसेनेचा प्रमुख (हस्तिसाधनिक) म्हणून येतात. उन्हकदेवचा शिलालेख शके १२०१ व पूर शिलालेख शके १२०७ चा आहे. अर्थात् शक १२१० (इ. स. १२८८) पर्यंत तरी हेमाद्री जिवंत होता असे म्हणावे लागेल. यादव राजसभेतील एक प्रभावशाली व्यक्तित्व म्हणूनच त्याचा उल्लेख करावा लागेल.

रामचंद्रदेव आमणदेवास पदच्युत करून राज्यावर आला. तेव्हा हेमाद्रीने रामचंद्रदेवास साहाय्य केले व म्हणूनच त्यास श्रीकरणाधिप पद मिळाले इत्यादि तर्क काही विद्वानांनी लढविले आहेत, पण ते आधारहीन व त्याज्य आहेत. या राज्यक्रांतीशी हेमाद्रीचा काही संबंध नव्हता.

**हेमाद्रीचे ग्रंथकर्तृत्व :**

ऑफ्रेटची सूचि (Catalogous Catalagorum) व इतर साधनांवरून हेमाद्रीने रचलेल्या खालील ग्रंथांची नावे मिळतात.

१. चतुर्वर्गचिंतामणी
२. आयुर्वेदरसायन
३. हेमाद्रीप्रयोग
४. कैवल्यदीपिका
५. शौनकाच्या प्रणवकल्पावर टीका
६. श्राद्धपद्धती
७. नानाशांतयः
८. कालनिर्णय
९. कालनिर्णयसंक्षेप
१०. तिथीनिर्णय
११. दानवाक्यावली
१२. पर्जन्यप्रयोग
१३. प्रतिष्ठा
१४. लक्षणसमुच्चय
१५. हेमाद्रीनिबंध
१६. त्रिस्थलविधी

याशिवाय रघुवंश काव्यावर त्याने 'दर्पण' नावाची टीका लिहिली, असाही समज आहे. पण दर्पण टीकेचा कर्ता हेमाद्री आपल्या पित्याचे नाव ईश्वरसूरि असे देतो. तेव्हा तो आपल्या हेमाद्रीपेक्षा वेगळा आहे हे निश्चित. कारण आपल्या हेमाद्रीच्या पित्याचे नाव कामराज असे त्याने स्वतःच दिले आहे.

**चतुर्वर्गचिंतामणी :**

हा एक बृहतधर्मकोश असून त्याचे व्रतखंड, दानखंड, तीर्थखंड, मोक्षखंड व परिशेषखंड असे पाच भाग आहेत. त्यातील व्रतखंडाच्या शेवटी हेमाद्रीने यादव राजवंशाची प्रशस्ती गायली आहेत. हा कोश लिहिण्यासाठी हेमाद्रीने अनेकानेक ग्रंथांतून माहिती एकत्र केली आहे व व्रते, दाने, तीर्थे यांची सांगोपांग माहिती दिली आहे.

**हेमाद्रीचे उपास्यदैवत :**

हेमाद्रीच्या उपास्यदैवताविषयीही विद्वानांत अनेक मते प्रचलित आहेत, त्याच्या ग्रंथारंभी गणेशवंदन असल्यामुळे त्याची गणपतीची उपासना होती, असे समजले जाते. हेमाद्रीला गणेश प्रसन्न होता, अशी दंतकथाही महाराष्ट्रात रूढ आहे. बोपदेवाच्या 'मुक्ताफल' या ग्रंथातील-

**'विष्णुप्रीत्यै चतुर्वर्गचिन्तामण्यामजीगणत्'**

या उल्लेखावरून हेमाद्रीचे उपास्यदैवत विष्णू असावे, असे वाटते. पण व्रतखंडातील राजप्रशस्तीच्या प्रारंभी हेमाद्रीने -

**श्रीगोपालमपारवैभवभवस्वच्छंदलीलालयं**
**सांद्रस्निग्धतमालकोमलदलश्यामाभिरामाकृतिम् ।**
**कूजत्कोकिलकामिनीकलरवप्रोल्लासिंगोपांगना**
**गीतस्फीतपवित्रचित्रचरितव्रातं नमस्कुर्महे ।।**

या श्लोकाने गोपालकृष्णाच्या अपार वैभवाची स्तुती गायली आहे. यावरून त्याचे उपास्यदैवत गोपालकृष्ण असावे असे वाटते. बोपदेवाने भागवत पुराणातील सार निवडून 'मुक्ताफल' हा ग्रंथ रचला. त्यावर हेमाद्रीने मुक्ताफल टीका किंवा कैवल्यदीपिका या नावाची टीका रचली. यावरूनही हेमाद्री भागवत धर्माचा उपासक होता, असे दिसते. किंबहुना हेमाद्री व बोपदेव या दोघांनी महाराष्ट्रात भागवत पंथाचा पक्का पाया ज्ञानदेव-नामदेवांपूर्वी घातला असाच तर्क संभवतो.

पंढरपूर येथील चौऱ्यांशीच्या शिलालेखात रामचंद्रदेव यादवाबरोबरच हेमाडिपंताचे नाव आहे. पण तेथे त्यास 'सोडवीकार' (सोडवी गावचा राहाणारा) होता असे म्हटले आहे. ते कसेही असो, हेमाद्री व बोपदेव यांनी भागवत पंथास आश्रय देऊन त्यांचा प्रसार केला, हे निश्चित.

आयुर्वेदरसायन हा ग्रंथ वाग्भटाच्या अष्टांगहृदय ह्या वैद्यक ग्रंथावर टीका म्हणून लिहिला गेला आहे.

**बोपदेव :**

हेमाद्रीचा मित्र आणि सहकारी प्रख्यात पंडित बोपदेव हा होता. तो विदर्भातील सार्ध या गावचा राहाणारा होता. सार्ध हे साडेगाव (सार्ध = साडे, जसे सार्धपंच = साडेपांच) या प्राकृत ग्रामनामाचे संस्कृतीकरण असावे. त्याच्या पित्याचे नांव केशवपंडित असे होते. केशव ज्याने वैद्यकावर 'सिंद्धमंत्र' नामक ग्रंथरचना केली. या ग्रंथाचे शेवटी त्याने स्वतःचा उल्लेख -

**लेभे जन्म महादेवादायुर्वेदं च भास्करात्**

**सम्मानं सिंहराजाच्च केशवः कारकोऽस्य सः ॥**

असा केला आहे. आता बोपदेवाची वंशावळ महादेव > केशव > बोपदेव अशी मांडता येईल. बोपदेवाच्या गुरूचे नाव धनेश वैद्य असे होते. कारण बोपदेवाच्या मुक्ताफल ग्रंथाचे शेवटी त्याने आपल्या गुरूचा, पित्याचा व मित्राचा

**विद्वद्धनेशशिष्येण भिषक्केशवसूनुना**

**हेमाद्रिर्बोपदेवेन मुक्ताफलमचीकरत् ॥**

असा उल्लेख केला आहे.

बोपदेव हा प्रचंड मोठ्या सामर्थ्याचा लेखक होता. त्याच्या मुक्ताफल ग्रंथात त्याने स्वतःच आपल्या ग्रंथसंभाराचा उल्लेख पुढीलप्रमाणे आहे.

**यस्य व्याकरणे वरेण्यघटनाः स्फीताः प्रबंधा दश**

**प्रख्याता नववैद्यकेऽपि तिथिनिर्धारार्थमेकोद्भुतः ।**

**साहित्ये त्रय एव भागवततत्त्वोक्तौ त्रयस्तस्य च**

**भूगीर्वाणशिरोमणेरिह गुणाः के के न लोकोत्तराः ॥**

यावरून त्याने व्याकरणावर दहा, वैद्यकावर नऊ, साहित्यावर तीन, भागवततत्त्वविशद करण्यासाठी तीन व तिथीनिर्णयासाठी एक इतक्या रचना केल्या असे दिसते. ऑफ्रिक्टच्या सूचीवरून व इतर साधनांवरून त्यांपैकी काहींची नांवे अशी -

१. शतश्लोकी
२. शतश्लोकीचंद्रकला
३. शार्ङ्गधरसंहितागूढार्थदीपिका
४. हृदयदीपनिघंटु
५. परशुरामप्रतापटीका
६. सिद्धमंत्र
७. सिद्धमंत्रप्रकाश
८. मुग्धबोधव्याकरण
९. रामव्याकरण
१०. धातपाठ
११. कविकल्पद्रुम
१२. कविकल्पद्रुमाख्या
१३. काव्यकामधेनू
१४. द्वादशस्कंधअनुक्रमणिका
१५. महिम्नस्तवटीका
१६. धातुकोश

१७. अशौचसंग्रह
१८. मुक्ताफल
१९. हरिलीला
२०. परमहंसप्रिया

यातील सिद्धमंत्र हा ग्रंथ वास्तविक त्याच्या पित्याचा पण तो बोपदेवाचेही नावावर मोडतो. हेमाद्रीप्रमाणेच बोपदेव हाही भागवत धर्माचा मोठा निष्ठावान उपासक होता. त्याचा मुक्ताफल हा ग्रंथ भागवतातील मर्म उलगडून सांगणारा असून, त्यात त्याने नऊ रसांचा प्रयत्नपूर्वक परिपोष केला आहे. या ग्रंथावर स्वतः हेमाद्रीने कैवल्यदीपिका नावाची टीका लिहिली. तर हरिलिला या ग्रंथावरील 'विवेक' नावाची टीकाही हेमाद्रीच्याच नावावर मोडते. हेमाद्री व बोपदेव यांचे फार सख्य असून, बोपदेवाने मुक्ताफलात ठायी ठायी हेमाद्रीची स्तुती गायली आहे.

सारांश, हेमाद्री व बोपदेव हे दोन पंडित यादव रामचंद्राच्या सभेचे भूषण असून, महाराष्ट्रात भागवत धर्म पुनरुज्जीवित करण्यासाठी त्यांनीच पुरस्कार घेतला असे दिसते. बोपदेवाचे ऋग्धबोध व्याकरण बंगाल प्रांतात अद्याप प्रचलित आहे.

कै. भिंगारकरशास्त्री ह्यांनी श्रीज्ञानेश्वरांना पैठण येथे मिळालेले शुद्धिपत्र छापले आहे. ते कोण्या बोपदेव पंडिताने रचलेले आहे. पण ते इतक्या अशुद्ध संस्कृतात लिहिलेले आहे की, त्याचा कर्ता प्रख्यात पंडित बोपदेव असावा, असे निश्चयाने म्हणता येत नाही. शेवटी बोपदेवाने हेमाद्री पंडिताविषयी जे प्रशंसोद्गार काढले आहेत, ते देऊन प्रकरण संपवितो. बोपदेव म्हणतो -

**शूराणामवधिर्निधिश्च यशसामेकाश्रयः संपदां**
**दातृणां प्रथमः कुलाकुलगृहे वैदग्धभाजां गुरुः**
**धौरेयश्च विपश्चितां सुकृतिनामद्वैतवादास्पदं**
**नैवासीन्न च वर्तते न भविता हेमाद्रिसूरेः परः ॥**

****

# इस्लामी आक्रमण

यादव वंशाचे स्थापनेपासून यादवांना आपल्या अनेकानेक शत्रूंशी सतत युद्धे करावी लागली. द्वारसमुद्रचे होयसळ, वरंगलचे काकतीय, माळव्याचे परमार, गुजराथचे चालुक्य व वाघेला शिलाहार, कदंब यांच्याशी यादवांच्या सतत लढाया चालूच असत. शेवटी रामचंद्रदेवाचे राज्यकाळात यादवांचे बहुतांश शत्रू परास्त होऊन यादव साम्राज्य पूर्णपणे निष्कंटक झाले. परंतु स्वतःच्या साम्राज्याचा विस्तार करीत असताच यादवांनी उत्तरेतील परमार-वाघेला यांच्या राज्यावर सतत आक्रमणे करून त्यांचा नाश जवळ आणला व आपल्या राज्यावर इस्लामी आक्रमणाचे संकट ओढवून घेतले. याउलट यादवांनी उत्तरेतील ह्या सत्तांना जर इस्लामी आक्रमणाविरुद्ध साहाय्य केले असते, तर कदाचित यादव साम्राज्याचा अस्त इतक्या लवकर होता ना. ही राजकीय अदूरदर्शिता यादवांच्या नाशाला मुख्यत्वेकरून कारणीभूत झाली. दक्षिणेतील होयसळ, काकतीय यांच्या राज्यांचा नाश करण्याच्या नादात यादवांनी आपल्या उत्तर सीमेकडे अक्षम्य दुर्लक्ष केले.

यादवांचे सैन्य कितीही पराक्रमी असले, तरी या सैन्यात शिस्त, सुव्यवस्था व संघटन यांचा पूर्ण अभाव होता, असेच दिसते. दक्षिणेतील हिंदू राजांचा मुख्य भर हत्तींवर असे. यादव सैन्यातही हत्तींना फार महत्त्व असे, हे यादवांच्या अनेक शिलालेखांतून त्यांच्या गजसैन्याचे जे अतिशयोक्त वर्णन येते त्यावरून स्पष्ट आहे. हत्तींना लढण्याचे विशेष शिक्षण दिले जात असे. ते सोंडेत नाना प्रकारची शस्त्रे धरून शत्रू पक्षावर तुटून पडत अथवा, बाण, भाले इत्यादि शस्त्रांचा शत्रू सैन्यावर वर्षाव करीत. युद्धप्रसंगी त्यांना मद्य आदि पाजून मत्त बनविले जात असे. ह्या हत्तींचा सैन्यात मोठा भरणा असल्यामुळे सैन्याच्या हालचाली साहजिकच अतिशय मंदपणे होत असे.

याउलट अश्वदलाकडे दक्षिण भारतीय राजांनी दुर्लक्षच केले. हिंदूनी हत्तींवरच प्रेम केले. ग्रीक किंवा अरबांप्रमाणे घोड्यावर प्रेम करणे त्यांना जमलेच नाही. प्रख्यात जगप्रवासी मार्कोपोलो आणि मुस्लीम इतिहासकार  वस्सफ ह्यांनी आपआपल्या ग्रंथात याविषयी सविस्तर विवेचन केले आहे. ते लिहितात, 'भारतीय राजे एकेका घोड्याला ५०० सागी (एक प्रकारचे सुवर्ण नाणे)देऊन घोडे विकत घेत, पण त्यांची निगा कशी राखावी हे त्यांना ठाऊक नसे. ते घोड्यांना उत्कृष्ट आहार देऊन ४० दिवसांपर्यंत ठाणबंद करून ठेवीत. त्यामुळे घोडे थोडे पुष्ट होत. पण चपळ होत नसत. त्यांना घोड्याचा नियमित व्यायाम, औषधोपचार यांची काहीच माहिती नसे. साहजिकच घोडे लवकर थकत, युद्धाला निरुपयोगी होत व दरवर्षी नवीन घोडे घेण्यात मग अमाप संपत्ती खर्च होई. मार्कोपोलो लिहितो की, अरबी व्यापारी भारतीयांना घोड्यांचे रोग व त्यावरील औषधोपचार ह्यांची माहिती सांगत नसत.

यादवकालीन ग्रंथातून सैन्याचे वर्णने आली आहेत. ती पाहिली की, यादव सैन्य अतिशय

गलथान व अव्यवस्थित असावे, असेच वाटते. भास्करभट्ट बोरीकरांचे 'शिशुपाल वध' काव्य, नरेंद्र कवीचे 'रुक्मिणीसैंवर' या काव्यातून जी सैन्यवर्णने येतात, त्यावरून सैन्यात बिगरलढाऊ, निष्क्रीय अशा बाजारबुणग्यांचा बराच भरणा असावा, असे दिसते. या दोन्ही कवींनी सैन्याबरोबर असणाऱ्या 'थापटे, दिवटे, वाहनधर, सागळिये, भांडारी, हडपिणी' इत्यादि अनेक बिगरलढाऊ लोकांचा निर्देश केला आहे. हडपिणी या सैन्यातील सैनिकांना विडे देणाऱ्या तरुण स्त्रिया (हडप = पानांची पेटी, पेटारा) असत. अशा एका हडपिणीचे अतिशय सुंदर शब्दचित्र भास्करभट्ट बोरीकराने आपल्या शिशुपाल वध काव्यात रंगविले आहे. सैन्याच्या प्रयाणाच्या दाटीत एक हडपिण घाबरली व तिने आपले दोन्ही हात उंचावले. त्यामुळे 'चोळीयांची पाखे' वर उचलली जाऊन तिची 'चांपेगौर अंगांगे' उघडी पडली. साहजिकच सर्व राऊत (सैनिक) तिच्याकडेच पाहू लागले व तिच्या विशाल स्तनपर्वतांचे घाट चढता-उतरता त्यांचे डोळे थकून गेले. शेवटी 'दळवै कोपीन्नले' सेनापती (दलपती>दलवई>दळवी) रागावले व त्यांनी राऊतांना पुढे काढले. हे वर्णन अतिशयोक्त व शृंगारिक असले, तरी त्यावरून यादव सैन्याच्या शिस्तीचे व नीतिमत्तेचे दर्शन घडते, हे निश्चित.

युद्धशास्त्राची व सैन्यातील व्यवस्थेची अक्षम्य उपेक्षा केल्यामुळेच हिंदू परकीयांकडून सतत मार खात आले. उलट तुर्कांची दले अश्वदलावर जास्त भर देणारी, त्यामुळे अतिशय वेगवान, त्यांचे सेनापती जास्त कुशल व कार्यक्षम तर हिंदू सैन्ये मंद व सेनापती उदासीन. हा असा विषम संघर्ष नेहमी घडून येई.

शिवाय इस्लामी आक्रमणाचे सर्वंकष स्वरूपही हिंदूंच्या लक्षात आले नाही. परमार, चंदेल, चाहमान, यादव व होयसळ ह्या देशी सत्तांप्रमाणेच मुसलमान ही आणखी एक नवी सत्ता आहे, असेच हिंदू मानत आले. त्यामुळे मूर्तिभंजन करणारा सुलतानदेखील 'सुरत्राण' असे संस्कृत रूप घेऊन इथे लोकप्रिय झाला. अल्तमश, बल्बन यांसारख्या सुलतानांनाही साहाय्य करण्यास भारतीय क्षत्रियवीर पुढे आले व ब्राह्मणांनीही देववाणी संस्कृतमधून त्यांच्या विजयाची वर्णने लिहिली.[1] अर्थात् कडवेपणे मुसलमान लढू शकत. पण भारतीयात हा कडवेपणा कधी उतरलाच नाही.

यादवसत्तेच्या अंताचीही कथा फारशी वेगळी नाही. वस्तुतः अल्लाऊद्दीन खलजी हा कोणी मोठा महत्त्वशाली शासक होता असेही नाही. दिल्लीचा जलालुद्दीन खलजी ह्याचा तो पुतण्या व जावई. झियाउद्दीन बारनी हा मुस्लीम इतिहासकार आपल्या 'तारीख-इ-फिरोजशाही' या ग्रंथात

**१. यस्मिन् दिग्विजये प्रयाणपकरे गौडा निराडंबरा। आंध्रा रंध्रपरायणा भयवशात् निष्केलयः केरला॥ कर्णाटा अपि कंदराश्रयपरा भ्रष्टा महाराष्ट्रजाः त्यक्तोर्जा किल गुर्जराः समभवन् लाटाःकिराटा इव॥ (गियासुद्दीन बल्बनचा पालम (दिल्ली) येथील विहिरीतील शिलालेख.).**

लिहितो, 'अल्लाउद्दीन हा सुलतानाचा पुतण्या व जावई. सुलतानाने त्याला प्रयागजवळ कडामाणिकपूर या भागाचा शासक नेमले होते. सुलतानाची संमती घेऊनच त्याने विदिशा (भेलसा) नगरीवर आक्रमण केले व तेथील मंदिरे लुटून आणलेली संपत्ती चुलत्यासमोर ठेवली. जलालुद्दिनाने प्रसन्न होऊन त्यास अयोध्या प्रांत दिला व 'आरिज-मुमालिक' (सेनाध्यक्ष) ही पदवी दिली. पण अल्लाउद्दीनची पत्नी राजकुमारी असल्यामुळे त्याचा मुळीच सन्मान ठेवीत नसे. त्याची सासूही सतत त्याचेविरुद्ध सुलतानाचे कान भरीत असे. आपण एखादा नवीन प्रदेश जिंकून आपले स्वतंत्र राज्य स्थापन करावे, असे अल्लाउद्दीनच्या मनात आले. विदिशा येथे असताना त्याने देवगिरीच्या संपत्तीविषयी ऐकले होतेच. तेव्हा देवगिरीवर आक्रमण करण्याचे त्याच्या मनात मूळ धरू लागले. सुलतानाजवळ त्याने मध्यभारतातील चंदेरी ह्या प्रख्यात व्यापारी नगरावर आक्रमण करण्याची अनुमती मागितली व त्याच्या मनातील हेतू ठाऊक नसल्यामुळे सुलतानाने त्याची विनंती सहजच मान्य केली.[२] अल्लाऊद्दीनाच्या प्रयाणाची नेमकी तिथी बारनी देत नाही. प्रख्यात कवी अमीर खुसरो मात्र अल्लाऊद्दीनच्या या आक्रमणाच्या तिथ्या खालीलप्रमाणे देतो.

| | |
|---|---|
| कडा-माणिकपूर सोडले | कडा-माणिकपूरला परतला |
| ता. १९ रबिऊलआखर ६९५ हिजरी | ता. २८ रजब ६९५ हिजरी |
| (ता. २५ फेब्रुवारी १२९६ इ. स.) | (ता. १ जून १२९६)[३] |

२. झियाऊद्दीन बारनी, तारीख-इ-फिरोजशाही, भाषांतर इलिटय व डॉसन, भाग ३ रा, पृ. १४८-१४९. ३. अल्लाऊद्दीनाच्या आक्रमणाविषयी सर्वच माहिती या मुसलमान लेखकांवरून मिळवावी लागते. स्वतः यादवांच्या वा नंतरच्या राजांच्या अभिलेखातून वा हिंदू ग्रंथातून या आक्रमणाचे उल्लेख आढळत नाहीत. महानुभावीय वाङ्मयात काही उल्लेख येतात व ते अतिशय संक्षिप्त आहेत. अमरावती (विदर्भ) येथील विद्वान् महानुभावीय संशोधक श्री अण्णासाहेब अडसोड व श्री. चंद्रकांतराव निंभोरकर यांनी त्यांच्याजवळील यक्षदेव आम्नायाची एक पोथी प्रस्तुत लेखकास दाखविली होती. तिच्यात एका स्वतंत्र पृष्ठावर 'रामराये जाधवाचा काळनिर्देश' ह्या शीर्षकाखाली तीन श्लोक दिले होते, ते असे-

शाके सप्तशशिद्विभूपरिमिते संवत्सरे मन्मथे
मासे फाल्गुनके तिथौ प्रतिपदे शुक्ले च मंदेदिने
म्लेंच्छे शास्त्रअलाउदीन रिपुणा भद्रो गृहीतस्तथा
श्रीमद्देवगिरौ स्थितस्य नृपते रामस्य राज्ये गते ॥

अर्थात् शाके १२१७ (सप्त शशि द्वि. भू) मन्मथ संवत्सर, फाल्गुन शुद्ध प्रतिप्रदा शनिवार या दिवशी रामचंद्रदेवाचे राज्य अल्लाऊद्दीनाने घेतले असा अभिप्राय दिसतो. शाके १२१७ ला मन्मथ संवत्सर येतो. पण इतर विवरण पिल्ले यांच्या जंत्रीशी जुळत नाही. शाके १२१७च्या फाल्गुन शुद्ध प्रतिपदेस मंगळवार येतो. शनिवार येत नाही. इतर दोन श्लोकांतून (अ) शाके १२१७ (महर्षी शशि पक्ष भूमि) फाल्गुन अग्निमास) शुद्ध प्रतिप्रदा शनिवार व (ब) शाके १२१२(सूर्यदिवाकर) विकृत संवत्सर

पुढील पानावर

देवगिरीवर आक्रमण करण्यापूर्वी अल्लाऊद्दीनने हेरांकडून आधीच सर्व माहिती जमा केली होती व रामचंद्रदेवाचे सैन्य राजधानीत नसेल, अशी खात्री करून घेतली होती, असे वस्सफ लिहितो. तर त्याने कडा-माणिकपूर येथे आपला विश्वासू अधिकारी अलाउलमुल्क ह्याला ठेवले, असे बारनी सांगतो.[४] जंगलातून, दऱ्याखोऱ्यांचे मार्गातून ती देवगिरीकडे निघाला व मार्गातील लोकांना त्याने 'आपण वरंगलच्या काकतीयांकडे नोकरीसाठी जातो आहे.' अशी थाप मारली, ही माहिती फेरिश्तांची (लेखन काळ इ. स. १६७०) आहे. विंध्य ओलांडून अल्लाउद्दीनाने प्रथम अचलपूर (एलिचपूर) येथे तळ ठोकला व तो घाटलाजौरच्या (घाटी लाजुरा) मार्गाने देवगिरीकडे निघाला. घाट लाजूर हे देवगिरीच्या पश्चिमेस बारा मैलांवर आहे, असेही सांगतो. देवगिरीजवळ पश्चिमेस लासूर नावाचे गांव आहे. पण ते मैदानावर असून तेथे घाट नाही. बुलढाणा जिल्ह्यातून देवगिरीकडे येताना राजुरा घाट लागतो. (राजुरा रोहिणखेडचा घाट) कदाचित् तो घाट फेरिस्ता यास अभिप्रेत असावा. पण हा घाट देवगिरीचे पूर्वेस आहे. 'अल्लाउद्दीन देवगिरीजवळ आला' हे वृत्त कान्हा नामक एका सामंताने रामचंद्रदेवास सांगितले. पण रामचंद्रदेवाने त्याचेकडे दुर्लक्ष केले असे बारनी सांगतो. तर इसामी[५] लिहितो. 'कान्हा हा मिळतील तेवढे सैनिक घेऊन लाजौरा घाटात अल्लाउद्दीनास आडवायला उभा राहिला. तो स्वतः आणि त्याच्या परिवारातील दोन स्त्रियां तर वाघिणींसारख्या लढल्या, पण कान्हाचा पराभव झाला व अल्लाऊद्दीन देवगिरीकडे निघाला.

अल्लाऊद्दीन देवगिरीला पोचल्यानंतर नेमके काय घडले ? मुस्लीम इतिहासकार याविषयी एकतर मौन तरी पाळतात अथवा काहीतरी लिहून वेळ मारून नेतात. मुस्लीम इतिहासकारांपैकी खुसरौ हा सर्वात आधीचा लेखक. (प्रस्तुत घटनांच्या संदर्भात) त्याचा ग्रंथ तारीख अनाई इ. स. १३२० च्या आसपासचा असावा. कारण इ. स. १३२५ला खूसरो मरण पावला होता. अल्लाउद्दीनच्या या पहिल्या आक्रमणात नेमके काय घडले हे तो सांगत नाही. बारनी तर

---

मागील पानावरुन

**भाद्रपद शुद्ध ८ (वसुमति तिथी) मंगळवर ही तिथी 'रामस्य राज्यंगते' ह्या घटनेची दिली आहे. शके १२१२ला विकृत संवत्सर येतो. पण ही तिथी उघडच चुकीची आहे. 'खलजीकालीन भारत'(India under Khaljis) या ग्रंथात डॉ. अतहरअब्बास रिजवी डिसेंबर १२९३ ही अल्लाउद्दीनाच्या आक्रमणाची मिती देतात. ती कशाचे आधारावर हे समजत नाही.**

**४. इतिहासकार जियाऊद्दीन वारनी याच अलाउलमुकाचा पुतण्या होय. त्याने इ.स. १३५७ मध्ये फिरोजशहा तुघलकाचे राज्यसभेत तारीख-इ-फिरोजशाही हा ग्रंथ लिहिला.**

**५. इसामी हा इ. स. १३२४ मध्ये देवगिरी येथे आला. त्यावेळी तो १५ वर्षांचा होता. इ. स. १३५० पर्यंत तो देवगिरी येथेच होता. त्याचा आजोबा इज्जुद्दीन यांस महंमद तुघलकाने आपली राजधानी बदलण्याच्या सुप्रसिद्ध प्रयोगात दिल्लीहून फरफटत देवगिरी येथे आणले होते. त्याच्या ग्रंथाचे नांव फूतूस्सलातीन (सुलतानांचे विजय) असे आहे. हा काव्यमय ग्रंथ त्याने इ. स. १३५० मध्ये पूर्ण केला.**

अल्लाउद्दीन व रामचंद्रदेव यांच्यातील युद्धाचा उल्लेखसुद्धा करीत नाही. उलट तो लिहितो की, अल्लाउद्दीन आला, तेव्हा रामचंद्रदेव सैन्य व परिवार घेऊन दूर कोठेतरी गेला होता. त्याने मिळेल ते सैन्य जमा करून घाट लाजौरा येथे अल्लाउद्दीनास अडविण्यासाठी पाठविले. त्या सैन्याचे नेतृत्व कान्हा या सामंताकडे होते. पण त्यांचा पराभव झाला. मराठ्यांनी तुर्कांचे नावही ऐकले नव्हते. इत्यादि.[६] बारनी पुढे लिहितो अल्लाऊद्दीनाने पहिल्या दिवशी तीस हत्ती व एक हजार घोडे जिंकले. स्वतः रामचंद्रदेव शरण आला.' पण हे सर्व आधारहीन दिसते.

युद्धाचे थोडेबहुत वर्णन इसामीने दिले आहे. तो म्हणतो 'तुर्कांनी कान्हा याचा पराभव करून देवगिरीपर्यंत त्याचा पाठलाग केला. रामचंद्रदेवाचे सैन्य घेऊन त्याचा पुत्र भिल्लम (सहावा) हा दूर देशी गेला होता. सैन्य नसल्यामुळे रामचंद्रदेवाला फार वाईट वाटले. तुर्कांनी देवगिरीला वेढा घातला. तेव्हा रामचंद्रदेवाने अल्लाउद्दीनास संपत्ती देऊन त्याच्याशी तह केला. इकडे भिल्लम परतल्यावर तो फारच आवेशाने तुर्की सैन्यावर तुटून पडला. पण रामचंद्रदेवाने त्यास समजावून गप्प बसविले. आपली कन्या अल्लाउद्दीनास देऊ केली. रामचंद्राने अल्लाउद्दीनाला पुत्र म्हटले व त्यानेही रामदेवाला बाप म्हटले. संपत्ती घेऊन अल्लाउद्दीन परत फिरला.'

आता उरला फेरिश्ता. त्याचा ग्रंथ या आक्रमणानंतर तीनशे वर्षानंतर लिहिला गेला. त्यामुळे फेरिश्ताने मनात येतील त्या थापा अगदी सहजपणे भिरकावून दिल्या आहेत. फेरिश्ता लिहितो,' अल्लाउद्दीनाने असा भास निर्माण केला की, त्याच्या साहाय्यासाठी आणखी प्रचंड सैन्य येत आहे. त्यामुळे राजा घाबरला व त्याने अल्लाउद्दीनास ५० मण सोने, रत्ने आदि देऊन तह केला. त्याचा पुत्र शंकरदेव[७] सैन्य घेऊन परतला. रामचंद्राने त्यास शांत करण्याचा प्रयत्न केला. पण तो मुस्लीम सैन्यावर तुटून पडला. पण त्याचा पराभव झाला. आता अल्लाउद्दीनाने ६० मण सोने, २ मण मोती, १०० मण रुपे व ४००० रेशमी वस्त्रे एवढी लूट नेली व अचलपूर प्रांत आपल्या राज्यास जोडला.

फेरिश्ताचे हे वर्णन निसंशय अतिशयोक्त आहे. शिवाय फेरिश्ता हा या घटनेनंतर ३००

---

६. हे अर्धातच चूक आहे. राष्ट्रकूटांच्या काळापासून महाराष्ट्रात अरब तुर्क नांदत होते. यांपैकी काही तर राष्ट्रकूटांच्या नोकरीतही होते. उदाहरणार्थ, अरब सुगतिप (सुबुक्तगीन) हा राष्ट्रकूट सम्राट इंद्र तृतीय ह्याचा मांडलिक असून त्याचा शके ८४८ चा चिंचणी ताम्रपट सुंदर संस्कृतात लिहिलेला आहे. (डॉ. मिराशी, नवभारत, जुलै १९५८, पृ. १४) यादव सिंघणदेवाच्या आंबे शिलालेखात खोलेश्वराने 'तुरुष्कांचा' पराभव केल्याचे उल्लेख आहेत. लीळाचरित्रातही तुर्कांच्या अत्याचाराचे पडसाद उमटलेले दिसतात. (लीळाचरित्र, उत्तरार्ध लीळा, क्र. १५७). ७. ह्याचे खरे नाव सिंघणदेव (तृतीय) असे होते. देवगिरी दुर्गात धान्य म्हणून मिठाची पोती भरली गेल्याचीही माहिती केवळ फेरिश्ता लिहितो. अमीर खुसरो, बारनी, इसामी यांनी या घटनेचा मुळीच उल्लेख केलेला नाही. अर्थात् मिठाची पोती फेरिश्ताच्याच सुपीक डोक्यातून निघालेली दिसतात.

वर्षांनंतर लिहिणारा लेखक आहे. त्याला मूळ घटनांची फारशी माहिती नसणारच. पण आतापर्यंत त्याच्याच वर्णनानंतर विसंबून राहून हिंदू इतिहासकारांनी व लेखकांनी रामचंद्रदेवाचा दारूण पराभव रंगविला आहे. 'पौत' या सुप्रसिद्ध कलाविषयक ग्रंथाचे कर्ते श्री. द. ग. गोडसे लिहितात, 'अल्लाउद्दीनाने यादव सम्राटांची समृद्ध देवगिरी लुटून ६०० मण सोने, ७ मण मोती, १००० मण रुपे व ४००० रेशमी वस्त्रे एवढी अफाट संपत्ती नेली.' आधीच फेरिश्ताची अतिशयोक्ती त्यात गोडशांची उडी आणखी पुढेच. गोडशांनी लुटीची ही माहिती कुठून आणली, हे तेच जाणोत. रामचंद्रदेवाचे व यादव साम्राज्याचे चित्र त्यांनी काळेकुट्ट रंगविले आहे. चित्रकारच ते ! त्यांचा हात कोण धरणार ? पण इतिहास प्रांतात तपशीलावर पकड घट्ट असावी लागते. घटनाक्रमाची नीट संगती लावावी लागते. एवढे भान तरी ठेवायचे. फेरिश्ता हा मुसलमानांच्या पडत्या काळतील (इ. स. १६०७) लेखक म्हणजे त्याच्याच जाणिवा वस्तुरूप नसून संकेतावस्थेत परिणत झाल्या होत्या, एवढे सत्य तरी त्यांनी ध्यानी आणून मगच त्याच्या ग्रंथातील माहिती वापरावयाची, पण इतिहासक्षेत्रात आजकाल कोणीही प्रवेश करतो व धुमाकूळ घालतो. तिथे गोडसे यांनीच का मागे राहावे ?[८]

अल्लाउद्दीनाकडून या पहिल्या आक्रमणातच रामचंद्रचा पराभव झाला, असे मुळीच वाटत नाही.

१) खुसरौ, बारनी, इसामी हे समकालीन इतिहासकार अल्लाउद्दीन व रामचंद्रदेव ह्यांच्यातील युद्धाचा निर्देशही करीत नाहीत.

२) युद्धाचे व लुटीचे अतिशयोक्त वर्णन केवळ फेरिश्ता हा ३०० वर्षांनंतर लिहिणारा लेखक करतो. त्याचे लिखाण विश्वासार्ह वाटत नाही.

३) अल्लाउद्दीनशी लढणाऱ्या रामचंद्रदेवाच्या पुत्राचे नाव कुणी भिल्लम तर कुणी शंकरदेव असे दिले आहे. बरे त्याचे व अल्लाउद्दीनाचेही युद्ध झाल्याचे समकालीन इतिहासकार सांगत नाहीत.

४) अशा अवस्थेत ह्या पहिल्या आक्रमणाचे काळात अल्लाउद्दीन देवगिरीपर्यंत तरी

---

८. यादवकालीन लेखक (ज्ञानेश्वर, नरेंद्र इत्यादि) विस्कळीतपणे लिहिणारे आहेत, असे म्हणत असताच स्वतः गोडसेही अतिशय विस्कळित विधाने करतात. अल्लाऊद्दीनच्या पहिल्या व दुसऱ्या आक्रमणांचा त्यांनी घोटाळा केला आहे. महानुभाव वाङ्मयात या आक्रमणांची 'सविस्तर वर्णने' त्यांनाच सापडली आहेत, 'हे हातवणी : जेवण ते पुढा उरलेचि असे' हे नागदेवाचार्यांचे उद्‌गार अल्लाउद्दीनाच्या पहिल्या आक्रमणाविषयी नसून, दुसऱ्या आक्रमणाविषयी आहेत, एवढे भान तरी त्यांनी ठेवावयास हवे होते. यादवांच्या राज्यात प्रजा भीतिग्रस्त होती, हे विधानही त्यांनी फार भडकपणे रंगविले आहे. अशा लेखनाने सत्याचा अपलाप होतो. इतकेच आम्हास म्हणावयाचे आहे. त्यांच्या ग्रंथातील कलाविषयक विवेचनावर बोलण्याचा आमचा अधिकार नाही.

पोचला होता की नाही, याचीच शंका येते. कदाचित् अचलपूर विदर्भ लुटून परत गेला असावा असे वाटते.

५) यादव साम्राज्य एवढ्याशा धक्क्याने कोसळेल इतके दुर्बल होते, असे मानणे फारसे योग्य होणार नाही. एवढ्याश्या युद्धानंतर रामचंद्रदेव अल्लाउद्दीनाचे मांडलिकत्व पत्करील, असे वाटत नाही. त्याचा सार्वभौम उल्लेख असलेले लेख इ. स. १२३२ (इ. स. १३१०) पर्यंत सापडतात.

६) कदाचित् दक्षिणेतील होयसळांच्या रेट्यामुळेच यादवांना अल्लाउद्दीनचा प्रतिकार करता आला नसेल कारण यादवांच्या या अडचणीच्या परिस्थितीचा फायदा घेण्यासाठी होयसळ कधीही मागे सरले नसते.[१] अल्लाउद्दीनाचे हे प्रथम आक्रमण केवळ धाडीच्या स्वरूपाचे होते व तो काही लूट घेऊन गेला इतकेच.

यानंतर अल्लाउद्दीन कडा-माणिकपुरास परत गेला व आपल्या वृद्ध व दयाळू चुलत्याचा खून करून दिल्लीचा सुलतान बनला. (१७ रमजान, ६९५ हिजरी, १९ जुलै १२९६) यादव आणि होयसळ यांच्यात युद्धे होतच राहिली.

**देवगिरीवरील दुसरे आक्रमण :**

सुलतान अल्लाउद्दीन ह्यास सोंगल, राजपूत व उत्तर भारतातील राजसत्ता ह्यांच्याशी लढण्यासाठी द्रव्याची आवश्यकता होतीच. देवगिरी, द्वारसमुद्र, वरंगळ येथील राज्यांतील अपार वैभवाचा आता त्याला लोभ सुटला व त्याने इ. स. १३०७ मध्ये देवगिरीवर पुन्हा आक्रमण केले.

याही आक्रमणांचे वेगवेगळे वृत्तांत मुस्लीम इतिहासकार देतात. खुसरौ लिहितो, 'रामचंद्रदेवाने मांडलिकत्व झुगारल्यामुळे मलिक नायब बारबक ह्याच्या हाताखाली ३०००० घोडेस्वार त्याच्याविरुद्ध पाठविले, ते देवगिरी येथे १९ रमजान ७०६ अ हिजरी (मार्च १३०७) ला पोचले. यादवांचा पराभव झाला. त्याला एक लालछत्र देऊन सन्मापूर्वक वागवून सोडून देण्यात आले. बारनी लिहितो, 'अल्लाउद्दीनाचे सर्व आघाड्यांवरचे सैन्य एकत्र करून मलिकनायब काफूर हजारदिनारी ह्याचे नेतृत्वाखाली बरोबर लालछत्र देऊन देवगिरीवर पाठवले. बरोबर ख्वाजा हाजी हाही होता. काफूराने यादव प्रदेश लुटून जाळून टाकला व रामचंद्रदेव व त्याचा पुत्र ह्यांना पकडून दिल्लीस नेले. १७ हत्ती व इतर संपत्तीही नेली. सुलतानाने रामचंद्रास सन्मानाने वागविले व एक लाख टंक व रायरायान् ही पदवी देऊन परत पाठविले' इसामी म्हणतो 'आपला मुलगा हा माझ्याविरुद्ध कारस्थाने करतो, त्याला शासन करा.' असा निरोप रामचंद्रानेच अल्लाउद्दीनाला

१. यादवांच्या ह्या अडचणीचा लाभ घेऊन होयसळ वीरबल्लाळदेव तृतीय ह्याने त्वरित शांतलिंगे १००० व वनवासी १२००० हा भाग व काकतीय नृपती प्रतापरुद्राने अनंतपूर व रायपूर जिल्हे आपआपल्या राज्यास जोडून टाकले. यावरूनही रामचंद्रदेव कोणत्या दडपणाखाली वावरत होता व त्याने अल्लाउद्दीनला कडवेपणे प्रतिकार कां केला नसावा, हे कळते.

पाठविला. म्हणून मलिककाफूरचे आक्रमण झाले. अल्लाउद्दिनाने रामचद्रास नवसारी प्रांत दिला.[१०] फेरिश्ताही याच मताचा आहे.

या सर्व विधानातील विसंगती स्पष्टच आहेत. अल्लाऊद्दिनाने रामचंद्रास नवसारी प्रांत दिला, ही तर शुद्ध थाप आहे. कारण नवसारी येथेच रामचंद्रदेवाचा शिलालेख सापडला असून, तो विक्रम संवत १३५९ (इ. स. १३०२) चा आहे व त्यात रामचंद्रदेवाला 'महाराजाधिराज' इत्यादि पदव्या आहेत. म्हणजेच काफूरचे आक्रमण होण्यापूर्वी नवसारी प्रांत रामचंद्रकडेच होता. पराभूत व मांडलिक राजास दोन लाख टंक (एक प्रकारचे चांदीचे नाणे) कुणी देईल ? अर्थात् या दुसऱ्या आक्रमणात जरी रामचंद्रदेवाचा पराभव झाला असला, तरी त्याला सन्मानाने वागवावे लागले, इतका तो सामर्थ्यशाली होता, हे निश्चित दिसते. काफूरचे हे आक्रमण प्रचंड स्वरूपाचे होते. पण इतरत्र युद्धाचे तपशील देणाऱ्या मुस्लीम इतिहासकारांनी इथेही युद्धवर्णनाविषयी मौनच पाळले आहे. रामचंद्राला धरून दिल्लीला नेले की तो स्वखुशीने गेला ते कळत नाही. महानुभावीय ग्रंथ स्मृतीस्थळात नागदेवाचार्यांचे तोंडी 'रामदेवो धरिला : परि सुटैल' असे उद्‌गार आहेत. व यादर 'साधुसंतांचे वाईट केले, म्हणून धरला' व महाराष्ट्रात जोपर्यंत मी आहे' तोपर्यंत यादवांचे राज्य चालेल' (ना मी वर्ते तवं मऱ्हाटें वर्ते) असेही त्यांनी सांगितले.[११] व पुढे 'हे तो हातवणी : जेवण पुढा उरलेची असे' हे तर हातावर पाणी दिले. अजून जेवण पुढे व्हावयाचेच आहे असे उद्‌गार काढले. रामचंद्रदेवाची राणी कामाइसा नागदेवांची शिष्या होती. व हे शिष्यत्व पत्करायला रामचंद्रदेवाने तिला पूर्ण अनुमती दिली होती.

रामचंद्र दिल्लीहून परतल्यानंतरही तो अल्लाउद्दिनाचा मांडलिक झाल्याचे आपणास दिसत नाही. कारण त्याच्या शिलालेखातून त्याच्या पदव्या महाराजाधिराज इत्यादि दिलेल्या आहेत. तो मांडलिक होता तर त्याने या पदव्या वापरल्या नसत्या. अल्लाउद्दिनाने दिलेली 'रायरायान' ही पदवी तर त्याच्या एकाही लेखात सांपडत नाही. इ. स. १३११ मध्ये मलिककाफूर द्वारसमुद्रच्या होयसळांविरुद्ध निघाला, तेव्हा रामचंद्राने पारसदेव दळवी ह्यास मार्ग दाखविण्यास त्याच्या बरोबर दिले, असे खुसरो लिहितो. पारसदेव दळवीच्या राजधानीचे नांव बांदरी असे होते. तिकडून काफूर

१०. अमीर खुसरौच्या आशिका, खिज्रखान-दावलरानी व नूहसिपिहर या ग्रंथातून एक वेगळेच कथासूत्र आहे. गुजराथचा वाघेला व राजा कर्णदेव याच्यावर आक्रमण करून अल्लाउद्दिनाने त्याची राणी कमलादेवी हिला पळविले. पण कर्णाची मुलगी देवलदेवी मात्र निसटली. तिच्यासह कर्णाने यादव राज्यात आश्रय घेतला. शंकरदेवाने तिचे लग्न आपला धाकटा भाऊ भिल्लम ह्याच्याशी ठरविले. कमलदेवीने आपली मुलगी परत आणावी, म्हणून अल्लाउद्दिनाकडे हट्ट धरला म्हणून मलिककाफूरची रवानगी देवगिरीकडे करण्यात आली. ११. यावर नागदेवांनी 'यस्मिन्देशेवसेत् ज्ञानी योगी स्वाध्यात्मचेतसः। तन्मंडळं पवित्रं च प्रयाति निमिषाद् ध्रुवं ॥ हा श्लोकही म्हणून दाखवला या धाडीत जनतेची जी पळापळ झाली, त्याचे थोडे वर्णन स्मृतीस्थळात आहे.

परत येत असता रामचंद्रदेवाचा मृत्यू झाला होता.[१२] यादव अडचणीच्या परिस्थितीत असता शांतलिंगे १००० व बनवासी १२००० ह्या त्यांच्या प्रदेशाचे लचके तोडणाऱ्या होयसळांविरूद्ध रामचंद्राने काफूरास मदत केली, त्यात तो होयसळांइतकाच दोषी आहे.

**सिंघणदेव तृतीय :**

रामचंद्राच्या या मुलाचे नाव महाराष्ट्रात शंकरदेव असेच उच्चारले जाते. पण त्याचे खरे नाव सिंघण असेच होते. (स्मृतीस्थळात त्यास 'सिंगुण' म्हटले आहे. मुस्लीम इतिहासकार त्यास शंकरदेव म्हणतात) याशिवाय भिल्लम (सहावा) व बल्लाळ हे रामचंद्राचे आणखी दोन पुत्र. यापैकी सिंघणाने सुलतानाविरुद्ध युद्धाचे निशाण उभारले. बारनी व खुसरौ त्याच्या बंडाचाही उल्लेख करीत नाहीत. फेरिश्ता मात्र करतो. इसामी विद्रोहकर्त्या राजपुत्राचे नाव भिल्लम असे देतो. फेरिश्ता सांगतो, ' शंकरदेवाचा पराभव झाला व त्याला क्रूरपणे ठार करण्यात आले.' इसामी लिहितो, 'काफूर यानंतर तीन वर्षे देवगिरी येथे राहिला व त्याने तेथे मशिदी इत्यादि बांधल्या. दक्षिण भागात रायदुर्ग येथील मल्लिदेव (हा रामचंद्रदेवाच्या बहिणीचा मुलगा होता.) कांपिलदेव इत्यादिंनी काफूरविरुद्ध बंडे केली पण ती मोडण्यात आली.

**हरपालदेव व राघव :**

सिंघणदेव तृतीय ह्याचे पश्चात् यादव राज्यात अराजकच निर्माण झाले. दिल्ली येथेही सुलतान अल्लाउद्दिनाचा मृत्यू होऊन बऱ्याच रक्तपातानंतर अल्लाउद्दिनाचा तिसरा मुलगा कुतुबुद्दीन मुबारकशहा हा सुलतान बनला.[१३] बारनी लिहितो. '७१८ हिजरीमध्ये (इ. स. १३१८) सुलतान सैन्यासह देवगिरीवर चालून आला. कारण मलिककाफूरच्या मृत्युनंतर हरपालदेव व रामदेव यांनी देवगिरी परत जिंकून घेतली होती. सुलतानाने लढाई न देता किंवा रक्तही न सांडता देवगिरी दुर्ग परत जिंकून घेतला. हरपालदेवास पकडून त्याचे चामडे छिलून ते देवगिरीच्या वेशीवर टांगण्यात आले. मलिक यकलाखी ह्याला देवगिरीचा शासक नेमण्यात आले ? इसामी सांगतो, 'हरपालदेव परेंड्याच्या दिशेने पळून गेला. बुगदार खानाचा मुलगा त्याच्या पाठलागावर गेला. त्याला पकडण्यात आले व त्याची संपत्ती हिसकावून घेण्यात आली.' फेरिश्ता सांगतो की, हरपालदेवाचे डोके कापून ते देवगिरी दुर्गावर लटकवण्यात आले'

डॉ. रित्ति ह्यांनी हरपालदेवानंतर मल्लुगी तृतीय हा सिंघणाचा मुलगा महंमद तघलकाच्या

१२. त्याचा शेवटचा शिलालेख शाके १२३२ (इ. १३१०) चा आहे. १३. याची आई जेठाई ही रामचंद्रदेवाची मुलगी होती, अशी आख्यायिका आहे. रामचंद्रदेवाने अल्लाउद्दिनच्या पहिल्याच आक्रमणानंतर तिचा विवाह सुलतानाशी केला, असे सांगितले जाते. तिच्या जीवनकथेवर 'छताई वार्ता' (जेठाई वार्ता) नामक रचनाही आहे. पण आवश्यक तो पुरावा नसल्यामुळे या दंतकथांवर विश्वास ठेवता येत नाही.

सेवेत दाखविला आहे. पण असा कोणी मल्लुगी तृतीय इतिहासाला ज्ञात नाही. त्यांनी यासाठी ज्या शिलालेखाचा आधार घेतला आहे तो धाबादेव शिलालेख सिंघण प्रथम ह्याचा पुत्र मल्लुगी प्रथम ह्याचा असून तो अंदाजे शके १०७० (इ. स. ११४८) चा आहे. तो डॉ. तुळपुळे ह्यांनी आपल्या प्राचीन मराठी कोरीव लेख ह्या ग्रंथात क्र. ६४ चा लेख म्हणून छापला आहे. अर्थात् डॉ. रित्ति यांचे हे मत विपर्यास्त आहे.

मुस्लीम इतिहासकारांच्या या एकांगी, विकृत व अतिशयोक्त विधानांवरून यादवांचे राज्य प्रतिकाराशिवायच नष्ट झाले असा भास होतो, पण ते खरे नाही. स्वतः रामचंद्रदेव, सिंघण तृतीय, भिल्लम सहावा, हरपालदेव, राम (राघव) ह्यांनी मुस्लीमांना कडवा विरोध केला असला पाहिजे. पण होयसळांच्या दबावामुळे व नायक पडल्यानंतर संपूर्ण प्रतिकारच मोडून पडण्याची हिंदूंची परंपरा असल्यामुळे यादव राजवंश संपताच प्रतिकार कमी झाला, तरी कोंकण, कोल्हापूर, संगमेश्वर व जावळी येथील सामंत मुस्लीमांना शरण गेले नाही. त्यांची मदत घेऊनच बहमनी सुलतानांना, निजामशाही व आदिलशाही राज्यांना आपली सत्ता टिकवावी लागली.

****

# हेमाद्रीच्या राजप्रशस्तीतील ऐतिहासिक वंशावळीचा भाग व काही यादव अभिलेखांचे वाचन

## १. राजप्रशस्ती

वज्रस्य सूनुः प्रतिबाहुरासीद्दासीकृतक्ष्मापतिचक्रवालः
ततोऽपि सम्राडभवत्सुबाहुः प्रासूत सोयं चतुरस्तनूजान् ॥१८॥
तेन ते सार्वभौमेन तनया विनयान्विताः
विभज्य वसुधाचक्रं चक्रिरे पृथिवीश्वराः ॥१९॥
यथाविभागं वसुधामशेषां तेषां तदा पालयतां चतुर्णाम्
दृढप्रहारी दिशि दक्षिणस्यां प्रभुर्बभूव प्रथमात्कनीयान् ॥२०॥
सर्वेपि पूर्वं मथुराधिनाथाः कृष्णादितो द्वारवतीश्वरास्ते
सुबाहुसूनोरनु दक्षिणाशाप्रशासिनो यादववंशवीराः ॥२१॥
ततः स राजा निराजधानीमधिष्ठितः श्रीनगरं गरीयः
लेभे सुतं सेउणचन्द्रसंज्ञं यत्संज्ञया सेउणदेशमाहुः ॥२२॥
अथ धाडियमो महीपतिस्तनयस्तस्य बभूव भिल्लमः
अजनिष्ट ततोपि राजुगिस्तदनु प्रादुरभूत्स बादुगिः ॥२३॥
जज्ञे धाडियमस्ततः प्रतिभटक्ष्मापालकालानलः
तस्मादाविरभूत्प्रभूतविभवो भर्ता भुवो भिल्लमः
एतस्मान्महसां महानिधिरसौ श्रीवेसुगिर्जज्ञिवान्
हन्ता भीष्मभुजौजसामसुहृदां तस्मादभूदर्जुनः ॥२४॥
अजस्रमाविष्कृतदानवारिः प्रभूतहस्तार्चितदानवारिः
ततः स राजा विरराज राजश्रियो विलासैजितराजराजः ॥२५॥
आसीद्विलासी नृपतेरमुष्मात्स भिल्लमः पल्लवितोरुकीर्तिः
स वादुगिः स्वादुगिरां कवीनां स्तोत्रैकपात्रं भवति स्म तस्मात् ॥२६॥
ततो मर्ही महीपालः पालयामास वेसुगिः
संहृतप्रोद्यदुद्दाम धामसामन्तसंततिः ॥२७॥
ततोपि नृपभिल्लमः समरसीमभीमक्रिया
निरर्गलभुजार्गलायुगलकाललीलालयः
ततः समदमेदिनीपतिपतङ्ग भङ्गव्रतः
प्रतापशिखिलङ्घितत्रिजगदङ्गणः सेउणः ॥२८॥
समृद्धतो येन महाभुजेन द्विषां विमर्दात्परमर्दिदेव
आस्थापि चालुक्यकुलप्रदीपः कल्याणराज्येपिऽस एव येन
परम्मदेवः स ततो बभूव द्विषद्वधूनेत्रघनाम्बुवृष्टिः
परम्मदेनेव रुचां चयेन यस्य प्रतापेन चिरं व्यराजि ॥३०॥
तस्मादनन्तरमनन्तभुजप्रतापः

क्षोणिपतिः समभवत्स ह सिंहराजः
तस्यानुजस्तदनु भूवलयं बलीयान्
अत त्रिजगती विजयी स राजा ॥ ३१ ॥
लञ्जीपुरात्समानीय कर्पूलतिलकं गजम्
स कर्पूरव्रतं पूर्णकरामत्परनन्दितः ॥ ३२ ॥
तस्मादप्रतिमल्लोभूत् मल्लुगिर्वल्लभः क्षितेः
उदजृम्भत जम्भारिर्भूरि दोर्दण्डचण्डिमा ॥ ३३ ॥
आसद्य सद्यः स्वनिवासहेतोः श्रीपर्णखेटं नगरं रिपुभ्यः
आहारि येनोत्कलभूमिपालादुत्तुंङ्गमातङ्गघटा हठेन ॥ ३४ ॥
तस्मादमरगाङ्गेयः संबभूव भुवः पतिः
अथाविन्दत गोविन्दराजः साम्राज्यसंपदम् ॥ ३५ ॥
ततो मल्लुगिपुत्रोभूद्भूपालोमरमल्लगीः
अथ कालीयबल्लाळः पालयामास मेदिनीम् ॥ ३६ ॥
महीपतेस्तस्य विहाय पुत्रान् गुणनुरक्ता यदुवंशलक्ष्मीः
श्रीभिल्लमस्तस्य ततः पितृव्यमव्याजरातेद्भुजमाजगाम ॥ ३७ ॥
यः श्रीवर्धनमाससाद नगरं क्षोणीपतेरन्तला-
-द्यः प्रत्यण्डक भूभृतं च समरे दुष्टं व्यजेष्ट क्षणात्
यो वा मङ्गलवेष्टकं क्षितिमर्ति श्रीबिल्लणं जघ्निवान
कल्याणश्रियमप्यवाप्य विदधे यो होसलेशं व्यसुम् ॥ ३८ ॥
स दण्डिकामण्डलमण्डयित्रीमकम्पसंपत्प्रभवैर्विलासैः
चक्रे पुरं देवगिरिं गिरीशप्रसादसंसादितदिव्यशक्तिः ॥ ३९ ॥
तदनु मदनमूर्तिः कार्तिकीचन्द्रसान्द-
-द्युतिविशदयशोभिः शोभिताशावकाशः
अभवदवनिपालो जैत्रपालः करालः
प्रहरणरणरंगगदत्तुंग खंगः ॥ ४० ॥
दीक्षित्वा रणरङ्गदेवयजने प्रोदस्तशस्त्रस्त्रुवः
श्रोणीभिर्जगतीपतीन्हुतवता येन प्रतापनले
तिल्लङ्गाधिपते पशोर्विशसनं रौद्रस्य रौद्राकृतेः
कृत्वा पूरुषमेधयज्ञविधिना लब्धस्त्रिलोकीजयः ॥ ४१ ॥
तस्मादभूदभिनवस्मरचारुमूर्तिः
कीर्ते पदं स किल सिंघणदेवभूपः
उद्दण्डदोर्युगलगर्वितवैरिवीर
सीमन्तिनीवदनकैरवचण्डभानुः ॥ ४२ ॥
येनानीयत मत्तवारणघटा जज्जल्लभूमीभृतः

कक्कूलादवनीपतेरपहृता येनाधिराज्यश्रियः
येन क्षोणीभृदर्जुनोपि बलिना नीतः कथाशेषतां
येनोद्दामभुजेन भोजनृपतिः काराकुटुम्बीकृतः ॥ ४३ ॥
यद्रम्भागिरिकेसरी विनिकृतो लक्ष्मीधरः क्ष्मापति-
र्यद्वाहावलिभिः प्रसह्य रुरुधे धाराधराधीश्वरः
बल्लाळक्षितिपालपालितभुवां सर्वापहारश्च यः
श्रीसिंहस्य महीपतेर्विजयते तद्बाललिलायितम् ॥ ४४ ॥
कृष्णो महादेव इति प्रतीतौ जातस्ततः सिंहनृपस्य पौत्रो
तयोस्तु पूर्वप्रभवः पुरस्तात्कृष्णोतिविख्यातमतिर्नृपोऽभूत् ॥ ४५ ॥
येनाकारि विशालवीसलचमूसंहारकालानले
हेलोन्मूलितमूलराजसमरे निर्वीरमुर्वीतलम्
येनानेकमहाफलक्रतुकृतां संवर्ध्यमानोनिशं
क्षीणः कालवशात्पुनस्तरुणतां धर्मोऽपि संप्रापितः ॥ ४६ ॥
ततः कृष्णे राजन्यमरतरुणीचामरमरु-
-त्तरङ्गैरुत्तुंङ्गं दिवि किमपि तेजः श्रितवति
परित्राता भूमेः समजनि जगज्जित्वरमहा
महादेवः सेवारसिकसकलक्ष्माभृतनुतः ॥ ४७ ॥
तिल्लंगक्षितिपालतूलनिचयप्रक्षेपचण्डानिलो
गर्जद्गुर्जरगर्वपर्वतभिदादम्भोलिदोर्विक्रमः
हेलोन्मूलितकोङ्कणक्षितिपतिः कर्णाटलाटाद्भट-
क्षोणीपालविडम्बनः स हि महादेवः कथं वर्ण्यते ॥ ४८ ॥
यो भोजदेवान्नृपतेः प्रतापो जग्राह वाहं मदमन्दसत्त्वः
सार्धं जनन्या सह जीवितेन सोमेश्वरस्यापि जहार राज्यम् ॥ ४९ ॥
यदीयगन्धद्विपगण्डपालीनिष्ठ्यूतदानाम्बुतरंगिणीषु
सोमः समुद्रप्लवपेशलोपि ममज्ज सैन्येः सह कुंकुणेशः ॥ ५० ॥
सीमोल्लङ्घनमेव यस्य जगता संहार इत्युच्यते
क्रुद्धे वज्रधरेऽपि क्षितिभृन् मैनाकमत्रायत
स्मारं स्मारममुष्य दुःसहमहः संदोहदावानलं
तेनाम्भोनिधिनापि कुंकुणपतिर्नारिक्षि कुक्षिस्थितः ॥ ५१ ॥
वाहानाऽपि यस्य वैरिविषयेप्यातन्वतां धन्विना
मातीलिङ्गनृपाङ्गणादनुदिनं बाह्यादिलीलाभवत्
यस्तत्रैव रणे जहार करिणस्तत्पञ्चशब्दादिकान्
यस्तत्याज वधूवधादुपरतस्तद्भूभुजं रुद्रमाम् ॥ ५२ ॥



